ॐ

# खरा वारकरी



लेखक,

## नारायण रामकृष्ण अभ्यंकर



सन १९३१



किंमत सवा रुपया.

# प्रस्तावना.

" खरा वारकरी " ही कादंबरी लिहून पुरी झाल्याला आज जवळजवळ अडीच वर्षे झालीं. लिहून झाल्यानंतर कांहीं दिवसपर्यंत ती कोणाला वाचावयास देण्याचीही मला भीड वाटत असे. तरी माझ्या मित्रमंडळींपैकीं कांहींनीं ती वाचली व मला ती प्रसिद्ध करण्यास सांगूं लागले. पण मला धीर होईना. तेव्हां त्यांनीं त्या लिहिलेल्या चोपड्या परस्पर तीन चार तिऱ्हाईतांकडे पाठवून दिल्या. त्यांचाही अनुकूल अभिप्राय पडल्यामुळें मी ती छापण्याचें ठरविलें, व ईशकृपेनें ती आज पुस्तकरूपानें वाचकांच्या हातांत पडत आहे.

ज्या मित्रांनीं व नातलगांनीं मला वेळोवेळीं प्रोत्साहन देऊन मला ऋणी करून ठेवलें आहे, त्यांचे कोणत्या शब्दांनीं व किती आभार मानावे हेंच मला समजत नाहीं.

मुंबई वैभव प्रेसचे उत्साही मॅनेजर श्री. सिद्धये यांनीं आपुलकीनें छपाईचे काम वक्तशीरपणें करविल्याबद्दल त्यांचाही मी आभारी आहे.

प्रार्थना समाजजवळ,
गिरगांव--मुंबई.
ता. २५।३।३१

वाचकांचा नम्र,
**नारायण रामकृष्ण अभ्यंकर.**

ॐ

# "खरा वारकरी"

## प्रकरण १ लें.

गणेश दिनकर परांजपे यांचें कुटुंब छोटेखानीच होतें. ते, त्यांचें कुटुंब सरस्वतीबाई व एक अकरा महिन्यांचें अपत्य धोंडु. पहिल्यावहिल्या मुलाचें नांव अशाच प्रकारचें असलें पाहिजे, अशी सरस्वतीबाईची अगदीं प्रामाणिक समजूत होती. मुंबईत प्रत्यहीं इतके बालमृत्यु होत असतां, त्यांचा मुलगा इतके दिवस जीव धरून होता, हा एक त्यांच्या समजुतीच्या समर्थनाचा भरभक्कम पुरावाच होता कारण तो इतका अशक्त होता कीं त्याचें असें नांव ठेवण्यांत आलें नसते तर त्यानें त्या बालमृत्यूंच्या संख्येंत एकाची भर निःसंशय घातली असती. परंतु सरस्वतीबाईना दूरदृष्टीची पोंच केवढी! सती सावित्रीनें आपल्या निरुपम पतिनिष्ठेनें यमराजांनीं आपल्या पतीचा हिरावून नेलेला प्राण शिताफीनें परत मिळविला. परंतु सरस्वतीबाईनीं तर आपल्या पतीच्या प्रतिमेला ओबड धोबड नांवाचें असलें अभेद्य कवच चढविलें होतें की यमदूतांचे कठोर पाश देखील तें फोडून तिच्या अंगाला स्पर्श करूं शकत नव्हते. स्त्रियांना आपला पुत्र म्हणजे पतीची प्रतिमाच वाटत नाहीं का ? धोंडू इतका लहान असल्यामुळें त्याच्या अंगीं वडिलांचे गुण कितपत उतरले होते, हें कळण्यास मार्ग नव्हता. पण कांहीं लोक आपसांत मात्र कधीं कधीं असें बोलतांना आढळून येत कीं बापानें मुलाचें नांव मात्र अगदीं आपल्याला शोभेल असें ठेवलें.

गणेशपंतांना अठ्ठावीस रुपये पगार होता. तेवढ्यांत मुंबईसारख्या ठिकाणीं राहून संसार करणें हें कांहीं सोपें काम नव्हे. संसाराचा रथ हांकण्यास फारसें कौशल्य लागत नाहीं. संसाराचा गाडा सुरळित चालविण्यांतच खरी कुशलता असते; आणि ज्या अर्थी गणेशपंत तो सुरळित चालवून दाखवीत होते, त्याअर्थीं ते कुशल होते, हें ओघानेंच येतें. कारण ज्याचा संसार त्यानेंच चालवावयाचा असल्यामुळें, तो नीट चालला आहे किंवा नाहीं हेंही पहाण्याचा किंवा ठरविण्याचा अधिकार त्याचाच असतो.

ते आपल्या स्थितींत बहुत खूष होते यावरून वाचकांनीं आपला गैरसमज मात्र करून घेऊं नये. कारण त्याची अशी कल्पना होण्याचा संभव आहे कीं लक्ष्मीच्या बाबतींत ते विरक्त असल्यामुळेंच समाधानांत असत. पण वस्तुस्थिति तशी मुळींच नव्हती त्यांच्या संतोषाला अगदींच वेगळें कारण होतें. त्याची कांहीं तरी कल्पना त्या पतिपत्नीच्या खालीं दिलेल्या संवादावरून वाचकांस येईल.

**सरस्वती०**—"आज इतके दिवस मेलं मी एकसारखं म्हणत्यें आहें कीं धोंडूला त्या रखमाबाईच्या बगळ्याच्या अंगातल्यासारखं अंगातलं एकदां शिवीन म्हणून ! पण इकडनं कांहीं अजून कापड आणून देणें होत नाहीं.

**गणेश०**—"ही तूं अशी भलत्या वेळीं आठवण करून देत्येस त्याला काय करायचं ? या वेळीं दुकानें तरी उघडीं असणार आहेत का ?"

**सर०**—"मग मेली आठवण तरी केव्हां करायची ? सबंध दिवसभर असायचं असतं कामावर !"

**गणेश०**—"हो मग ? असलों म्हणून काय झालें ? कामावर गेलों नाहीं तर कृष्णासारखे वार लावायची माझ्यावर वेळ येईल, त्याची काय वाट ?"

**सर०**—"हो, खरंच ! मी म्हणतें भावजींना असें दुसऱ्यांच्या घरीं जाऊन जेवावें लागतें. त्यापेक्षां त्यांना आपल्या दुकानांतच कां नाहीं लावून देत ? म्हणजे बरं आपलं. त्यानाही पोटाला उद्योग झाला, आपलाही थोडासा फायदा झाला ! थोडेंसें भाडें तरी ज्यास्त देतील !

**गणेश०**—"म्हणजे तूं मला अक्कल शिकवायला लागलीस कीं काय ? तुला काय वाटतं ही कल्पना माझ्या डोक्यांत अजून आलीच नाहीं म्हणून ? अग, ती माझ्या डोक्यांत कधींपासून तरी होती; आणि मी तिची अंमलबजावणी देखील करणार होतों. पण हे दिवटे असले, त्याला कोणी काय करायचं ? यांनीं कांहीं त्या माझ्या कल्पनेचा अंमल आपल्यावर चालूं दिला नाहीं. मला म्हणे शिकायचं आहे ! डोंबल शिका आपलं. आतांपर्यंत शिकलेल्याचं फळ आज वारावर जेवून भोगतोच आहे; या पुढच्या शिक्षणाचं फळ पुढें दिसणारच आहे. आम्ही शिकलों नाहीं म्हणून आमचें कुठें काय अडलें कीं काय ? लग्न झालं-मूल झालं–सगळं कांहीं व्यवस्थित आहे. पण याचं लग्न तरी होतं आहे का अजून ? मग मूल तर दूरच राहिलं. परमेश्वराचे मी आभारच मानतों कीं हें शिकण्याचें वेड त्यानें माझ्या डोक्यांत भरविलें

नाहीं. म्हणून तर मला हा असा संसार तरी करतां येतो आहे. नाहीं तर याच्यासारखीच आमचीही गत झाली असती. आम्ही शिकण्याच्या भानगडींत पडलों नाहीं म्हणून तर आम्हाला तीन माणसांचें पोट भरण्यापुरतं तरी महि-न्याकांठीं मिळत आहे. नाही तर सात दिवस सात जणांचे उंबरठे ओलांडावे लागले असते. मारे इतकी भाराभर पुस्तकें वाचतो आणि मिळवितो काय ? तर म्हणे कधीं बारा रुपये तर कधीं दहाच ! बरं त्यांचा तरी त्याला स्वतःला कांहीं उपयोग व्हायचा आहे का ? आज काय म्हणे कालिजाची फीच भरायची तर उद्यां काय अमुक पुस्तक घ्यायचं ! असल्या भाराभर पुस्तकांच्या दडपणानं माझी तर बुवा छाती फुटून प्राण जाण्याचीच वेळ आली असती ! नशीब म्हणायचं आमचं कीं देवानें आम्हाला आपली संसारांत पडण्याची योग्य बुद्धि दिली आणि शिक्षणाच्या खुळया कल्पनांनीं आमचें डोकें पिसाळवलं नाहीं. ”

बोलतां बोलतां मुख्य विषय सोडून वाटेल तिकडे वहात जाण्याचें कसब त्या जोडप्याला अगदीं फारच छान साधलें होतें. उभयतांच्या वाक्प्रवाहांत एकमेक इतकीं मिसळून जात कीं त्या दोघांनाही आपण बोलण्यास सुरुवात कुठून केली याचें विस्मरण पडत असे. कृष्णाला लोक शिकलासवरलेला म्हणतात पण त्याला तर आपलें पोट सुद्धां स्वतःच्या मनगटाच्या जोरावर भरतां येत नाहीं, आणि आपल्याला शिक्षणाचा गंधही नसतां आपण तीन माणसांचा संसार चालवूं शकतों, याच विचारानें गणेशपंतांना समाधान वाटत असे. केवळ उच्च शिक्षणाची महत्त्वाकांक्षा अंतःकरणांत उत्कटतेनें वास करीत असल्यामुळेंच कृष्णाला असे हाल काढावे लागत आहेत, हा विचारसुद्धां गणेशपंतांच्या डोक्याला कधीं शिवत नसे.

कृष्णा हा त्यांचा धाकटा भाऊ. हा मुंबईतील एका कॉलेजात बी. ए. च्या वर्गात होता. बऱ्याच माणसांना बहुतकरून लहानपणीं तरी मातापितरांच्या आधाराचें सुख लाभत असतें. मग दुर्दैवानें ते जरी दारिद्र्यानें गांजलेले असले, तरी निदान त्यांच्या मुलाबाळांना तरी त्या व्याधीची काळजी करण्याचें कारण असत नाहीं. परंतु कृष्णा या बाबतींत दुर्दैवी होता. त्याची आई व वडील त्याच्या इतक्या लहानपणीं निवर्तले होते की त्याला त्यांचे चेहेरे सुद्धां नीटसे आठवत नव्हते. तो जात्याच अतिशय हुषार व दीघो-द्योगी असल्यामुळें कुठें तरी कांहीं तरी कामधंदा करून व मधुकरी मागून त्यानें मॅट्रिकपर्यंत तर मजल मारली. परंतु पुढें काय करावयाचें हा प्रश्न होताच त्याला शिकण्याची तर अतिशय हौस व उमेद. म्हणून कुठें तरी नोकरी धरून मोकळें व्हावें

असें त्याला वाटेना. त्याच्या हुषारीबद्दल सर्वांची खात्री होती. सुदैवानें कांहीं सद्गृहस्थांनीं तुझें कॉलेजांतील शिक्षण पुरें होईपर्यंत आम्ही तुला आमच्याकडे वार देण्यास तयार आहोंत, असे त्याला आश्वासन दिलें. कृष्णाला वाटत असलेली मुख्य अडचण अनायासेंच दूर झाली. बाकीच्या खर्चाबद्दल त्याला फारशी फिकीर वाटत नव्हती. कारण फीला पुरेशी त्याला स्कॉलरशिपच मिळणार होती. मधून मधून कुठें एखादी शिकवणी मिळे. तेवढ्यांत तो आपला इतर किरकोळ खर्च भागवी. त्याच्या स्वभावांत एक मोठा दोष होता. तो म्हणजे असा कीं मनाचा तो अतिशय मानी असे. कोणताही सद्गुण परमावधीला जाऊन पोहोंचला असतां आस्ते आस्ते त्याची दुर्गुणांत गणना केली जाऊं लागते. कृष्णाचा मानी स्वभाव इतक्या उत्कटतेला जाऊन पोहोंचला होता कीं साधारण मनुष्यानें त्याची दुर्गुणांतच गणना केली असती. अपमान प्रत्यक्ष तर राहूंच दे. पण अपमानाची कल्पनाही त्याला दुःसह होई; आणि त्या आवेगांत तो चटकन् कांहीं तरी अविचारही करून जाई. पण तितकाच तो सरळ व निष्कपटीही होता. आपली चूक आपल्याला कळून आल्यानंतर तो क्षमा मागण्यास केव्हांही तयार असे. ज्यांचे आपल्यावर उपकार होतात, त्यांचे ते कोणत्या ना कोणत्या तरी रूपानें फेडल्या शिवाय त्याला चैनच पडत नसे.

दादांनीं—खरंच, सांगावयाचें राहिलेंच कीं गणेशपंतांना कोणीही नांवानें हाक मारलेली खपत नसे. त्यांना दादा किंवा पुढें सांहेब लावला तर फारच चांगलें—या नांवानें संबोधिलेलें आवडत असे. कृष्णा हा त्यांचा धाकटा भाऊच असल्यामुळें तो त्यांना ‘ दादा ’ म्हणून हाक मारीतच असे. पण त्यांनीं या बाबतींत आपण रहात असलेल्या चाळींतील इतर मंडळीलाही ही शिस्त लावून ठेवली होती. ते स्वतः खोलींत रहात असत व कृष्णाला गॅलरींत रहाण्यास त्यांनीं परवानगी दिली होती. त्याबद्दल त्याच्याकडून ते फक्त आठ आणे भाडें घेत. त्यांचें असें म्हणणें असे कीं माणसानें आपलें व्यवहाराला चोख असावें. सख्खा भाऊ असला म्हणून काय झालें ? हें कांहीं माझें स्वतःचें घर नव्हे मलाही भाडें भरावें लागतेंच. तेव्हां कृष्णालाही थोडेंसें भरावें लागलें तर त्यांत गैरशिस्त असें काय आहे ?

सीनिअर् बी. ए. च्या वर्गांत गेल्यावर थोड्याच दिवसांनीं कृष्णाचा एक वार सुटला. कारण ज्या सद्गृहस्थांनीं त्याला तो Previous पासून दिला होता, ते पेन्शन घेऊन रिटायर झाले. पण त्यांनीं लगेच आपण होऊन आपले मित्र आप्पासाहेब साठे यांच्याकडे त्याची सोय लावून दिली. आप्पासाहेब पिढिजाद श्रीमंत

असून स्वभावानें थोडेसे भोळसर व बरेच दिलदार असत. त्यांचें शिक्षण फारसें झालेलें नसलें तरी त्यांना विधुरावस्था प्राप्त झाल्यानंतर त्यांना वाचनाचें जें व्यसन जडलें, त्यामुळें त्यांना फार फायदा झाला. पण त्यांच्यांत एक मोठा दोष होता. तो हा कीं त्याना स्वतंत्र रीतीनें विचार करतां येत नसे. त्याना दुसऱ्यांच्या बुद्धीनें वागण्याची संवय लागलेली होती.

त्यांना एकच अपत्य होतें—आणि तीही कन्याच. तिचें नांव मालती. तिची आई निवर्तली तेव्हां ती तेरा वर्षांची होती. बालपणचें सर्व वय आईबापांच्या लाडात गेल्यामुळें ती थोडीशी हट्टी बनली असल्यास नवल नाहीं. तिची आई आणखी एक दोन वर्षें हयात असती तर तिनें मालतीचा मोठ्या हौसेनें विवाह करून टाकला असता. परंतु ती स्वतःच परलोकवासी झाल्यामुळें तिच्या इहलोकच्या इच्छा अर्थातच अतृप्त राहिल्या. आप्पासाहेब थोडेसे सुधारलेल्या विचारांचे होते; आणि त्यांतही त्यांच्या प्रेमळ पत्नीच्या सहवासाला ते अंतरल्यापासून त्यांना मालतीचा पूर्वींपेक्षांहि अधिक लळा वाटूं लागला होता. तिचें लग्न करून टाकलें तर तिच्याही सहवासाला आपल्याला वरचेवर अंतरावें लागेल, या थोड्याशा स्वार्थी भीतीनें ते तिचें लग्न शक्य तितक्या लांबणीवर टाकीत होते. सोळाव्या वर्षी ती मॅट्रिक पास झाली, तेव्हां मात्र आप्पासाहेबांनीं तिचें लग्न करून टाकण्याचा आपला बेत तिला सांगितला. पण शिक्षणाची गोडी लागल्यामुळे व लग्नानंतर आप्पांची व आपली तातातूट होणार, या भीतीमुळें ती लग्न करण्यास तयार होईना. आप्पासाहेबांनाही मनांतून तेंच हवें होतें. त्यांनीं तिला तिच्या इच्छेप्रमाणें कॉलेजांत घातली.

यंदां ती सीनिअर बी. ए. मध्यें होती. कृष्णाही त्याच कॉलेजांत शिकत होता. First year पासून तीं दोघेंही एकाच वर्गांत होतीं. परंतु बऱ्याच विद्यार्थी विद्यार्थिनींप्रमाणें जबरदस्तीनें ओळखी करून घेण्याचा दोघांचाही स्वभाव नसल्यामुळें त्यांना एकमेकाची प्रत्यक्ष अशी ओळख नव्हती. कृष्णाचें नांव परीक्षेचा रिझल्ट लागल्यावर ज्याच्या त्याच्या तोंडीं होत असे. मध्यंतरीं सर्वतोमुखीं आपले नांव होण्याला कॉलेजांतील विद्यार्थ्यांच्या अंगांत जे गूण वास करावे लागतात, त्यांचा त्याच्या ठिकाणीं अभाव होता. आप्पासाहेबांच्या घरीं कृष्णाचा वार लागल्यानंतर तिचे व त्याचे काय चारदोन शब्द झाले असतील तेवढेच. दोघांच्या परिस्थितींत जमीन अस्मानाचें अंतर. दोघेंही एकाच वर्गांत शिकत होतीं, या एका गोष्टीशिवाय त्यांच्यात कांहींच साम्य नव्हतें; त्यामुळें दोघांनाही एकमेकाशीं बोलावयाचा संकोच वाटे.

आपण श्रीमंत व कृष्णा गरीब अशा विचारामुळें तिला त्याच्याशीं बोलण्यांत कमीपणा वाटत असे, असें मात्र मुळींच नव्हे. पण स्वभावतःच तिला फारसें बोलण्यास आवडत नसे; आणि कृष्णाला तर तरुण स्त्रियांबरोबर बोलणें हें एकप्रकारचें संकटच वाटत असे. कारण त्याच्यावर असले प्रसंगच कधीं येत नसत. कॉलेजांतील इतर विद्यार्थी या त्याच्या दोषामुळें त्याला भीरु म्हणत असत; कारण त्यांचें धैर्य आपल्या बरोबरीच्या विद्यार्थिनींसमोर दांत विचकण्यांत व त्याच्या पुढें पुढें करून कशी तरी एकदां एखादटुसरा शब्द त्यांच्याशीं बोलण्याची संधि मिळविण्यांतच सांठलेलें असे.

कृष्णाचें मित्रमंडळही फारच लहान होतें. जवळ जवळ केशवाखेरीज त्याला कोणी मित्र असा नव्हताच, असें म्हटलें तरी चालेल. हा मात्र त्याचा अगदीं ‘ बहिश्चराः प्राणाः ’ होता. केशवाचेंही कृष्णावर असेंच प्रेम होतें. पण दोघांमध्यें मुख्य फरक असा होता कीं केशवाला कृष्णाशिवाय इतरही आपले बरेच मित्र असल्याचा भास होत असे.

मालतीलाही कॉलेजांत अशी एकच जीवाची मैत्रीण होती. तिचें नांव लीला. लीला बालविधवा होती. फारच चांगलें स्थळ मुलीला मिळाल्यामुळें ती इंग्रजी चवथ्या इयत्तेंत असतांना तिच्या वडिलांनीं आपल्या हौशीप्रमाणें तिचें अगदीं थाटामाटांत लग्न केलें होतें. परंतु दैवापुढें कोणाचा इलाज नाही. तिचा पति ती सासरीं जाण्यापूर्वींच प्लेगला बळी पडला. तिच्या कुंकवाला तिच्या बापानें धनी म्हणून मिळवून दिला, तोच तिच्या कुंकवाच्या नाशाला दुर्दैवानें कारण झाला. आपला सध्यांचा समाज इतका कांहीं चमत्कारिक झालेला आहे कीं ‘ विधवा ’ म्हटली कीं तिच्या संबंधानें बोलतांना त्याच्या जिभेचे चवचाल लगाम एकदम ढिले होतात. तिचें कोणतेंच करणें त्याला पसंत पडत नाहीं. देवाच्या दयेला पूर्वजन्मींच्या पापामुळें अपात्र ठरलेल्या त्या दीन दुर्बळ अबलेसंबंधीं सहानुभूति दाखविणें हें त्याचें पवित्र कर्तव्य असतांना, त्यानें तिच्या कोणत्याही कृतीचा आपल्या कुत्सित मनाप्रमाणें हवा तसा विपर्यास करावा, हें दुर्दैव नव्हे काय ? एखादी उतार वयाची स्त्री विधवा झाली तर तिच्या वागणुकींत आपोआपच फरक पडतो, यांत कांहीं आश्चर्य नाहीं. कारण ती चांगली समजदार असते. परंतु देवाब्राह्मणांच्या साक्षीनें एका पुरुषाकडून गळ्यांत माळ पडल्यामुळें गृहिणीपदावर आरूढ झाली व त्याच्याशीं एखादा शब्द बोलण्याचा सुद्धां सुप्रसंग प्राप्त होण्यापूर्वींच तो देवाघरीं पावता झाल्यामुळेंच सौभाग्यवतीची विधवा झाली, अशा लीलेच्या वर्तनांत

एकदम फरक होण्याची समाजानें अपेक्षा कां करावी? देवानें तिला सुंदर रूप दिलें होतें, हा तिचा दोष कीं काय? तिचा तरुण पति स्वर्गवासी झाला तो तिचें बालिश तारुण्यही आपल्या समवेत घेऊन गेला कीं काय? आपल्या परिस्थितीचा नीट उमज पडल्यावर तिच्या वर्तनांत आपोआपच फरक होत जाणार नाहीं काय? पण इतक्या सरळपणानें समाजांतील पुरुषांना विचार करण्याचें काय कारण? कारण त्यांच्यापैकीं कोणी विधूर झाला तर दुसऱ्या मुलीशीं लग्न करण्याची संधि मिळाल्याबद्दल मनांतल्या मनांत आनंदित होऊन प्रथम पत्नीच्या मृत्यूनें प्राप्त झालेल्या सुतकांतच दुसऱ्या वधूचें परीक्षण करावयास जाण्याचा जादा अधिकार त्यांनीं खास आपल्यासाठीं राखून ठेवलेला असतो! लीला रस्त्यांतून जाऊं लागली कीं कित्येक लोक आपापसांत नाहीं नाहीं ते बोलत असत. आपलें नाक कापून घेवून लोकांना अपशकून करण्यासाठीं तिनें आपला सुंदर चेहरा विद्रूप करून घ्यावा, असें त्यांना वाटत होतें कीं काय न कळे!

लीला आपल्या वडिलांच्या सांगण्यावरून पुढें शिकूं लागली. ती पुढें कॉलेजांत जाऊं लागल्यावर तिची व मालतीची मैत्री जमली. दोन सरळ स्वभावाच्या सच्छील माणसांची मैत्री जमावी, यांत कांहीं आश्चर्य नाहीं. एखाद्या दिवशीं एकमेकींची भेट झाली नाहीं तर दोघींनाही अगदीं चुकल्याचुकल्यासारखें होत असे.

आप्पासाहेबांचे परम स्नेही श्रीमंत अण्णासाहेब देशमुख यांचा एकुलता एक मुलगा वसंत–मुंबई युनिव्हर्सिटीचा B. A. होता. लक्ष्मीची पूर्ण कृपा व मुबलक स्वतंत्रता असून देखील त्याची कॉलेजांतील career खरोखरच वाखाणण्यासारखी होती. त्यानें कोणत्याही परीक्षेंत आपला फर्स्ट् क्लास सोडला नव्हता. पण त्यामुळें एक झालें कीं त्याला आपल्या बुद्धीचा फार गर्व झाला व आपल्या इतकी कोणालाही कोणत्याही बाबतींत अक्कल नाहीं, अशी त्यानें आपली समजूत करून घेतली.

बापलेकांची भेट वसंत व्हेकेशनमध्यें नाशकास जाई, तेव्हांच फक्त होई. तेव्हां तो बी. ए. झाल्यावर अण्णासाहेबांनीं एक वर्षभर त्याला आपल्याच जवळ रहाण्यास सांगितलें. त्यांचें उतारवय झाल्यामुळें आपल्या इस्टेटीची सर्व माहिती वसंतास करून देण्याचा त्यांचा मानस होता. लॉ टर्म्स् भरण्याची स्वतःची इच्छा असतांना आपल्या वृद्ध पित्याच्या विनंतीवजा आज्ञेस मान देऊन तो त्यांच्यापाशीं राहिला. घरीं बसल्याबसल्याच त्यानें कायद्याचीं बहुतेक सारीं पुस्तकें वाचून काढलीं. तो जात्याच कुशाग्रबुद्धीचा होता व त्याला अवसरही चांगला मिळाला. त्यानें कायद्याचें चांगलेंच ज्ञान संपादन केलें व

बॅरिस्टर होण्यासाठीं विलायतेस जाण्याची माझी इच्छा आहे असें त्यानें आण्णासाहेबांस सांगितलें. त्यांनींही त्यास मोठ्या आनंदानें परवानगी दिली.

मुंबईस कॉलेजांत शिकत असतां आप्पासाहेब अण्णासाहेबांचे स्नेही म्हणून त्यांच्याकडे वसंताचें नेहेमीं जाणें येणें असे. आप्पासाहेबांना मुलगा नसल्यामुळें ते त्यालाच आपल्या मुलासारखा मानीत असत. मालतीची व त्याचीही चांगली मैत्री होती. पण तिच्या मितभाषी स्वभावामुळें त्या मैत्रीला फांद्या फुटूं लागल्या नव्हत्या.

अण्णासाहेबांनीं वसंताची विलायतेस जाण्याची इच्छा व आपण दिलेली संमति आप्पासाहेबांस कळविली. ते पावसाळ्याच्या सुरुवातीचे दिवस असल्यामुळें वसंताला जाण्याला अजून बराच अवकाश होता. तेव्हां आप्पासाहेबांनीं वसंताला आपल्याकडे कांहीं दिवस रहाण्यास बोलाविलें. तो मुंबईस जावयास निघाला तेव्हां अण्णासाहेबांनीं त्याला हलकेच कांहींसें सांगितलें. वसंताची मुद्रा एकदम प्रफुल्लित दिसूं लागली. "माझी सुद्धां मनापासून हीच इच्छा होती," असें म्हणून तो मुंबईस येण्याला निघाला.

---

# प्रकरण २ रें.

कृष्णा आपल्या नेमलेल्या वारीं आप्पासाहेबांच्या घरीं जेवण्यास आला. ही त्याची त्यांच्याकडे जेवण्याची चवथी किंवा पांचवी खेप असेल. त्यांच्याकडे जेवण्यास कृष्णाला अतिशय संकोच वाटत असे. त्याच्याच वर्गांतील मुलगी त्या घरची मालकीण होती. तिच्या अबोलकेपणामुळें ही आपल्याला कमी दर्जाचा समजते आणि म्हणूनच आपल्याशीं बोलत नाहीं अशी त्याची कल्पना झाली होती. आप्पासाहेबांना वाचण्याचा भयंकर नाद असल्यामुळें ते कृष्णाशीं फक्त "या-बसा-" खेरीज फारसें बोलत नसत. या त्या दोघांच्या वागण्यामुळें तर त्याला चमत्कारिक वाटत असेच पण विशेषतः इतर ठिकाणीं ज्याप्रमाणें त्याला आपल्या अन्नदात्यांच्या कोणत्या ना कोणत्या प्रकारें उपयोगीं पडतां येत असे, तशी संधि त्याला इथें कधींच मिळत नसे; याचें त्याला फारच वाईट वाटे. इतर ठिकाणीं म्हणजे तेथल्या लहान मुलांना कांहीं तरी शिकविणें किंवा इतर कांहीं काम करणें असें कांहीं ना कांहीं तरी कृष्णा करीच. पण आप्पासाहेबांच्या घरीं लहान

मुलेंच नसल्यामुळें ती बाबच आटोपली होती. बरें, इतर कांहीं कामाविषयी म्हटलें तर त्यांच्या घरीं असलेल्या नोकरांचाच रिकामपणामुळें वेळ जात नसे. या गोष्टीमुळे त्याला त्यांच्याकडे जेवणें म्हणजे एक प्रकारचें ओझें वाटत असे. श्रीमंत लोकांसंबंधी त्याच्या फारच चमत्कारिक कल्पना होत्या. कोणताही श्रीमंत मनुष्य निरपेक्ष बुद्धीनें दुसऱ्यास सहाय्य करण्यास तयार होतो, असें त्याला कधींच वाटत नसे. जगांत आपलें उदार म्हणून नांव व्हावें, निदान ज्या मनुष्यावर आपण उपकार करतों त्यानें त्या उपकारांच्या ओझ्याखालीं दडपून जाऊन आपलें जन्माचें ऋणी व्हावें, असल्या प्रकारच्या स्वार्थी भावनांनीं प्रेरित होऊन ते दुसऱ्यास मदत करण्याचें नाटक करीत असतात, अशी त्याची ठाम कल्पना होती. त्यांची केव्हां लहर फिरेल आणि ते एकदम काय करतील याचा कांहीं नेम नाहीं, अशी त्याला शंका येत असे.

त्याच दिवशीं वसंत मुंबईस आला होता. सहाजिकपणेंच कृष्णा आला त्या वेळी आप्पासाहेब वसंताबरोबर गोष्टी बोलत बसले होते. मालती आप्पासाहेबांच्या शेजारीं बसून त्यांचें बोलणें ऐकत होती. त्यांच्या गोष्टी ऐन रंगांत आलेल्या असतांना कृष्णा तेथें पोहोंचल्यामुळें त्यांपैकी कोणाचेंच लक्ष त्याच्याकडे गेलें नाहीं. कृष्णाला वाटलें नेहेमीं आपण येत असूं तेव्हां हे आपल्याला निदान 'या बसा' तरी म्हणत असत. पण आज तर मी आल्याचें आपल्याला कळलें नाहीं, असें हे दर्शवीत आहेत. एकंदरींत श्रीमंत माणसांविषयीं आजपर्यंतच्या माझ्या कल्पना खऱ्याच होत्या तर ! ठीक आहे. आज अजिबात अबोल्यावर आलें आहे. आतां पासूनच सावध असावें हें ठीक. नाहीं तर आपला स्वभाव पडला मानी आणि प्रसंग पडलेला लोकांच्या घरोघर तुकडे मोडण्याचा ! एवढ्यानेंच शहाणें होणें बरें.

असा विचार करून तेथेंच पडलेलें एक वर्तमानपत्र त्यानें उचललें व एका खिडकीशीं उभा राहून तो तें वाचण्याचा प्रयत्न करूं लागला—होय—प्रयत्नच करूं लागला. कारण त्याचें वाचनाकडे मुळींच लक्ष नव्हतें. एक वेळ वाटे की जर हे पाहुणे आजच यांच्याकडे आलेले असले तर त्यांचाच विचारपूस करण्यांत आप्पासाहेब व मालती दंग होऊन जावीं यांत अस्वाभाविक असें कांहींच नाहीं; आणि म्हणून त्यांचें माझ्याकडे लक्ष नसणें सहाजिक आहे. पण पुनः त्याचें मन उचल खाई. नेहमींप्रमाणें आजही ते माझ्याशीं दोन शब्द बोलले असते, तर या सन्मान्य पाहुण्यांचा त्यांत अपमान झाला असता की काय ? नेहमींप्रमाणें आजही त्यांना मला 'या—बसा' म्हणणें कांहीं अशक्य नव्हतें. तेव्हां त्यांनीं ही टाळाटाळ जाणूनबुजूनच

केली असली पाहिजे, जेवतांना देखील त्याच्या मनाची एकसारखी चलबिचल होत होती. इतकें त्याला वाटण्यासारखें तसें पाहिलें तर कांहींच झालें नव्हतें. पण ते आज आपल्याशीं अशा तुसडेपणानें वागले ते आपला अपमान करण्याकरितांच, असा त्यानें आपल्या मनाचा ग्रह करून घेतला होता. तो विलक्षण मानी स्वभावाचा असल्यामुळें अपमानाची जाणीव त्याच्या मनाला असह्य वेदना देत होती. दुसरा कोणी त्याच्या जागीं असता तर त्याला त्याचें कांहींच वाटले नसतें. तो तें केव्हांच विसरूनही गेला असता. पण तें कृष्णाला शक्य नव्हतें. त्याचें कशाकडेही लक्ष लागेना. त्या तिघांच्या बोलण्यावरून आलेल्या पाहुण्याचें नांव वसंत व तो बॅरिस्टर होण्यासाठी विलायतेस जाणार आहे, एवढें त्याला समजलें.

कॉलेजांत गेल्यावर देखील प्रोफेसर काय बोलत आहेत, इकडे त्याचें लक्ष नव्हतें. घरीं परत आल्यावर तो आपल्या गॅलरींत येऊन स्वस्थ पडला. डोक्यांत चाललेले विचार काढून टाकण्याचा त्यानें खूप प्रयत्न केला, पण व्यर्थ. जों जों तो त्या मार्गानें प्रयत्न करी, तों तों ते त्याच्या डोक्यांत अधिकच खिळूं लागले. नेहमीं तो संध्याकाळीं फिरावयास जात असे. पण आज त्याला बाहेर पडण्याची इच्छाच होईना. रात्रींही तो आप्पासाहेबांकडे जाणारच नव्हता. पण त्यानें पुनः विचार केला कीं ' ही दुसरी वेळ आहे. तीनदां काय तो अनुभव येईपर्यंत मला वाट पाहिलीच पाहिजे. कांहीं तरी अन्न मी त्यांच्या घरीं खाल्लें आहे; आणि अविचारानें भलतीच गोष्ट एकदम करणें ठीक नाहीं. ' असा पोक्त विचार करून कसा तरी एकदां त्यांच्या घरीं जाऊन पोहोंचला.

कृष्णा आप्पासाहेबांच्या घरीं येऊन पोहोंचला, तों लीला व मालती दिवाणखान्यांत गोष्टी बोलत बसल्या होत्या मोकळेपणानें बोलावयास मिळावें, म्हणून त्या मालतीच्या अभ्यासाच्या खोलींत उठून गेल्या. कृष्णाला वाटलें कीं आपण येथें आल्यामुळें त्यांना येथें बसण्यांत कमीपणा वाटला, व म्हणूनच त्या उठून गेल्या. तो तेथेंच पडलेलें एक पुस्तक घेऊन त्याचीं पानें चाळीत बसला.

**लीला**—" काय ग, मालती, हे परांजपे तुझ्या कोणी नात्याचे आहेत वाटतें ? मला तूं कधीं तसें सांगितलेलें स्मरत नाहीं. "

**मालती**—" त्यांचें व माझें जर कांहीं नातेंच नाहीं तर तुला सांगावयाचें काय ? त्यांची परिस्थिति अतिशय गरिबीची असल्यामुळें त्यांना बिचाऱ्यांना वारावर जेवावें लागतें. आमच्याकडेही त्यांचा एक वार आहे. "

**लीला**—" शावास ! केवढें मनोधैर्य आहे हें खरोखर ? दुसऱ्यांकडे जाऊन जेवायचें ही म्हणजे अगदीं साधी गोष्ट, असें पुष्कळांना वाटत असेल. पण जावें त्याच्या वंशा तेव्हां कळे ! परोपजीवि-जीवित कंठावयाचें म्हणजे अग्नीशींच खेळण्यासारखें आहे. विस्तवाशीं खेळत वसलें असतां त्याचा चटका-निदान त्याची झळ तरी माणसाला सोसावी लागतेच. त्याप्रमाणें दुसऱ्यांच्या उपकाराखालीं सदैव दडपला गेलेल्या माणसावर अपमानाचे डाग सोसण्याचा दुर्धर प्रसंग कधीं तरी यावयाचाच. अशा परिस्थितीशीं झगडत असतांना सुद्धां त्यांनीं आपली करिअर् इतकी चांगली ठेवली आहे व शिक्षणाची आपली महत्त्वाकांक्षा ते मावळूं देत नाहींत तेव्हां शावास आहे त्यांची !–"

**मालती**—" इतक्या सद्गुणी आणि सुशील माणसाला अशा दारिद्र्यांत खितपत ठेवण्यांत परमेश्वराचा काय हेतु असेल तो असो ! "

**लीला**—" अग, अशा दुःस्थितीचा अनुभव घेत असतांही आपली कर्तबगारी जगाला दाखविणें हेंच खरें यश आहे. तो जर आज श्रीमंतींत लोळत असता, तर तो बेफिकीर बनून भलतीकडेच वहावला जाण्याचा संभव होता. म्हणजे असें झालेंच असतें असें माझें म्हणणें नाहीं—"

**मालती**—" या बोलण्यांत काय अर्थ आहे ? हें आपलें कांहींतरी बोलून मनाचें समाधान करून घेणें आहे"

**लीला**—" मला आपली तूं खेडवळ म्हटलीस तरी चालेल पण माझा आपला परमेश्वरावर विश्वास आहे तो केव्हांही व कोणाचेंही अहित करीत नाहीं, असा मला ठाम भरंवसा वाटतो."

**मालती**—" अग, मी सुद्धां कांहीं नास्तिक नाहीं. पण कित्येक नालायक, दुर्गुणी लोक लक्ष्मीला अहोरात्र पायांखाली तुडवीत असतां असल्या एखाद्या लायक व गुणी माणसाला तिला फक्त दुरूनच नमस्कार करण्याचा अधिकार असावा, असला प्रकार पाहिला म्हणजे परमेश्वराच्या निःपक्षपातीपणाबद्दल मनांत संशय उत्पन्न झाल्याखेरीज रहात नाहीं."

**लीला**—" अशा वेळीच पूर्वजन्मावर विश्वास ठेवण्याची पाळी येते. नाहीं तर या जन्मांत त्यानें कोणतें अघोर पातक केलें आहे की ज्याचें प्रायश्चित्त म्हणून त्याला स्वतःचे असे दोन घांसही मिळूं नयेत ? आणि त्याकरितां लोकांपुढें तोंड वेंगाडण्याची पाळी यावी ? तूं जे लक्ष्मीच्या कृपेला पात्र झालेले पाजी लोक म्हणालीस त्यांनीं तरी

या जन्मांत पुण्याचा काय मोठा सांठा करून ठेवला होता ? आदल्या जन्मीं त्यांच्या हातून कांहीं सुकृतें घडलीं असतील, त्यांची फळें या जन्मीं त्यांना चाखावयास मिळत आहेत. पण तसें करीत असतांना या जन्मीं केलेल्या दुष्कृतांबद्दल त्यांना पुढील जन्मीं प्रायश्चित्त भोगल्यावांचून थोडीच सुटका आहे ? मी तरी माझ्या स्वतःच्या अशा दारुण दुःस्थितींतही याच विचारानें समाधान मानून घेत असतें. नाहीं तर तुला काय वाटतें मानवी अंतःकरणांतील सुखदुःखांच्या भावना मला नाहींत ? आपण दुःखी आहोंत व आपला सारा जन्मही दुःखांतच जाणार आहे याची जाणीव मला नाहीं ? आपण आपल्यावर परमेश्वरी रोष झाल्यामुळें ऐहिक सुखांना आंचवलों गेलों आहोंत, या गोष्टीचें मला ज्ञान नाहीं ? मी जी नेहमीं तुला आनंदित दिसतें, त्याचें कारण माझी परमेश्वरावरील अचल निष्ठा हेंच होय. माझा जर परमेश्वरावर दृढ विश्वास नसता तर सध्यां मला मनाच्या शांतीचा जो लाभ अनुभवितां येत आहे, तो खास आला नसता. मागील जन्मीं माझ्या हातून घडलेल्या कांहीं तरी अनन्वित पातकांचें प्रायश्चित्त मी या जन्मीं भोगीत आहें. तेव्हां तें भोगीत असतां परमेश्वरावर त्याच्याबद्दल रागावून त्याच्यावरील आपला विश्वास चळूं देण्यात काय अर्थ आहे ? "

**मालती०**—" तूंतर आज अगदीं मोठ्या तत्त्वज्ञानाच्याच गोष्टी बोलूं लागलीस. पण असल्या गोष्टींचा आपल्याला व्यवहारांत काय उपयोग होणार ? दुःखें भोगण्याचें कांहीं त्यानें टळत नाहीं ना ?

**लीला**—" दुःखें भोगण्याचें टळत नसलें तरी दुःख वाटण्याचें तरी टळतें कीं नाहीं ? सुखोपभोगांत यथेच्छ कालक्रमणा करीत असतां आपली परमेश्वराच्या ठिकाणीं दृढ श्रद्धा असल्याचें थोतांड पुष्कळ लोक उभारतात. पण त्यांच्या चैनींत जरा कुठें न्यूनता आली कीं लगेच त्यांचीं मोरांचीं पिसें गळून पडून त्यांचें खरें स्वरूप आपोआप प्रगट होतें. आपल्यावर ओढवलेल्या विपत्कालीं सुद्धां परमेश्वर आजपर्यंत आपला उद्धार करीत आला आहे व अखेरपर्यंत उद्धारच करीत रहाणार, हा विश्वास कायम टिकणें यालाच अचल निष्ठा म्हणतात. पण आतां एवढें खरें कीं इतक्या पूर्णतेला पोहोंचलेली निष्ठा दुर्मिळ असते; आणि म्हणूनच या व्यवहारी जगांत सामान्य माणसांकडून आपल्याला हव्या असलेल्या गोष्टी मिळवायला आपल्याला कष्ट करावे लागतात. आपले मनोरथ सिद्धीस जाण्याकरितां आपल्याकडून शक्य तेवढा प्रयत्न करणें हें मनुष्याचें कर्तव्यच आहे. "

याचवेळीं वसंत मालतीला जेवायला बोलावण्याकरिता आंत आला. मालतीनें लीला व वसंत यांचा औपचारिक रीतीनें परस्परांना परिचय करून दिला. लीलेला आपल्या-बरोबर जेवावयास चलण्याला मालतीनें खूप आग्रह केला पण लीलेला कांहीं काम असल्यामुळें ती घरीं निघून गेली.

पानावर बसल्यानंतर आप्पासाहेबांनी कृष्णाला वसंत कोण वगैरे माहिती करून दिली. वसंत कृष्णाशीं एक शब्दही बोलला नाहीं. सकाळीं कृष्णा जेवून गेल्यानंतर वसंताला त्याची माहिती झालीच होती. त्याला आपल्याशीं समान दर्जा असलेल्या लोकांवाचून इतर कोणाशीं बोलणें आवडत नसे. त्याच्या स्वभावांत हा फारच मोठा दोष होता. त्याचें गरीब लोकाशीं कोणत्याही प्रकारचा संबंध न ठेवल्यानेंच समाधान झालें असतें तरी पुष्कळ होतें. पण त्याचें तेवढ्यावरच भागत नसे. तो त्यांचा द्वेष करी व त्यांचा मानभंग करण्याची संधि वांया जाऊं देत नसे. वसंताची फाजील आढ्यतेची वर्तणूक पाहून कृष्णाचें मन त्याच्यासंबंधीं अगदी विटून गेलें. जेवण झाल्याबरोबर आपल्या नेहेमींच्या पद्धतीप्रमाणें आप्पासाहेबांना " जातों " म्हणून सांगून तो घरीं परतला.

सकाळी कांहीं सबब तरी होती. पण आतांही त्यांनी आपल्याशीं कांहींच बोलूं नये, याचा त्याला राग आला. त्याचें डोकें अतिशय गरम झालें; व त्यामुळें अगदीं पहां-टेपर्यंत त्याला झोंप लागली नाहीं. त्याला सकाळीं उठल्याबरोबर अंग मोडल्यासारखें वाटलें व अंगांत किंचित् ताप असल्याचेंही आढळून आलें. म्हणून लगेच त्या दिव-शींच्या अन्नदात्याकडे 'मी आजारी असल्यामुळें आज जेवावयास येणार नाहीं,' असें कळविण्यास गेला. त्या दिवशीं तो कॉलेजातही गेला नाही.

---

# प्रकरण ३ रें.

कृष्णा त्या दिवशीं कॉलेजांत गेला नाहीं, तेव्हां केशवानें तर्क केला कीं तो आजारी असला पाहिजे. कारण कृष्णा विनाकारण कॉलेज चुकवून घरीं रहाणें शक्य नाहीं, अशी त्याची खात्री होती. त्या दोघांची मैत्री म्हणजे चार दोन वेळां एका ठिकाणीं बसून चहा प्याल्यामुळें भासमान होणारी मैत्री नव्हती. मराठी शाळेपासून आतांपर्यंत त्यांचा स्नेह एकसारखा वाढता होता. केशवाची स्थिति कृष्णाशी तुलना

केली असतां बरीच चांगली होती. पहिली गोष्ट म्हणजे त्याला मातापितरांचें सौख्य होतें व चारदोन भावंडेंही होतीं. केशव सर्वांत वडील. त्याच्या वडिलांना एका सरकारी ऑफिसांत नोकरी होती. केशवाच्या कॉलेजच्या खर्चाचा बोजा पडल्यामुळें त्यांची या महिन्याची त्या महिन्याला गांठ घालतां घालतां कठीण अवस्था होत असे. पण ते स्वतः फारसे शिकले नसले तरी आपल्या होतकरू मुलानें खूप शिकून नांव मिळवावें अशी त्याची फार इच्छा होती. असो.

कॉलेज सुटल्यावरोबर केशव कृष्णाच्या समाचारासाठीं त्याच्याकडे आला.

के०—" का रे कृष्णा, आज कॉलेजांत आला नाहींस ? पुनः मलेरिआनें डोकें वर काढलें वाटतें ? बाकी तूं आजारी असलास तरी तुझ्या कपाळची ही गॅलरी सुटली नसेल म्हणा ! "

कृ०—" माझ्या कपाळची मानहानि चुकेल तर ही गॅलरीच काय पण वाटेल त्या ठिकाणीं रहाण्याची पाळी माझ्यावर आली तरी त्याला मी मोठ्या आनंदानें तयार होईन. "

के०—" काय ? या केशवाचा साडेतीन हातांचा देह शाबूत असतांना, या माझ्या मित्राची मानहानि करण्यास कोणता मायेचा पूत धजावला ? सांग. त्या चाडाळाचें नुसतें नांव उच्चार. तुझ्या मुखांतून त्याचें नांव पुरतेपणीं बाहेर पडण्याच्या आंतच त्याची जीभ मुळासकट उपटून टाकतों.—"

कृष्णाला त्याच्या त्या संतप्त मनःस्थितींतही केशवाचें हें नाटकी भाषण ऐकून हंसूं आल्याशिवाय राहिलें नाहीं. खरोखरच केशव त्याला भेटल्यानें व त्याच्या संगतींत कांहीं काल घालविण्यास मिळाल्यामुळें कृष्णाला जितका आनंद वाटत असे, तितका दुसरा कशानेंही होत नसे. केशवाचें बोलणेंच तसें असे. पण एखाद्या गंभीर प्रसंगीं तो तितकाच गंभीरही होई. आधीं फाल्तु गोष्टींकडे तो सहसा लक्षच पुरवीत नसे. कोणतीही हलकीसलकी गोष्ट तो हंसण्यावारीच घालवी. कृष्णाचें मात्र तसें नसे. कोणतीही गोष्ट असूं द्या. तो तिचा खोल बुद्धीनेंच विचार करावयाचा त्यामुळें कधीं कधीं ज्या गोष्टींशीं त्याचा प्रत्यक्ष कांहीं संबंध नसे, अशा गोष्टींनींही त्याच्या. मेंदूला त्रास होत असे.

कृ०—" तुला काय कॉलेजच्या गॅदरिंगमध्यें एकाद्या नाटकांत तूं काम करीत आहेस असें वाटत आहे कीं काय ?—"

के०--" नाहीं. मी तुला पहिल्यानें सरळ विचारलें कीं तुला आज कांहीं ताप-वीप आला होता कीं काय ? त्याचें तूं जर सरळ उत्तर दिलें असतेंस तर मला रिहर्सल करण्याचा प्रसंग कशाला येता ? ही मानहानि मध्येंच कुठें उद्भवली ?"

आदल्या दिवशीं घडलेली सारी हकीकत कृष्णानें त्याला सांगितली. केशवाला त्यांत विशेष असें कांहींच वाटलें नाहीं.

के०--" मला त्या तुझ्या आप्पासाहेबांची कांहीं विशेषशी माहिती नाहीं. पण मालतीबाईविषयीं मात्र मी खात्रीनें सांगूं शकतों कीं असलें उद्धटपणाचें वर्तन त्यांच्या हातून एका गरीब माणसाचा अपमान करण्याच्या बुद्धीनें घडणे कधींच शक्य नाहीं. तुझा व त्यांचा कांहीं विशेष परिचय नसेल. पण टेनिस् कोर्टावर आज तीन वर्षें जो मी त्यांचा अनुभव घेत आहें त्यावरून मी त्यांच्याविषयीं तरी खात्रीनें सांगूं शकतों."

केशवाची माहिती करून देतांना तो उत्तम प्रकारचा खेळाडू होता हें सांगण्याचें राहिलें होतें. टेनिस्‌मध्यें तर त्याचा हात धरणारा त्या वेळीं स्टूडन्ट्‌वर्ल्ड्‌मध्यें कोणी नव्हता असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. त्याच्या वडिलांच्या मिळकतीचा विचार केला असतां ते आपल्या मुलाच्या असल्या हौशी भागविण्यास कसे समर्थ होत असा वाचकांना प्रश्न पडण्याचा संभव आहे. पण त्याच्या खेळाचा कोणत्याही प्रकारचा भार त्यांना सोसावा लागत नसे, एवढें सांगितलें म्हणजे पुरे. आधीं बहु-तेक खेळाडूंना खेळण्याकरितां असा विशेष खर्च येतच नसतो तेथील इतर लोकां-बरोबर त्यांना ज्या संवयी लागतात, त्या भागवितांना त्यांना खरा खर्च लागतो. पण आपला खेळ आटोपल्याबरोबर इतर लोकांच्या संगतींत आपल्या काळाचा अपव्यय करण्याच्या नादास न लागतां केशव तडक आपल्या घरचा रस्ता पकडीत असे. त्यामुळें तो कोणत्याही संवयींत गुरफटूं शकला नाहीं, व इतरांशीं फारच थोडा संबंध ठेविल्यामुळें त्याचें त्यांच्यावर एक प्रकारचें वजन पडलें होतें.

कृ०—" बरें. तुझा शब्द खरा मानून चाललें तरी आप्पासाहेबाचें वर्तन तरी माझ्या मनाला लागण्यासारखें झालें, असें नाहीं का तुला वाटत ?"

के०--" नाहीं बुवा वाटत ! त्यांच्या स्नेह्याचा मुलगा जर त्यांना बरेच दिव-सांनीं भेटला तर त्याच्या विचारपुशींत त्यांचा वेळ खर्च होणें हें कांहीं अस्वाभाविक नाहीं. तुला त्यांत एवढें लागण्यासारखें काय वाटलें, हेंच मला समजत नाहीं. तुझ्या ठिकाणीं दुसरा कोणी असता तर मी त्याची खास मूर्खांतच गणना केली असती."

कृ०—" अशी आडून गोळी कशाला मारतोस ? चक्कच सांगून टाक ना कीं तूं मूर्खच आहेस म्हणून ! "

के०—" उगाच मी आपल्या तोंडानें कशाला तें पाप करूं ? तुझें तूंच म्हणून घे पाहिजे तर. एवढें मात्र मी खात्रीनें सांगतों कीं एवढ्याशा क्षुल्लक गोष्टीकरितां आपल्या डोक्यांत राख घालून त्याच्या उष्णतेनें स्वतःवर ताप ओढवून घेणाऱ्यानें जर आपण स्वतः मूर्ख असल्याचें कबूल केलें तर लोक त्याला खात्रीनें शहाणा म्हणूं लागतील. "

कृ०—" तुला मुळीं कोणतीही गोष्ट पटावयचीच नाहीं, मला माहीत आहे. बाकी मला मात्र खरोखरच तुझी एकदां परीक्षा पहावयाची आहे कीं तुला राग तरी केव्हां व कोणत्या गोष्टीचा येतो. "

के०—" कोणी सांगावें ? परमेश्वराची कृपा असली तर असा सुप्रसंग लवकरच जुळून येण्यास कांहीं हरकत नाहीं. बरें. चल बरं आता. आतां कांही तुझ्या अंगात ताप नाहीं. "

कृ०—" काय करील विचारा ? मात्राच जालीम मिळाली. तेव्हां त्याला आपलें तोंड काळें करावेंच लागलें. "

के०—" आतां अगोदर माझ्या घरीं जाऊन चहा घेऊं; आणि तेथूनच परस्पर सरदारगृहांत जाऊं. "

कृ०—" होय बुवा. या माझ्या नादांत मला त्या गोष्टीचें विस्मरणच पडलें होतें."

वाचक जरासे बुचकळ्यांत पडलेले दिसतात. या लेकाच्यांचें सरदारगृहांत काय काम ? त्यांना तेथें या वेळीं जाऊन काय करावयाचें आहे ? वाचकहो, त्या वेळीं महाराष्ट्राचा–अथवा महाराष्ट्राचा कसला–अखिल भारतवर्षाचा आत्मा सरदार गृहांत तापाचे क्लेश भोगीत पडलेला होता. सर्व आयुष्यभर ज्यानें स्वतःकारितां अशी जवळ-जवळ कोणतीच गोष्ट केली नाही; स्वराज्य व स्वातंत्र्य या दोन शब्दांखेरीज ज्याच्या जिव्हेनें कधीं कोणता मंत्र जपला नाहीं; माझ्या देशाच्या गळ्याला लागलेला गुला-मगिरीचा पाश मला कसा तोडतां येईल याशिवाय कोणताही विचार ज्याच्या डोक्याला कधीं शिवला नाहीं–तो हिंदमातेचा सुपुत्र—भीष्माचार्यांप्रमाणें शरपंजरी पडला होता. अखिल आर्यावर्ताचे डोळे त्याच्याकडे लागले होते. त्या महाभाग लोक-मान्यांचें दर्शन घेण्याच्या उत्सुकतेनें वरील मित्रद्वय त्या ठिकाणीं जाणार होतें.

ठरल्याप्रमाणें दोघेही चहा घेऊन सरदारगृहांत आले. लोकमान्यांच्या भोंवतीं त्यांच्या मित्रमंडळीची, डॉक्टर लोकांची व आप्तेष्टांची खूपच गर्दी होती. तरी पण त्या दोघांस त्यांचें दर्शन घडण्यास फारसा त्रास पडला नाहीं. मृत्युशय्येवर पडलेल्या त्या राष्ट्रवीराचें तशा स्थितींत दर्शन घडल्यामुळें दोघांनाही पहिल्या झटक्याला दुःखाचा आवेग आल्यावाचून राहिला नाहीं. खरोखर एकाचें कर्ज दुसऱ्यानें देऊन जसें चालतें. तसें आयुष्याच्या बाबतींत चाललें असतें तर त्या दोघांनींही आपली इहलोकींची यात्रा मोठ्या आनंदानें आटोपून आपलें उरलेलें आयुष्य त्यांनीं त्या स्वातंत्र्यवीराला अर्पण केलें असतें. कृष्णा आपल्या स्वतःबद्दलच्या सर्व गोष्टी अजिबात विसरून गेला. त्याच्या डोक्यांत निराळेच विचार सुरू झाले.

'स्वतंत्रता देवीच्या गळ्यांतील हा ताईत तुटून पडणार काय? म्हातारे होऊन मृत्युशय्येवर पडणारे लोक कांहीं थोडे थोडके नाहींत. पण हा महात्मा म्हातारा कशानें झाला? याच्या दंडाला सुरकुत्या कशानें पडल्या? परकीय राज्यकर्त्यांच्या दंडाला दंड घांसून घांसून, अखेर त्यांतलें त्राण नाहींसे होऊन ते शिथिल झाले. यांची छाती कफानें डबडबल्यामुळें कमकुवत झाली आहे काय? छे–छे–राज्यकर्त्यांनीं सर्व जन्मभर छातीवर केलेले वज्रांचे आघात सोसून सोसून अखेर पार थकल्यामुळें ती कमताकद झाली आहे. त्यांचा मेंदु आपल्या जिनगीची कशी वासलात लावावयाची या चिंतेनें व्यथित झाला आहे काय? नाहीं. माझ्या देशाला स्वातंत्र्य कसें प्राप्त होईल याचा विचार करण्यांत मेंदूची सारी शक्ति खर्ची पडल्यामुळें तो हतबल झालेला आहे. अरेरे! आपले न्याय्य हक्क न्याय्य मार्गानें मिळविण्याचा प्रयत्न करीत असतां या वीराला तीन वेळ इहलोकच्या नरकाच्या यातना सोसाव्या लागल्या! सरकारचा करडा अंमल, स्वतंत्रता मिळविण्यासाठीं घरादाराची होळी करून घेण्यापेक्षां आपली स्वतःची मीठभाकर संभाळून गुलामगिरींत भूषण मानणारे स्वदेशबांधव, अशा दुहेरी दुःस्थितींत असतांही जो आपल्या स्वातंत्र्य-संस्थापनेच्या महत्तम ध्येयापासून यत्किंचितही ढळला नाहीं आणि ज्यानें आपल्या प्रत्यक्ष वर्तनानें "कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदा च न" हें तत्त्व अखिल भारतवर्षास पटवून दिलें, तो मृत्युमुखीं पडणार! "स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे," अशी आपल्यावर सत्ता चालविणाऱ्यांच्या समक्ष गर्जना करणारा सिंह तें मिळविल्यावांचूनच हें नश्वर जीवित संपविणार काय? परमेश्वरा, या हिंदभूच्या तिलकाला उदंड आयुष्य दे."

तेथें फार वेळ उभें रहातां येणें शक्य नव्हतें कारण कित्येक लोक दर्शन घेण्या-साठीं खोळंबून राहिलेले होते. दोघेही विषण्ण मनानें घरीं येण्यास निघाले.

**के०**—" कृष्णा, आपण आतां येथें आलों म्हणून बरें झालें कीं नाहीं? नाहीं तर तूं आपला स्वतःबद्दलच्या विचारांच्या तंद्रीत घरींच बसून राहिला असतास!"

**कृ०**—" अगदीं खरें म्हणालास. दुसऱ्या कोणी हा उपकार माझ्यावर केला असता, तर त्याचे आभार मानण्यावांचून मला गत्यंतर नव्हतें. माझा तर आतां अगदीं पक्का निश्चय झाला कीं ज्या ज्या वेळीं राष्ट्रासाठीं कांहीं तरी करण्याची संधि येईल त्या त्या वेळीं ती साधल्याशिवाय रहावयाचें नाहीं. इतकेंच नव्हे तर तसा सुप्रसंग उत्पन्न करण्याचाही प्रयत्न करावयाचा. नाहीं तर अशा पुण्य पुरुषाचें दर्शन घेण्यापासून काय लाभ? तुला नाहीं कां माझ्यासारखेंच वाटत?"

**के०**—" खरोखर वाटतं. देवदर्शन करून यायचं आणि पुनः कोरडे शंख ते शंखच असें काय कामाचें? मी तुला एकदाच सांगतों कीं जिकडे तूं तिकडे मी. मी तुला आजपर्यंत कित्येक वेळा सांगितलें आहे, तेंच आज अखेरचें सांगतों. माझा तुझ्यावर इतका बालंबाल विश्वास आहे कीं तूं जें कांहीं करशील किंवा करण्याचें ठरवशील त्यांत गर्ह्य असें कांहीं असणें शक्य नाहीं, अशी माझ्या दिलाची खात्री आहे त्याचप्रमाणें तुझ्याबद्दल माझ्या अंतःकरणात इतकें प्रेम आहे कीं तूं सांगशील तें करायला मी कधींही मागेंपुढें पहाणार नाहीं. राष्ट्रकार्यासंबंधानें तर बोलाय-लाच नको. कारण शक्य तें व शक्य तितकें राष्ट्रकार्य करणें हें अखिल हिंदवासी-यांचें कर्तव्यच आहे. अर्थात् ही जाणीव सर्वांनाच असते, असें नाहीं; व ज्यांच्यामध्यें ती वास करीत असते, ते त्याप्रमाणें करण्यास तयार होतातच असेंही नाहीं. तरी पण असल्या प्रकारचे जे पशुवजा मानव पृथ्वीच्या पाठीवर नांदत आहेत त्यांच्याशीं आपल्याला करावयाचें काय? आपल्याला जातिवंत मर्दाशींच फक्त कर्तव्य आहे, तसें स्वतः होण्याच्या प्रयत्नाला लागणें हा आपला धर्म आहे आणि तो यथासांग पाळण्याचा माझा कृतसंकल्प झाला आहे."

**कृ०**—" तुझे आतांचे हे शब्द तुझ्यासंबंधींच्या माझ्या प्रेमाला भरती आणीत आहेत. तुला थिल्लर म्हणणाऱ्यांना मी आजपर्यंत मूर्ख म्हणत आलों तें कांहीं उगाच नाहीं. इतके उच्च विचार तुझ्या डोक्यांत नांदत असतां लोकांनीं तुला पोरकट म्हणावें, याचें तुला कांहीं वाटत नाहीं का?"

के०—बिलकुल नाहीं. उलट मला यांत एक प्रकारचें भूषण वाटतें लोकांनीं "दगड–दगड–"म्हणून हिणविलें असतांना पहिला नंबर पटकाविण्यांत जी लज्जत आहे, जें काव्य आहे तें कांहीं आपल्या हुषारीसंबंधानें सर्वांची खात्री असतांना मिळविलेल्या यशांत नाहीं."

कृ०—" असें जरी असलें तरी असल्या प्रकारच्या पोरकट किंवा जरा कठोर शब्दात बोलावयाचें म्हणजे टवाळ मनुष्यानें एखादी चांगली गोष्ट केली तरी ती त्याच्या हातून चुकून झाली असली पाहिजे किंवा त्यांत त्याचें कांहीं तरी ढोंग असलें पाहिजे, असल्या प्रकारचा जनापवाद पदरीं येण्याचा जबरदस्त संभव असतो. सर्वांनीं दगड ठरविलेला मुलगा परीक्षेंत पहिला आला तर त्यानें कॉपीच केली असली पाहिजे, यानें एक्झॅमिनरला पैसेच चारले असले पाहिजेत वगैरे प्रकारचे आरोप ज्याप्रमाणें त्याच्यावर लादले जातात, त्याचप्रमाणें पोरकट ठरलेल्या माणसानें एखाद्या उदात्त मनोवृत्तीचा म्हणून गणल्या जाणाऱ्या माणसालाही लाजेनें मान खालीं घालावी लागेल अशी गोष्ट करून दाखविली तर लोकांचीं तोंडें त्याच्याविषयीं हवें तें बरळूं लागण्याचा संभव नाहीं का ? त्यापेक्षां मूळांतच लोकांचा आपल्याविषयीं निष्कारण गैरसमज होऊं नये, अशा तऱ्हेनें आपण वागणें बरें नव्हे का ?"

के०—" तें बरें असलें तरी हेंही कांहीं वाईट नाहीं, असें मला वाटतें. लोकांच्या करितां नाहीं तरी आपल्याला थोडेंच कांहीं करावयाचें आहे ? ते बरें म्हणतील कीं वाईट म्हणतील ही फिकीर जर आपल्याला असेल तर त्या गोष्टीसंबंधानें विचार करावयाचा ! आणि त्यांतूनही लोकांची समजूत अशा बाबतींत खोटी ठरणें, यांत ते लोकच जबाबदार असतात. माणसाच्या वरपांगी वर्तनावरून ते त्याची आपल्या मनांत परीक्षा करतात आणि हा कशा प्रकारचा मनुष्य असला पाहिजे याबद्दल आपल्या मनाचा कायमचा ग्रह करून घेतात. त्याच्या अंतरंगाची परीक्षा करण्याच्या भानगडींतच ते पडत नाहींत. आणि म्हणून अशा माणसाच्या हातून एखादें चागलें कृत्य झालें तर त्यांना चमत्कार वाटतो व ते आपल्या मनाचें समाधान करून घेण्यासाठीं कांहीं तरी बोलूं लागतात. अशा प्रकारच्या झालेल्या गैरसमजुतीनें आपल्यावर करण्यांत आलेली टीका ज्या कोत्या अंतःकरणांला दुखवीत असेल, त्यांनीं पाहिजे तर अगोदरपासून आपल्याविषयीं लोकाचा गैरसमज होऊं न देण्याची खबरदारी बाळगावी. माझें मन पुरें बनलेलें आहे. अशा लोकांनीं माझ्यावर कांहींही टीका केली व ती कितीही

कुत्सितपणाची असली तरी मी बिलकुल पर्वा करणार नाहीं व तिला कवडीचीही किंमत देणार नाहीं. ”

**कृ०**—“ म्हणजे असल्या प्रकारची खबरदारी बाळगणारी माणसें कोत्या मनाची असतात, असें तुझें म्हणणें ? ”

**के०**—“ नाहीं. असें माझें म्हणणें नाहीं. पण लोक आपल्याबद्दल काय ग्रह करून घेतील या भीतीनें त्यांना दबूनच प्रत्येकानें सदैव वागलें पाहिजे असें मात्र मला वाटत नाही. मी तरी निदान तसा वागणार नाहीं हें खास. ”

त्यांचें इतकें बोलणें होत आहे तों केशवाचें घर आल्यामुळें तें तेवढेंच राहिलें. जातांना ‘ आतां तूं आपल्या गोष्टीचा विचार करीत डोकेंफोड करीत बसूं नकोस हं,–’ एवढें कृष्णाला बजावण्यास मात्र केशव विसरला नाहीं.

शनिवारीं रात्रीं सर्व डॉक्टर वैद्यांनी एकमुखानें सांगितलें कीं आतां ही केस आमच्या आटोक्यावाहेरची आहे. उद्यांची पहाट नजरेस पडली तर हिंदुस्थानचें सुदैवच म्हणावयाचें. त्याच प्रमाणें झालें. रविवार तारीख १ ऑगस्ट १९२० रोजीं पहाटे सर्व सरदारगृह कांहीं वेळ पर्यंत दारुण दुःखाच्या विलापांनी हादरून गेलें. परंतु भोंवतालचीं सर्व माणसें जाणतींच असल्यामुळें त्यांनीं महत्प्रयासानें आपला दुःखावेग दाबला. अखिल मुंबापुरींत हँडबिलें वाटली गेलीं. हां हां म्हणतां सरदारगृहाच्या भोंवतालची जागा माणसांनीं नुसती फुलून गेली.

दुपारीं लोकमान्यांच्या शवाची मिरवणूक निघाली. प्रेतदहनविधि चौपाटीवर करण्यास खास परवानगी मिळविण्यांत आली होती. सरदारगृहापासून चौपाटीपर्यंत सारे रस्ते अगदीं आंखून टाकण्यांत आले होते. शवाला हिंदु, मुसलमान वगैरे कोणत्याही जातीचा भेदाभेद न मानतां सर्व जातींतील व ज्ञातींतील लोक खांदा देत होते. बरोबर जमाव तर इतका होता कीं तसल्या प्रकारचा जमाव मुंबईत प्रथमच दिसला असेल. लोकांची गर्दी बरीच होणार हें पूर्वीपासूनच माहीत असल्यामुळें लोकांमध्यें शांतता कायम ठेवण्याकरितां पोलीस शिपाई व इन्स्पेक्टर्सही हजर होते. ते कशासाठींही आलेले असले तरी जिवंतपणीं ज्याप्रमाणें लोकमान्यांच्या मागें त्यांचा अष्टौ प्रहर ससेमिरा असे त्याप्रमाणें त्यांच्या निधनानंतरही त्यांच्या शवाच्या सुद्धां हालचालीवर सक्त नजर ठेवण्यासाठीं या त्यांच्या सोबत्यांना पाठविण्यांत आलेलें आहे कीं काय असे कित्येकांना वाटल्याशिवाय राहिलें नाहीं.

लोकमान्यांच्या भक्तांच्या डोळ्यांतून अखंड वहाणाऱ्या अश्रूंच्या धारांची पर्जन्य साथ करीत होता. इतक्या लोकांच्या लोकमान्यांवरील निरपेक्ष प्रेमामुळें गहिंवरून गेल्यामुळें त्याचें दुःख पाहून देवांच्या नेत्रांतून ते दुःखाश्रु गळत होते कीं लोकसेवेच्या रूपानें आपली सेवा करणारा आपला भक्त आपल्या पायांशीं येऊन रुजू झाला म्हणून परमेश्वराच्या डोळ्यांतून आनंदाश्रूंचा पाऊस पडत होता, हें सांगणें मानवी बुद्धीच्या बाहेरचें आहे.

हळु हळु सर्व मंडळी दहनस्थलाशीं येऊन पोहोंचली. लोकमान्यांच्या थोर योग्यते-प्रमाणेंच त्यांच्या शरिराचें दहन करण्यांत आलें.

हिंदुस्थानच्या या अनभिषिक्त राजाला लाभलेलें जनतेचें प्रेम आजपर्यंतच्या कोणत्याही अभिषिक्त बादशहाच्या वांट्यास आलें नसेल.

इतक्या थोर योग्यतेचा पुढारी आतां हिंदुस्थानला आणखी किती वर्षें लाभणार नाहीं न कळे अशा दारुण निराशेच्या विचारानें लोकांचीं मनें विपण्ण झालीं. दुःखित अंतःकरणानें सर्व लोक घरोघर निघून गेले.

सर्व बाजूंनीं निराशाजनक परिस्थिति प्रत्यक्ष दिसत असतांही केवळ कर्तव्य ह्मणून स्वातंत्र्यासाठीं तळहातावर शिर घेऊन आपल्याकडून होईल तितका आटोकाट प्रयत्न करणारा हिंदुस्थानचा मोहरा हरपला. आशेचा सूर्य मावळून सर्वत्र भीषण निराशेचा गडद अंधःकार पसरला.

---

# प्रकरण ४ थें.

महर्षि दादाभाई नौरोजी व नामदार गोखले हे हिंदुस्थानांतील दोन महापुरुष दिवंगत झाले तेव्हां सर्व शाळा व कॉलेजें दुखवट्यानिमित्त बंद ठेवण्यांत आलीं होतीं हें केशवाच्या लक्षांत होतें म्हणून सोमवारीं जेवण आटोपल्याबरोबर तो कृष्णाकडे आला. कृष्णा नुकताच जेऊन आला होता. पण त्यानें अंगांतून कपडे काढले नव्हते. केशवानें आल्याबरोबर कोटटोपी काढली व सतरंजीवर आपलें अंग ताणून दिलें.

कृ०—" कां रे केशव, आज तुला काय रविवार वाटला कीं काय ? "

के०—" रविवारांत आणि आजच्या वारांत फरक असला तरी रविवारीं आपलें कॉलेज बंद असतें, तसें तें आजही बंद असणार, हें खरें नाहीं काय ? "

कृ०—" मला वाटलेंच कीं तुला असें वाटत असेल म्हणून ! "

के०—" वाटत असेल म्हणजे ? माझी खात्रीच आहे तें बंद असणार म्हणून. आपल्या शाळेंतील दिवस तूं विसरलास वाटतें ? दादाभाई नौरोजी व ना. गोखले वारले, त्यावेळीं आपल्या शाळा बंद ठेवण्यांत आल्या नव्हत्या का ? "

कृ०—" होय. त्यावेळीं बंद ठेवण्यांत आल्या होत्या हें माझ्या लक्षांत आहे. पण त्या या वेळीं बंद ठेवण्यांत येतीलच असें मात्र वाटत नाहीं "

के०—" म्हणजे दादाभाई किंवा गोखले याच्यापेक्षां टिळकांचा दर्जा कमी होता कीं काय ?—"

कृ०—" त्यांच्या दर्ज्याची गोष्ट कशाला हवी ? सरकारलाही त्यांची थोर योग्यता मनांत पटल्याशिवाय राहिली नसेल. पण जनांत ती उघड करून दाखविण्याइतका मनाचा थोरपणा तें दाखविणें शक्य नाहीं. कारण तसें न करणें हेंच त्याच्या राजनीतीला धरून आहे. परतंत्र राष्ट्रांतील कोणी स्वातंत्र्यभक्त आपल्या देशाच्या स्वातंत्र्यसंपादनाप्रीत्यर्थ प्रयत्न करूं लागला तर त्याचे देशबांधव त्याला देशभक्त म्हणून गौरवीत असतात. पण त्याच वेळीं राज्यकर्त्यांना त्याचें तें करणें आवडत तर नाहींच पण उलट राजद्रोहाचा आरोप त्याच्या कपाळावर लादून चोरदरवडेखोरांच्या बरोबरीनें ते त्याला तुरुंगांत डांबून ठेवतात. लोकमान्यांवर तर असा प्रसंग तीनदां आला होता. गुलाम झालेल्या राष्ट्रांत देशभक्ति हा नेहमीच गुन्हा समजला जातो; आणि अशा दृष्टीनें पाहिलें असतां ज्या माणसाला राजद्रोहाच्या आरोपावरून आपणच शिक्षा केली त्याच्याबद्दल आदर किंवा त्याच्या निधनाबद्दल दुःख सरकार दाखविणें शक्य तरी आहे का ?"

के०—" म्हणजे दुखवट्यानिमित्त आपले कॉलेज आज बंद ठेवलें नसेल असें तुझें म्हणणें ?"

कृ०—" होय. मला अशी खात्री वाटते. "

के०—" तुझ्या म्हणण्याप्रमाणें आज आपलें कॉलेज उघडेच ठेवण्यात येणार असलें तरी मी आज तिकडे वळणारसुद्धां नाहीं. आज मी दुखवट्याचा दिवस पाळणारच. "

**कृ०**—" हेंच तुझें चुकतें तें. समज तूं आणि मी आतां घरी राहिलों तर तिकडे कॉलेज बंद पडेल असें तुला वाटतें का ? "

**के०**—" न पडेना ? त्याच्याशीं आपल्याला काय करायचें आहे ?"

**कृ०**—" असें म्हणून कसें चालेल बाबा ? एवढ्यानेंच आपलें कर्तव्य संपत नाहीं. कॉलेजच्या अधिकारी वर्गाला कॉलेज बंद करायला आपण भाग पाडलें पाहिजे."

**के०**—" हां–हां– असें म्हणतोस होय ? कबूल आहे मला हें तुझें म्हणणें "

दोघांनींही कॉलेजचा रस्ता सुधारला. लेक्चर्स सुरू होण्याला अद्यापि वीस पंचवीस मिनिटें अवधि होता. तेवढ्यांत या दोघांनीं प्रोफेसर्स् व फेलोज् यांची भेट घेतली. त्यांतील बऱ्याच जणांचा त्यांना रुकार मिळाला. विद्यार्थीवर्ग तर अनुकूल होताच. त्या सर्वांच्या सह्या घेतल्या व कृष्णा स्वतः प्रिन्सिपाल साहेबांना भेटण्यास त्यांच्या खोलींत गेला.

कॉलेजचा प्रिन्सिपॉल युरोपिअन होता. तेव्हां कृष्णाला आपल्या प्रयत्नांत यश येण्याची फारशी आशा वाटत नव्हती. तरी पण तो त्यांच्या खोलींत शिरलाच. प्रिन्सिपॉलसाहेब फार धूर्त व समयसूचक होते. आजच्या प्रसंगाची त्यांनीं कालच अटकळ करून ठेवली होती. म्हणून नेहमींपेक्षां जरा लवकरच कॉलेजांत येऊन त्यांनीं नोटिसही लिहून ठेवली होती. तीत " हिंदुस्थानांतील एक जाडा विद्वान दिवंगत झाल्यामुळें आज कॉलेज बंद ठेवण्यांत येईल व त्यांच्या निधनानिमित्त ११–३० ला दुःखप्रदर्शक सभा भरविण्यांत येईल, तेव्हां सर्वांनीं हजर रहावें, " असा मजकूर लिहिलेला होता. त्यांनीं आपली सही मात्र अजून केली नव्हती. समजा, कॉलेज बंद करण्याविषयीं आपल्याला कोणी विनंतीच केली नाहीं तर ?

कृष्णाला ते चांगलेच ओळखीत होते.

**प्रिन्सि०**—" मिस्टर परांजपे, काय काम आहे आपलें ? "

**कृ०**—" माझें स्वतःचें असें कांहीं काम नाहीं. एवढा विनंतीअर्ज मी आपणाकडे घेऊन आलों आहें. आमच्या या विनंतीचा आपणाकडून अनादर केला जाणार नाहीं, अशी मला आशा आहे. "

प्रिन्सिपॉलसाहेब किंचित् हंसले व म्हणाले, " मिस्टर परांजपे, तुम्ही हे उगीच कष्ट घेतलेत ! "

**कृ०**—" म्हणजे ? आपण आमची ही विनंति मान्य करण्यास तयार नाहीं ? "

**प्रिन्सि०**—" समजा तयार नसलों तर तुम्ही पुढें काय करावयाचें ठरविलें आहे ? "

**कृ०**—"कॉलेजच्या बाहेर पडून प्रोटेस्ट मीटिंग भरविण्याचें आम्ही ठरविलें आहे.–"

**प्रिन्सि०**—" शाबास ! या तुमच्या धीटपणाच्या उत्तरामुळें माझा तुमच्यावरील लोभ द्विगुणित झाला आहे. हें उत्तर तुम्ही इतक्या स्पष्ट रीतीनें देण्यास कचरलां असतात तर निव्वळ अभ्यासांत हुषार पण मनानें दुबळा म्हणून तुमची मला कींवच करावी लागली असती. पण मला एक मात्र वाईट वाटतें. मघांशीं मी तुम्हाला ' हे तुम्ही उगीच कष्ट घेतलेत ' असें म्हटलें, त्याचा तुम्ही भलताच अर्थ केलात. आज कॉलेज बंद करण्याकरितां मला विनंती करण्याचें तुम्हाला कांहींच कारण नव्हतें,–" असें म्हणून आपण लिहिलेली नोटिस त्याला वाचण्यास दिली. कृष्णाही कांहीं बावळट नव्हता. त्यानें तेव्हांच ओळखलें कीं आपण जर हा अर्ज घेऊन आलों नसतों तर त्या नोटिशीची वेस्ट पेपर बास्केटमध्येंच रवानगी झाली असती.

**कृ०**—"याबद्दल आम्ही सर्व आपले फार आभारी आहोंत. पण ही नोटीस वाचल्यानंतर आतां मला स्वतःला आपल्याला एक विनंति करावीशी वाटते–"

**प्रिन्सि०**—" बोला कोणती ती–"

**कृ०**—" हिंदुस्थानांतील एक जाडा विद्वान, असें आपण त्या नोटिशींत लिहिलें आहे, त्याऐवजीं हिंदुस्थानचा एक थोर राष्ट्रभक्त किंवा थोर पुरुष असें लिहिलें तर तें मला वाटतें अधिक प्रयोजक होईल. "

**प्रिन्सि०**—" एक जाडा विद्वान म्हणजे एक थोर पुरुषच नव्हे काय ? "

**कृ०**—" तसें कदाचित् असलें तरी लो. टिळक जर नुसतेच जाडे विद्वान असते तर आजचा हा विनंति अर्ज आम्ही आपल्याकडे घेऊन आलोंच नसतों. प्रत्यहीं हिंदुस्थानांत अनेक विद्वान प्राणास मुकत असतील. परंतु विद्वत्तेपेक्षांही जो एक दैवी गुण लोकमान्यांच्या अंगीं वास करीत होता, त्यामुळें आम्ही त्यांना थोर मानतों, त्यांच्या विद्वत्तेकरितां मानीत नाहीं. "

**प्रिन्सि०**—" विद्वत्तेपेक्षांही उच्च दर्ज्याचा असा कोणता गुण त्यांच्या अंगीं होता, असें तुमचें म्हणणें आहे ? "

कृ०—" स्वातंत्र्यप्रेम !-अलौकिक दैवी स्वातंत्र्यप्रेम !—"

प्रिन्सि०—" स्वातंत्र्यप्रेम हें नेहेमींच दैवी असतें. "

कृ०—" मुळींच नाहीं. आपण स्वतः मात्र स्वतंत्र असावें व इतर जगानें आपल्या गुलामगिरींत सदा सर्वकाळ राबत असावें, अशी ज्यांची बुद्धि असेल, त्यांच्या स्वातंत्र्यप्रेमाला दैवी कसें म्हणतां येईल ? कै. टिळकांच्या स्वातंत्र्य-प्रेमाला मी दैवी म्हणतों याचें कारण असें कीं आपण स्वतः स्वातंत्र्याचें स्वर्गीय सुख उपभोगावें व इतर लोकांनीं जन्मभर आपल्या गुलामगिरींत खितपत पडावें, अशी त्यांची स्वातंत्र्याची असुरी व्याख्या नव्हती. तर दुसऱ्यांच्या गुलामगिरींत सडत पडलेल्या आपल्या देशाला स्वतंत्र करावें, एवढीच त्यांची इच्छा होती: आणि ही इच्छा ईश्वरी कायद्याला सर्वस्वी धरूनच नाहीं काय ? "

प्रिन्सि०—" होय. तुम्ही म्हणतां ती गोष्ट मलाही पटते. परंतु ती मला पटत असली तरी ती मला इतक्या उघड रीतीनें उघडी करून दाखविणें इष्ट नाहीं. त्यांच्या अंगीं तुमच्या म्हणण्याप्रमाणें स्वातंत्र्यप्रेम व इतरही उच्च सद्गुण वास करीत होते हें मलाही कबूल आहे. पण माझी अशी कल्पना किंबहुना खात्री आहे कीं विद्यार्थीवर्गाला मुख्यतः त्यांच्या विद्वत्तेपासून मिळणाऱ्या लाभाचीच जरुरी आहे. तेव्हां त्याच धोरणानें मी ही नोटीस लिहिली आहे.—"

कृष्णानेही विचार केला कीं झालें एवढें पुष्कळ झालें. मीटिंगला सुरवात तर होऊं द्या. मग आपलें म्हणणें सर्वांपुढें मांडण्याला आपल्याला संधि मिळणारच आहे.

कृ०-" आमच्या विनंतीला मान देऊन आपण आपल्या मनाचा जो दिलदार-पणा दाखविला, त्यावद्दल सर्व विद्यार्थ्यांतर्फे मी आपले आभार मानतों. "

प्रिन्सि०—" आभार मानण्याचें कांहींच कारण नाहीं. मी ते आपलें कर्तव्यच समजतों.—"

नोटिशींत लिहिल्याप्रमाणें कॉलेजच्या मुख्य हॉलमध्यें तमाम विद्यार्थीवर्ग जमला प्रिन्सिपॉल साहेबांनीं अगदीं गंभीरपणें सभेचा उद्देश सांगून कांहीं प्रोफेसर्सना बोल-ण्यास विनंति केली. बहुतेकांच्या भाषणांत ' आर्क्टिक होम् ऑफ दि वेदाज्' ' ओरा-यन ' व ' गीतारहस्य ' या तीन अलौकिक व सर्वमान्य ग्रंथांची स्तुति भरलेली होती. आणि ते ग्रंथ स्तुतीस पात्रच आहेत यांत कोणी शंकाही घेणार नाहीं. नंतर

विद्यार्थी वर्गातर्फे कोणास बोलावयाची इच्छा असल्यास बोलावें, असें प्रिन्सिपॉल साहेबांनीं सुचविलें. लगेच सर्व विद्यार्थी " मि. परांजपे-मि. परांजपे, " असें ओरडूं लागले. कृष्णावरील इतर विद्यार्थ्यांचें हें प्रेम पाहून लीलेला आनंदाचें भरतें आलें. तिनें सहज मालतीकडे पाहिलें, तों तिच्याही चेहेऱ्यावर कृष्णाबद्दल अभिमान व आदर स्पष्टपणें दिसत होता. प्रिन्सिपॉल साहेबांना थोडासा विचार पडला. कारण त्यांच्या रूममध्यें कृष्णाबरोबर झालेल्या त्यांच्या संभाषणावरून, त्याला बोलण्याची परवानगी दिल्यास तो कोणत्या धोरणानें बोलणार याचा त्यांना अंदाज होताच.

**प्रिन्सि०**—" सर्व विद्यार्थ्यांची मि. परांजपे यांचें भाषण ऐकण्याची इच्छा आहे तरी, " Late Mr. Tilak as a scholar " या आजच्या विषयावर त्यांनीं यऊन दोन शब्द बोलावे अशी विद्यार्थ्यांतर्फे मी त्यांना विनंति करतों. भाषण शक्य तितकें आटोपशीर असावें अशी माझी इच्छा आहे. " प्रिन्सिपॉल साहेबांच्या बोलण्यांतील मेख फक्त कृष्णा व केशव या जोडीच्याच लक्षांत आली. कृष्णा प्लॅटफॉर्मवर जाऊन उभा राहिला.

" प्रिय बंधुभगिनींनो, आपण सर्वांनीं माझें भाषण ऐकण्याची जी उत्सुकता दाखविलीत, तीबद्दल मी आपणां सर्वांचा फार आभारी आहें. पण एक तर मला लेक्चर्स देण्याची संवय नसल्यामुळें, माझें भाषण आपणांस कितपत पसंत पडेल, याची मला शंका वाटते; आणि दुसरें ह्मणजे आज व्याख्यानाकरितां जो विषय ठेवण्यांत आलेला आहे, त्या विषयावर तर मला दोन शब्दही बोलतां येण्यासारखे नाहींत. बोलायचेच ह्मणजे कांहीही बोलतां येईल. " Late Mr. Tilak as a scholar " हा व्याख्यानाचा विषय म्हणजे " Shivaji as a husband " या विषयासारखाच अप्रस्तुत विषय होय असें माझें म्हणणें आहे. विद्वत्ता हा सद्गुण आहे, त्याच प्रमाणें स्वस्त्रीशीं यावज्जन्म प्रतारणा न करणें व आपला पतिधर्म योग्य रीतीनें पाळणें हाही सद्गुणच आहे, याबद्दल दुमत असणें शक्य नाहीं. लोकमान्य विद्वान होते व शिवाजीमहाराज पतिधर्माचें उत्कृष्ट पालन करीत होते, या दोन्हीही गोष्टी अगदीं खऱ्या आहेत त्यांत सत्याचा अपलाप बिलकुल नाहीं. पण शिवाजी महाराजांना आपण जे अवतार म्हणून मानतों ते त्यांच्या अंगीं असलेल्या या गुणामुळें कीं काय हा सवाल आहे त्याचप्रमाणें कै. लोकमान्य टिळकांची योग्यता आपण फार थोर समजतों, ती त्यांनीं लिहिलेल्या ग्रंथांमुळें कीं काय ?

माझी तर अशी खात्री आहे कीं लोकमान्यांनीं इतर व्याख्यात्यांनीं उल्लेख केलेले तीन ग्रंथ लिहिले नसते, तरी देखील त्यांच्या योग्यतेंत यत्किंचितही फरक पडला नसता."

सर्व विद्यार्थ्यांनीं आपल्याला हें म्हणणें तंतोतत पटतें असें दर्शविण्याकरितां टाळ्यांचा कडकडाट केला. प्रि० साहेब उठून उभे राहिले.

**प्रिन्सि०**—" मि० परांजपे विषयाला सोडून बोलूं लागले आहेत तसें न करण्याविषयीं माझी त्यांना सूचना आहे."

**कृ०**—" माझी कल्पना होतीच कीं विषयांतर केल्याचा आरोप माझ्यावर लादण्यांत येईल. पण मला आपणांला पुनः हेंच सांगावयाचें आहे कीं आजचा विषय हा ज्या पुरुषाविषयीं आपणास बोलावयाचें आहे त्याचा विचार केला असतां खरा विषयच नव्हे. तेव्हां मी विषयांतर केले किंवा करीत आहें हा माझ्यावरील आरोप आपोआपच खोटा पडतो. म्हणजे माझ्या म्हणण्याचा आशय असा नव्हे कीं देशाभिमानाला विद्वत्तेचें वावडें असतें. त्या माणसाच्या विद्वत्तेचा जर देशालाच उपयोग होत असेल तरच त्या विद्वत्तेचा गौरव करण्यास आम्ही तयार आहोंत. त्याच्या अगाध ज्ञानाचा फायदा जर आमच्या देशाचा घात करणारांस होणार असेल तर असल्या देशद्रोही विद्वानापेक्षां देशाच्या स्वातंत्र्याप्रीत्यर्थ अहोरात्र झटणाऱ्या एखाद्या निरक्षर माणसालासुद्धां आम्ही अधिक किंमत देऊं हें सांगण्याचा माझा भाव आहे. मलाही असें वाटतें कीं देशाभिमानाच्या जोडीला एखाद्याच्या अंगीं विद्वत्ता असेल तर त्याचा राष्ट्राला निःसंशय अधिकतर उपयोग होईल. तरीही या दोन गुणांपैकीं आम्ही खरें महत्व त्याच्या विद्वत्तेला न देतां देशाभिमानालाच देणार. श्रीशिवाजी महाराज यांची किंमत ज्याप्रमाणें त्यांनीं महाराष्ट्राला स्वातंत्र्य प्राप्त करून दिलें यात आहे, त्याचप्रमाणें के. लोकमान्यांची योग्यता आपल्या देशाला स्वतंत्र करण्यासाठीं त्यांनीं जे आमरण प्रयत्न केले व तत्प्रीत्यर्थ कष्ट सोसले यांत आहे, त्यांनीं लिहिलेल्या ग्रंथांत नाहीं."

**प्रिन्सि०**—" मी मि. परांजपे यांना आपले भाषण बंद करण्यास फर्मावतों."

**सर्व विद्यार्थी**— " बोलूं द्या—त्यांना पुढें बोलूं द्या."

**प्रिन्सि०**—" निव्वळ तुम्हा सर्वांच्या विनंतीचा अव्हेर करावयाचा नाहीं म्हणूनच मी. मि. परांजपे यांना आपण अद्यापि विद्यार्थी दशेंत आहों याची जाणीव ठेवून फक्त दोनच मिनिटें बोलण्याची परवानगी देत आहें."

**कृ०**—" मी विद्यार्थी दशेंत आहें याची पूर्ण जाणीव ठेवूनच मी आतांपर्यंत बोललों. विद्यार्थ्यांना राजकारणाशीं काय करावयाचें आहे, असा पुष्कळांना प्रश्न पडतो. माझें असें म्हणणें आहे कीं हें विद्यार्थ्यांचेंच काम आहे. थोर पुरुषांच्या पावलावर पाऊल टाकण्याचा प्रयत्न आमच्यासारख्या तरुण विद्यार्थ्यांनीं करावयाचा नाहीं तर काय ज्यांच्या गोंवऱ्या स्मशानांत रवाना झाल्या आहेत अशा जख्खडांनीं करायचा ? आपल्या स्वतःच्या डोळ्यांना आपल्यासाठीं उघडण्यांत आलेलें तुरुंगाचें दार दिसत असतां निधड्या छातीनें ' स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे व मी तो मिळविणारच, ' अशी गर्जना करणाऱ्या नरवीरानें जगांतील वाङ्मयांत एकाही ग्रंथाची भर घातली नसती तरी त्यांत आम्हाला यत्किंचितही कमीपणा वाटला नसता. विद्वानाची योग्यता राजापेक्षांही अधिक मानण्यांत आली असली तरी मला वाटतें ती स्वतंत्र देशांतील विद्वानाची मानण्यांत येत असावी. पारतंत्र्यांत सडत पडलेल्या देशांत विद्वानांपेक्षां राष्ट्रभक्तांचीच योग्यता अधिक मोलाची समजली जाते. परक्यांच्या गुलामगिरींत रखडत असलेल्या राष्ट्रांच्या अंतःकरणांत आपल्याला पारतंत्र्यांत ठेवणाऱ्या व ठेवूं इच्छिणाऱ्या राज्यकर्त्यांविषयीं स्नेह व सहानुभूति उत्पन्न होणें हें स्वातंत्र्यसंस्थापनेच्या दृष्टीनें अत्यंत विघातक असतें. तसें होऊं न देण्याची लोकमान्यांनीं फार खबरदारी घेतली व देशांत जेणेंकरून स्वातंत्र्यप्रीति वाढेल अशा प्रकारचे प्रयत्न आमरण केले व या त्यांच्या कर्तबगारीमुळेंच आम्ही हिंदवासीय त्यांना आमच्या देशाचा ' स्वातंत्र्यवीर ' म्हणून मानतों व पुढेंही मानूं. "

**प्रिन्सि०**—" आतां याहून अधिक बोलूं देण्यास मी तयार नाहीं. "

**कृ०**—" माझीही या प्रसंगीं याहून अधिक विस्तारानें बोलण्याची इच्छा नाहीं. "

**प्रिन्सि०**—" सभेचें काम संपलें असल्याचें मी जाहीर करतों. "

सर्व विद्यार्थ्यांनी कृष्णाची पाठ थोपटली. लीला व मालती यांना तर त्याचें इतकें कौतुक वाटलें कीं त्या किती वेळ तरी त्याच्याकडे नुसत्या पहात उभ्या होत्या. पण बरोबरीच्या इतर विद्यार्थिनी निघून गेल्यामुळें त्यांनाही जावेंच लागलें. केशवाला तर कृष्णाला कुठें ठेवूं, काय करूं, असें होऊन गेलें.

कृष्णानें बोलून दाखविलेले विचार इतर विद्यार्थ्यांपैकीं कोणाच्याच डोक्यांत आलेले नव्हते असें नाहीं. पण परसत्तेच्या अंमलानें त्यांचीं मनेंच इतकीं नेभळट बनून गेलीं होतीं कीं त्यांना पुढें येऊन इतक्या स्पष्ट रीतीनें ते सांगण्याचें धैर्यच होणें शक्य

नव्हतें. नुसते आपले विचार स्पष्टपणें बोलून दाखविण्याचें धैर्यही ज्या देशांतील तरुणांना होत नाहीं, तो देश कधीं काळी परमेश्वराच्या कृपेनें जर स्वतंत्र झालाच, तर तो अभूतपूर्व योगच म्हणावयाचा ! ज्या लोकमान्यांवरील आपलें निस्सीम प्रेम व्यक्त करण्यासाटीं आज ते सर्व जमले होते, त्यांचें सबंध चरित्र डोळ्यांसमोर असूनही त्यांना नुसतें तोडानें बोलण्याची सुद्धां भीति वाटावी, हें आश्चर्य नव्हे काय ?

---

# प्रकरण ५ वें.

वसंत आप्पासाहेबाच्या घरीं येऊन राहिल्याला आज तीनचार दिवस झाले होते. पूर्वी तो त्यांच्या घरीं पुष्कळ वेळां येत असे. तेव्हां मालतीची व त्याची चांगली ओळख झालेली असली तरी परस्परांना एकमेकांच्या स्वभावाची व गुणांची कांहीं विशेषशी माहिती नव्हती. वसंत अत्यंत स्वच्छील व त्याची वागणूक तर इतकी प्रेमळ व निष्कपटी असे कीं त्या थोडक्याशा अवधींत त्याची मालतीवर विलक्षण छाप पडली. मालतीचे सद्गुण पाहून वसंताचेंही मन तिच्याकडे आकर्षिलें जाऊं लागलें. दोन अविवाहित व अनुरूप तरुणतरुणींच्या निकट सहवासाचें प्रीतींत पर्यवसान होणें हें कांहीं सृष्टिधर्माला सोडून नाही. वसंताला पूर्वी देखील वाटत असे कीं मालती आपणाला सहचारिणी लाभली तर आपल्या भाग्याला जोड नाही म्हणून. पण हा विचार त्या वेळीं त्याच्या डोक्यांत ठाम खिळलेला नव्हता. बरेच वेळां असें त्याच्या मनांत येत असे इतकेंच. पण आतां दिवसाच्या चोवीस तासांतील बराचसा वेळ ह्याच विचारांत जाऊं लागला. आपल्याच प्रमाणें तिच्याही मनांत हेच विचार येत असतील का ? होय. खात्रीनें येत असेलच पाहिजेत. माझ्या पेक्षां अधिक योग्य असा कोणी वर असेल असें मला वाटत नाहीं. मी सुशिक्षित आहें, धनवान आहें, स्वरूपवान आहें, निर्व्यसनी आहें आणि सर्वांत विशेप म्हणजे नीतिमान आहे. या पेक्षां मालती सारख्या रत्नाची प्राप्ति करून घेण्याला आणखी कोणत्या सद्गुणाची आवश्यकता आहे ?

मालती आणि लीला कॉलेजांतून परत येत असतां त्यांचें कृष्णासंबंधींच बोलणें सुरू होतें. कृष्णा नुसता अभ्यासांतच हुषार नसून एक धडाडीचा तरुण आहे या

बद्दल त्या दोघींचेंही एकमत झालें. मालतीला इतर कोणाशीं बोलणें फारसें आवडत नसलें तरी लीलेशीं ती अगदीं मनमोकळेपणानें हवें तितकें बोलत असे. पण आज लीला ताईलाच एकसारखें बोलावें लागत होतें. मालती एक शब्दही बोलेना. तिच्या डोक्यांत कसले तरी विचार चालले होते हें लीलेनें केव्हाच ताडलें. ते विचार कोणते असावेत, हें लक्षांत येण्यालाही तिला फारसा अवधि लागला नाहीं. लीलेला मनांत-ल्यामनात फार आनंद झाला. पण आपल्या डोक्यांत काहींच आलें नाहीं असें मालतीला भासविण्यासाठीं तिनें आपल्या तोंडाची टकळी एकसारखी सुरू ठेवली होती. तिचें घर आल्यावर मी संध्याकाळीं तुझ्याकडे येईन, अगोदर बाहेर जाऊं नकोस, असें मालतीला सांगून ती आपल्या घरीं गेली.

मालतीच्या डोक्याला आजपर्यंत कधीं न शिवलेले विचार आज तिच्या हृदयांत स्फुरूं लागले तिला कृष्णाबद्दल विलक्षण आदर वाटूं लागला त्याचें दारिद्र्य सोडलें तर कोणाही मुलीनें त्याच्या गळ्यांत बेलाशक माळ घालावी असें तिला वाटूं लागलें. ‘ मीच त्यांच्याशीं विवाह करण्यास तयार झालें तर, ’ इश्श ! किती उल्लूपणाचे विचार येत आहेत डोक्यांत माझ्या ? मी हें कुठें बोलून दाखविलें तर लोक मला काय म्हण-तील ? मला वेड तर नाहीं लागलें ? एकदम माझ्या मनांत असले विचार येण्याला कृष्णरावानीं असें केलें तरी काय? देशसेवेला आम्ही इतर कोणत्याही सद्गुणापेक्षां अधिक महत्त्व देतों, असे ते म्हणाले, इतकेंच ना ? मग असें तोंडानें म्हणणारे हजारों लोक असतील ! म्हणजे काय ते सगळेच देशसेवक कीं काय ?

ती घरीं आली तों आप्पासाहेबांना झोंप लागली होती. वसंत एक पुस्तक हातांत घेऊन एका आरामखुर्चीवर पडला होता. वाचनाकडे त्याचें मुळींच लक्ष नव्हतें. आपल्याप्रमाणेंच मालतीच्या मनात प्रेमोद्भव झाला असेल का व आपण आपलें अंतःकरण तिला खुलें करून दाखविलें तर परिणाम काय होईल, याचाच तो एक-सारखा विचार करीत होता. मालतीला कालेजातून लवकर परत आलेली पहातांच त्याला आश्चर्य वाटलें.

**वसंत**—“ कां ? मालतीताई, डोकें बिकें दुखूं लागलें कीं काय ? ”

**मालती**—“ होय. डोकं थोडंसं जड झाल्यासारखें वाटत आहे खरं—पण त्यामुळें कांहीं मी कॉलेजांतून लवकर परत आल्यें नाहीं. आज कॉलेजच बंद ठेवण्यांत आलें आहे. ”

**वसंत**—" तें कां ? "

**मालती**—" लोकमान्यांच्या निधनानिमित्त "

**वसंत**—" लोकमान्यांच्या निधनानिमित्त कॉलेज बंद ? हें खूप आहे बुवा ! मला तर या लोकांचें आश्चर्य वाटतें. देशांतील एक मोठा मनुष्य नाहींसा झाल्याबद्दल कोणाला आनंद का होतो आहे ? सर्वांनाच वाईट वाटत आहे. म्हणून काय आपलें काम आपण करायचें नाहीं ? पहा आतां. इतक्या मुलांचा सोन्यासारखा दिवस फुकट गेला याबद्दल जबाबदार कोण ? नाहीं बुवा, आजारी पडल्यानंतर रोग्याला औषध दिल्यावर तो बरा होतो, तसें कॉलेज बंद ठेवून लोकमान्य आम्हाला परत मिळते तर गोष्ट निराळी होती. "

हें तो बोलत असतांना मालतीच्या चेहेऱ्याकडे पाहिल्यावर त्याला कळून आले कीं आपलें बोलणें हिला फारसें रुचत नाहीं, तेव्हां तो पुढें म्हणाला–

" म्हणजे माझें हें म्हणणें लोकमान्य या व्यक्तीबद्दल आहे, असें समजूं नका हं मालतीताई. माझें हें सरास म्हणणें आहे. व्हायच्या गोष्टी झाल्यानंतर विनाकारण आपला तरी अमूल्य वेळ फुकट कां दवडा ? मी तर याच्या अगदीं विरुद्ध आहे. "

**मालती**—" प्रिन्सिपॉल कॉलेज बंद ठेवणार होते कीं नाहीं कोण जाणे ! पण परांजप्यांनीं या बाबतींत पुढाकार घेऊन त्यांना तें बंद करण्यास भाग पाडलें. "

**वसंत**—" हे परांजपे कोणत्या वर्गात असतात ? "

**मालती**—" परांजपे म्हणजे ते आपल्याकडे तुम्ही आलांत त्या दिवशी जेवायला नव्हते का आले ? "

**वसंत**—" I see ! तो होय ? म्हणजे स्वारीच्या अंगांत हेही उपद्व्याप आहेत का ? शिक्षणाची आपल्याला फार हौस आहे, असें भासवून लोकांकडे वार लावायचे, आणि कॉलेजांत हे असे खेळ करायचे ? "

**मालती**—" असें काय म्हणतां वसंतराव तुम्ही ? आमचा सर्वांचा एक दिवस फुकट गेला हें तुमचें म्हणणें खरें धरून चाललें, तरी इतर कित्येक प्रसंगीं आमचे दिवस असे फुकट जातातच हेंही खरें नाहीं का ? कोणतीही थोर व्यक्ति मृत झाल्यावर तिच्यावरील आपला आदर व्यक्त करण्याकरितां शिक्षणसंस्था बंद ठेवण्याचा आजचा कांहीं पहिलाच प्रसंग नाहीं. तेव्हां परांजप्यानीं यांत कांहीं अघोर पातक केलें असें

मला नाहीं वाटत ! मला तर उलट त्यांनीं दाखविलेल्या धैर्याचें कौतुक वाटतें ! आतां तुम्ही म्हणता कीं त्यांना वारावर जेवावें लागतें, तेव्हां त्यांनी असल्या कोणत्या भानगडींत पडूं नये म्हणून ! पण ज्यांना वारावर जेवावें लागतें यांत ते गरीब आहेत, एवढेंच सिद्ध होतें. त्याचा अर्थ कांहीं त्यांना अंतःकरण नाहीं, किंवा इतरांना असलेल्या भावनांचा त्यांच्या ठायीं अभाव आहे, असा होत नाहीं."

आपलें बोलणें मालतीला आवडलें नाहीं, हें पाहून वसंतरावांना फार वाईट वाटलें. आपण उगीच असें बोललों असें त्याला वाटूं लागलें.

**वसंत**—" छे-छे-मालतीताई, माझें म्हणणें तुम्ही फार सीरिअस घेतलेंत. आपली परिस्थिति पाहून ज्यानें त्यानें वागावें एवढेंच माझें म्हणणें."

**मालती**—" दुःखप्रदर्शक सभेंत त्यांनीं भाषण देखील केलें."

कृष्णाबद्दल आपल्याही मनांत अगदींच सहानुभूति नाही असें नाहीं, असें दाखविण्याच्या हेतुनें वसंत म्हणाला,

" अरे वा ! तो वक्ताही आहे म्हणावयाचा ! शाबास ! मला कल्पनाही नव्हती."

**मालती**—" आणि थोडेंच पण असें सडेतोड बोलले कीं सर्व स्टूडन्ट्स् अगदीं खूष झाले. लोकमान्यांना आम्हीं थोर मानतों तें त्यांच्या विद्वत्तेमुळें नसून त्यांच्या देशाभिमानाबद्दल व त्यांनीं स्वातंत्र्याप्रीत्यर्थ केलेल्या स्वार्थत्यागाबद्दल, असें त्यांनीं अगदीं स्पष्ट बोलून दाखविलें."

**वसंत**—" बरोबर. अगदीं बरोबर. टिळकांना लोकमान्य ही पदवी याच त्यांच्या गुणामुळें मिळाली, त्यांच्या विद्वत्तेबद्दल कांहीं मिळाली नाहीं."

इतक्यांत आप्पासाहेब जागे झाले. वसंताला सांगितलेली हकीकत मालतीनें त्यांनाही सांगितली. त्यांना त्यांत विशेष असें कांहीं वाटलें नाहीं. कांहीं वेळानें मालती आपल्या खोलींत निघून गेली. आप्पासाहेबांच्या मनांत बरेच दिवस घोळत असलेली गोष्ट आज स्पष्ट बोलून टाकण्याचें त्यांनीं ठरविलें. मालती आपल्या खोलींत निघून गेल्यामुळें त्यांना वसंताशीं एकट्याशींच बोलण्याची आयतीच संधि मिळाली.

**आप्पा०**—" मग काय वसंत ? विलायतेला जाण्याचा तुझा बेत अगदीं नक्कीच झालेला आहे म्हणावयाचा ?"

**वसंत**—“ होय, आप्पा. ”

**आप्पा०**—“ सध्यांच तूं विलायतेला जाणें म्हणजे माझ्या दृष्टीनें त्यांत एक प्रकारची न्यूनता रहाणार आहे. ”

**वसंत**—“ ती कसली आप्पा ? ”

**आप्पा०**—“ उगीच उलटसुलट बोलून मग मुद्दा गांठण्याची मला संवय नाहीं आणि तसें मला आवडतही नाहीं. मी तुला मला वाटतें तें आपलें स्पष्टच सांगून टाकतों. तूं कांहीं मला कोणी परका नाहींस. अण्णांचा मुलगा म्हणजे माझाच मुलगा असें मी समजतों. ”

**वसंत**—“ अगदीं खरें आहे तुमचें म्हणणें. मी नाशकास असतांना अण्णा तुमच्याबद्दल माझ्याशीं किती वेळां तरी बोलत असत. त्यांना तुम्ही अगदीं सख्ख्या भावासारखे वाटतां; आणि खरोखर मीही तुह्माला अण्णांच्या जागींच मानतों. ”

**आप्पा०**—“ अरे हें कां मला माहीत नाहीं ? नाहीं तर मी तरी तुला एवढ्या हक्कानें येथें रहाण्यास बोलावूं शकलों असतों का ? बरें जाऊं दे तें. बोलतां बोलतां मुख्य मुद्दा विसरूनही जायचा मी चट्दिशीं. ह्मणजे तें असें कीं एकदां तुझे दोन हातांचे चार हात होऊन गेले असते ह्मणजे बरें होतें. ”

**वसंत**—“ क्षमा करा मला आप्पा. पण आतांच्या आपल्या या बोलण्यानें मला वाईट वाटलें. येथून परदेशीं शिक्षणासाठीं ह्मणून गेलेल्या पण तिकडील परिस्थितीच्या चमत्कारिक वातावरणांत सांपडल्यामुळें बहकून गेलेल्या कांहीं तरुणांचीं चित्रें आपल्या-समोर उभीं आहेत, ही गोष्ट मलाही नाकबूल नाहीं. पण मला नाहीं वाटत कीं तसल्या प्रकारच्या उल्लू तरुणांपैकीं मी एक आहें असें ! ”

**आप्पा०**—“ वेडा रे वेडा ! अरे मला असें कधीं तरी वाटेल का ? खरा तरुण आहेस. सपाट्यांत डोकें काम करूं लागतें. रक्तच गरम असतें ना या वयांत ? उतावळेपणानें विचार झाला म्हणून तूं तरी असें म्हणालास. नाहींतर म्हणतासच ना ! कारण तूं आतां बोललास तसें जर मला वाटत असतें तर तुला नुसतें “ विवाह कर आणि मग जा एवढेंच सांगून भागलें नसतें. तर विवाह करून उभयतांही जा ” असेंच सांगावें लागलें असतें. कारण परदेशांत जाऊन ज्याला बिघडायचेंच त्याच्या आड हिंदुस्थानांत त्याच्या विरहानें झुरत असलेली पत्नी कांहीं येऊं शकत नाहीं. तो बिघडायचाच. ”

**वसंत**—" खरंच आप्पा. तुमच्या अगदीं सरळ व साध्या म्हणण्याचा मी अविचारानें भलताच अर्थ केला, याबद्दल क्षमा करा मला पण तुम्ही हा विषय काढला, त्या अर्थीं तुम्हाला आणखी कांहीं तरी सांगावयाचें आहे हें अगदीं उघड आहे. तर सांगून टाका ना मला काय तें."

**आप्पा०**—" सागतों; अगदीं स्पष्टपणें सांगतों. मी तुला मघाशींच सांगितलें आणि तें तुलाही माहीत आहे कीं माझ्याजवळ आडपडदा नाहीं. सरळ आणि योग्य असेल ते आपलें स्पष्ट बोलून टाकावयाचें हा आपला माझा स्वभाव. अण्णांनीं आणि मी उभयतांनीं तूं आणि मालती अगदीं लहान असतांनाच तुम्हा उभयतांचा वाङ्निश्चय करून टाकला होता. पण पुढें मागें पश्चात्ताप करण्याची कोणालाच पाळी येऊं नये म्हणून तुम्ही दोघेंजण मोठीं झाल्यावर तुमची याला संमति मिळाली तरच तो कायम असें समजावयाचें असेंही आमचें ठरलेलें होतें. माझ्या दृष्टीप्रमाणें कदाचित् मी तिचा बाप असल्यामुळें असेल, मालतींत कोणत्याही प्रकारचें व्यंग तर दिसत नाहींच, पण मला ती म्हणजे सर्व सद्गुणांचें भांडार वाटते. तुला माळ घालण्यास ती सर्वथैव पात्र आहे, अशी मला खात्री वाटते. तिच्या अंगीं कोणत्याही प्रकारानें कमीपणा असता तर मी तुला खरोखरच सांगतों कीं हा विषयच मी तुझ्यासमोर काढला नसता आणि अण्णांनाही ही गोष्ट साफ विसरून जाण्यास सांगितलें असतें. कारण मालतीचें अहित होण्यानें मला जितकें वाईट वाटेल तितकेंच तुझें अकल्याण झालें असतांही वाटेल. तुझ्यामध्यें मला कांहीं कमीपणा वाटला असता, तरीही मी अण्णांना तसें साफ सांगितलें असतें. पण तुम्ही दोघेंही एकमेकांना सर्वथैव अनुरूप आहांत अशी मला खात्री वाटते."

**वसंत**—" अण्णाही माझ्याजवळ एकदां याबद्दल म्हणाले होते. तुम्ही माझ्याजवळ इतकें स्पष्ट बोललांत व माझ्याबद्दल तुमचें इतकें चांगलें मत आहे, हें पाहून मला फार आनंद होत आहे. मीही आढेवेढे घेण्याच्या भानगडीत न पडतां मी अगदीं खरें सांगतों की या तुमच्या विचारामुळें मी स्वतःला फार भाग्यवान समजत आहें."

**आप्पा०**—" अण्णांना मी अत्तां कळवितों अगोदर ! फक्त तुझ्याच संमतीची बाकी राहिली होती. तूं आलास त्याच्या दुसऱ्याच दिवशीं अण्णानीं मला लिहिलें होतें कीं माझी पूर्णपणें संमति आहे. वसंताचा विचार काय तो पहावा म्हणजे झालें."

आहे. बरें नकार असला तरी माझ्या देखत तसें स्पष्ट सांगण्यालाही तिला कदाचित बरें वाटणार नाहीं. मला दोन्हीही गोष्टी नको आहेत. कारण हा जन्माचा संबंध आहे. त्यांना अगदीं अंतःकरणापासून जें वाटत असेल तेंच त्यांनीं करावें, असें मला वाटतें. माझी तुम्हालाही अशी विनंती आहे कीं माझ्या गौरवपर तुम्ही त्यांच्याशीं कांहीं बोलूं नये. किंवा माझी याला संमती आहे, हेंही त्यांना कळवूं नये. त्यांना स्वतःला अगदीं निर्विकारपणें काय तो विचार करूं द्या. म्हणजे बरें होईल."

**आप्पा०**—"तूं म्हणतोस तें मलाही पटतें. तूं आतां जरा बाहेर जाऊन ये. मी काढतोंच हा विषय आतां तिच्याजवळ."

वसंत कपडे करून बाहेर पडला. त्याला अतिशय आनंद झाला होता. आप्पासाहेबांच्या बोलण्यावरून मालतीचा रुकारच मिळेल अशी त्यालाही खात्री वाटूं लागली होती. पण तिचा काय तो प्रत्यक्ष जबाब मिळेपर्यंत ह्याबद्दल आपल्या मित्रांपैकीं कोणाशीं बोलावयाचें नाहीं, असें त्यानें ठरविलें होतें.

आप्पासाहेब मालतीच्या खोलींत गेले, तेव्हां ती कसला तरी विचार करीत होती. आपल्याला स्वस्थता कां वाटत नाहीं, हेंच तिला समजत नव्हतें. आप्पासाहेबांनीं तिचा तंद्रीभंग केला.

**आप्पा०**— "कां मालती ! कसला अगदीं एवढा गहन विचार चालला आहे ?"

मालती आप्पासाहेबांपासून कधींच कोणतीही गोष्ट लपवून ठेवीत नसे. तिला मनमोकळेपणानें बोलण्याला आप्पासाहेब व लीला यांखेरीज नव्हतेंच कोणी. आपल्या मैत्रिणीजवळ कोणतीही गोष्ट सांगण्याला तिला कांहीं संकोच वाटत नसेल यांत कांहीं नवल नाहीं. पण आप्पासाहेबांशीं बोलण्यालाही तिला कांहीं वाटत नसे, याचें कांहींना आश्चर्य वाटण्याचा संभव आहे. पण आप्पासाहेबांची आपल्या मुलीशीं वागणूकच इतकी प्रेमळपणाची व मोकळी असे, कीं तिला आपल्याला वाटत असलेली कोणतीही गोष्ट त्यांना सांगितल्याशिवाय रहावतच नसे. आपण हिचे वडील, हिच्याशीं मोकळेपणा कसा ठेवायचा, ही आपल्याला भीत राहिली तरच त्यांत आपला वडीलपणाचा मान रहाणार आहे, असें त्यांना वाटत नसे. आपल्या मुलीला आपल्याशिवाय कोणीही अधिक विश्वासाचें स्थान वाटूं नये, अशीच तिच्याशीं त्यांनीं आपली वागणूक ठेवली होती.

**मालती**--" कोण आप्पा ? बरें झालें तुम्ही उठलांत. नाहींतर मीच तुम्हाला उठवायला आतां बाहेर येणार होतें. मला मघांपासून बरेंच वाटत नाहीं. एकसारखे आपले कसले तरी विचार डोक्यांत सुरूं आहेत. माझें डोकें दुखूं लागेल कीं काय, अशी मला भीति पडली आहे."

**आप्पा०**—" म्हणजे ? असें एकाएकीं व्हायला झालें तरी काय?"

**मालती**—" तेंच तर कळत नाहीं ना मला ! म्हणून तर असें बेचैन झालें आहे. किती तरी गोष्टी आळीपाळीनें डोळ्यासमोर येतात व नाहींशा होतात. कोणत्याच एका गोष्टीवर मन स्थिर होत नाहीं."

**आप्पा०**—" हात्तिच्या ! एवढेंच ना ? याचें निदान करणें अगदींच सोपें आहे. मनाची अशी स्थिति होण्यासारखीच सध्यांची तुझी स्थिती आहे ! त्यांत कांहीं विशेष नाहीं. सर्वांनाच त्याचा अनुभव येत असतो. पण अशी स्थिति एकसारखी रहाणें बरें नव्हे असे नाहीं का तुला वाटत ?"

**मालती**—" होय, खरंच मला असें वाटतें. यापेक्षां प्रत्यक्ष कांहीं तरी होत असलेलें पुरवलें. पण हें काय ? होत तर कांही नाहीं. पण मनाला आपली स्वस्थता नाहीं ती नाहींच. डोक्याला अमृतांजन तरी लावूं का ? नाहीं तर बाबूकडून बर्फ तरी आणवतें थोडासा."

**आप्पा०**--" तुझें डोकें अमृतांजन चोळण्यानें थांबणार नाहीं. कारण तें मुळीं दुखतच नाहीं आहे. त्याचप्रमाणें डोक्यावर बर्फ ठेवल्यानें तें शांतही होणार नाहीं. कारण त्यानें फार तर डोक्याच्या शिरा थंड होतील. पण हृदयांत उत्पन्न झालेले विकार कां त्यानें शमणार आहेत ?"

**मालती**—" म्हणजे काय आप्पा ? हृदयांत कसले विकार उत्पन्न झाले आहेत माझ्या असें तुम्हाला वाटतें ?"

**आप्पा०**--" मालती, अशी गोंधळून जाऊं नकोस. नेहेमीप्रमाणें मनमोकळेपणानें मला काय तें सांगण्याला तूं आज कचरते आहेस, हें मी ओळखलें आहे. पण त्यांत अस्वाभाविक असें कांहीं नाहीं. आपल्या वडील माणसांजवळ आपण कितीही मोकळेपणानें वागत असलों तरी कांहीं गोष्टी अशाच असतात कीं त्या त्यांच्याजवळ आपल्याला सांगवत नाहींत. त्यांत त्यांचा कांहीं दोषही नसतो. तुझी आतां अशीच स्थिति झाली आहे. तुझ्या डोक्यांत आतां चाललेले

विचार पूर्वीही कधीं आलेले असतील, पण त्यावेळीं ते आतां इतके प्रबल नसल्या-मुळें ते तूं लपवूं शकलीस. आज त्यांची अगदीं सीमा झाली. आज ते इतके प्रबल झाले आहेत कीं ते कोणाजवळ तरी ओकून टाकल्याखेरीज तुझ्या मनाला स्वस्थता वाटणें शक्य नाहीं. मी तुला अगदीं खरें सांगतों कीं तूं न सांगतांच सर्व गोष्टींचा उमज मला झालेला आहे. त्यांत तुझी कांहीं चूक नाहीं. हें तुझें वयच असें आहे. इतके दिवस तूं या विचारांच्या अंकित झाली नाहींस, हेंच विशेष आहे. तुला मी आतां अगदीं उघडच सांगतों कीं विवाह करण्याची सबळ इच्छा तुझ्या मनांत उद्भ-वली आहे. आपलें सध्यांचें जीवित तुला अपुरें वाटत आहे. आपल्याला आपल्या लायकीप्रमाणें कोणी तरी योग्य असा जन्माचा जोडीदार मिळावा, असें तुला वाटूं लागलें आहे. खरें आहें ना मी म्हणत आहे हें ?"

आप्पासाहेब हें बोलत असतां मालती इकडेतिकडे अगदीं बावरल्यासारखी बघत होती. आप्पांनीं आपल्याला केलेला प्रश्न ऐकतांच तिला अगदीं हुंदकाच आला. तिनें आप्पासाहेबांना मिठी मारली. तिला एक शब्दही बोलवेना. त्यांच्या छातीवर डोकें टेकून कितीवेळ पर्यंत तरी ती रडत होती लहान मुलासारखें आपण रडतों आहोंत काय असें तिला वाटे. पण अश्रु थांबतचना, त्याला ती काय करणार ?

---

# प्रकरण ६ वें.

आप्पासाहेबांनीं तिची समजूत घातली. रडूं थांबल्यावर मालतीला अधिकच ओशा-ळल्यासारखें वाटूं लागलें. आपल्याला ह्यांनीं मनांतून दुबळी तर ठरविली नसेल, अशी तिला भीति वाटूं लागली.

**आप्पा**--" पहा माझा तर्क अगदीं बरोबर होता. तुला माझ्याशीं बोलवेना सुद्धां. तुझ्या डोळ्यांतून जेव्हां इतकें पाणी बाहेर पडलें तेव्हां कुठें आतां तुला थोडेसें बरें वाटूं लागलें आहे. बरें, आतां मी तुला काय सांगणार आहें, तिकडे नीट लक्ष दे. मी तुझ्याकरितां माझ्या मतानें उत्कृष्ट असें स्थळ पाहिलें आहे. त्यांचीही मला संमति मिळालेली आहे. फक्त तुझाच रुकार मिळवायचें बाकी राहिलें आहे."

**मालती**—" हें काय आप्पा ? तुम्ही अगदीं एकदम माझ्या लग्नाचीच तयारी चालविलीत ? "

**आप्पा**—" होय. तुझें लग्न उरकून टाकण्याचें मी पक्कें केले आहे. तुझ्याकरितां मी पसंत केलेला वर तुझ्याही माहितींतलाच आहे. "

**मालती**—" म्हणजे कोण, आप्पा ? "

**आप्पा०**—" आहा ! काय अगदीं ढोंग करते आहे ? तुला माहीतच नाहीं ना अगदीं ? बरें-बरें-माझ्याच तोंडून त्याचे नांव ऐकण्याची तुझी इच्छा आहे, तर तसें होऊं दे. वसंत तुला पसंत आहे की नाही. ? "

मघाशीं तिच्या डोक्यांत जेव्हां निरनिराळ्या विचाराचें काहूर माजलें होतें, त्यांत कृष्णाबरोबर वसंताबद्दलही तिच्या मनांत विचार सुरू होतेच. ती वेळच अशी चमत्कारिक होती कीं त्या वेळीं आप्पासाहेबांनीं कृष्णाचें नांव घेतलें असतें तरीही तिला मनांतून आनंद झाला असता. वसंताचें नांव ऐकूनही तो झालाच. कृष्णाचें नांव ऐकून तिला अधिक बरें वाटलें असतें, एवढें मात्र खरें. पण वसंताबद्दलही तिला कांहीं कमी आदर वाटत नव्हता. कारण एखाददुसऱ्या दोषाखेरीज त्याच्यांत कोणताच कमीपणा नव्हता. आप्पासाहेबांनीं त्याचें नांव उच्चारतांच कृष्णाचें चित्र तिच्या डोळ्यापुढून जवळजवळ नाहींसेंच झालें. आतां तिच्या डोक्याला वसंत हा एकच विषय उरला. तिला आतां बरें वाटूं लागलें. पण तसें स्पष्ट सांगणें म्हणजे स्त्रियांच्या नैसर्गिक विनयाला कमीपणा आणणें होईल, असें तिला वाटलें. म्हणून ती टाळाटाळ करूं लागली.

**मालती**—" आप्पा, या गोष्टीचा मी अजून विचारच केलेला नाहीं. तेव्हां ज्या बाबतींत मी कधीं विचार केलेला नाहीं त्या बाबतींत मी उत्तर काय देणार ? "

**आप्पा०**—" पण वसंत तुला नापसंत तर नाही ना ? मी तुझ्या अकल्याणाची अशी कोणतीही गोष्ट केव्हांही करणार नाहीं, असा तुला विश्वास वाटत नाहीं का ? "

**मालती**—" आप्पा, तुम्ही माझ्या अहिताचें कांहीं कराल असें मला स्वप्नांत तरी वाटेल का ? वसंतरावांबद्दल देखील मला आदर वाटतो, नाहीं असें नाहीं. पण माझें शिक्षण आटोपल्याशिवाय लग्न करावयाचें नाहीं, असा माझा निश्चय आहे, एवढेंच."

मालतीला हें बोलतांना जरासे कष्ट होत आहेत हें आप्पासाहेबांच्या नजरेंतून सुटलें नाहीं. आपण इतके अगदीं उघड उघड बोलत असतां व आपल्याशीं तितकेंच उघड सांगण्याला संकोच वाटण्याचें कांहीं कारण नसतां, तसें करण्यास तिची शाली-

नता आड येत आहे, याचें त्यांना कौतुक वाटलें. तिच्या मनांतला भाव ते केव्हांच उमजले होते. पण तिची जरा गंमत करावी व आपल्याही मनाची पुरी खात्री करून घ्यावी, असा त्यांनीं विचार केला.

**आप्पा०**—" शिक्षण पुरें झाल्याशिवाय विवाह न करण्याचा तुझा निश्चयच झाला आहे ? मग काय इलाजच खुंटला माझा ! "

**मालती**—" हें काय आप्पा ? मी तुम्हाला इतकें स्पष्ट सांगितलें म्हणून तुम्हाला माझा राग आला का ? बरें तर. मी आतां मुळीं कांहीं बोलणारच नाहीं. "

**आप्पा०**—" छे-छे-राग कसला आला आहे ? तुला वाटेल तें स्पष्ट बोलण्याची मी परवानगीच दिली होती. तुला वाटलें तें तूं बोललीस. तेव्हां यांत मला राग येण्याचें कारण काय ? "

**मालती**—" मी तुमच्या परवानगीचा दुरुपयोग केला का ? क्षमा करा मला. पण मी आपलें माझें म्हणणें काय तें तुम्हाला राग येणार नाहीं या विश्वासामुळें सांगून टाकलें. "

**आप्पा**—" होय ! पण तें सांगतांना तुला कष्ट पडत होते हें मी ओळखलें आहे. तेव्हां हें सांगतांना जर तुला इतके कष्ट पडले तर एवढे दिवस काढणें तुला किती कष्टाचें जाईल ? "

**मालती**—" इश्श ! तुम्ही आप्पा आज माझी आपली एकसारखी थट्टाच चालविली आहे. बरें पण, वसंतरावांना तुम्ही विचारलेंत का ? "

**आप्पा**—" वा ! मग मघांशीं तुला सांगितलें काय ? अस्सें अस्सें तुला तें मी पुनः सांगायला पाहिजे आहे होय ? बरें तर. त्याची या माझ्या बेताला पूर्ण संमति आहे. इतकेंच नव्हे तर यानें त्याला इतका आनंद झाला कीं त्या भरांत तूं माझ्याशीं विवाह करण्यास तयार झालीस तर मी स्वतःला फार भाग्यवान समजेन असेंही तो म्हणून गेला. "

आप्पासाहेबाचें हें बोलणें ऐकून मालतीला अवर्णनीय आनंद झाला.

**मालती**—" पण बाबा, माझें शिक्षण पुरें होण्याला आतां कांहीं फार वेळ नाहीं. आठएक महिनेच आहेत ना आतां काय ते शिल्लक ? "

**आप्पा०**—" अग लबाडे, म्हणजे त्यानंतर या विवाहाला तुझी संमति आहे तर एकूण ? मला हें केव्हां पासूनच माहीत होतें. तुम्हा तरुण लोकांना काय वाटतें

कीं आपल्या मनांत काय चाललें आहे, याचा आम्हा म्हाताऱ्यांना पत्ताही नसेल. पण आतां तर तुझी खात्री झाली कीं नाहीं ? कीं आमच्यापासून तुम्हा पोरांना कोणताही विचार किंवा विकार छपवून ठेवतां येणें शक्य नाहीं ? अग याचें कारण हुडकीत बसण्याला कांहीं डोकें खाजवीत बसायला नको. बालपण आणि म्हातारपण सारखीं असें म्हणणारे बेटे एक गोष्ट विसरतात. ती ही कीं बालपण ही तारुण्याच्या अलीकडील दशा असते. त्यांत तारुण्याच्या नुसत्या कल्पनाच मनांत येतात. तारुण्य ही काय चीज आहे, याचें त्या वेळीं यथार्थ ज्ञान नसतें. पण म्हातारपण हें मुरलेलें तारुण्य आहे म्हणजे तारुण्य अनुभविलेली अवस्था आहे. म्हातारपणांत तारुण्याची नुसती कल्पनाच करीत बसावें लागत नाहीं. कारण तें एकदां प्रत्यक्ष अनुभवलेलें असतें. बालपण आणि म्हातारपण या दोहोंत दुर्बलतेच्या बाबतींत साम्यता आहे. पण पहिल्यांत मनुष्य दुर्बल असून शिवाय अज्ञानही असतो व दुसऱ्यांत तो दुर्बल असला तरी सज्ञान असतो. तेव्हां आमच्यासारख्या वृद्धांपासून तुम्हाला या गोष्टी कशा चोरून ठेवतां येणार ? ”

मालतीनें आपल्याला होत असलेला आनंद आंतल्या आंत दाबण्याचा शिकस्तीनें प्रयत्न केला, पण अंतर्यामींच्या समाधानाची स्पष्ट खूण म्हणून ओंठावर मधुर हास्य विलसूं लागलेंच.

आप्पासाहेबांनीं अण्णासाहेबांना ताबडतोब सविस्तर हकीकतीचें पत्र पाठविलें.

हळुं हळुं गुरुवार उजाडला. म्हणजे आप्पासाहेबांकडे आज कृष्णाचा वार होता. जावें कीं न जावें या विचारानें त्याचें डोकें आज पुनः भ्रमण करूं लागलें. आज काय तो अखेरचा निकाल लावून घ्यायचा असा निश्चय करून तो जाण्यास निघाला. कृष्णा आला तों तीं तिघेंही आपलीच वाट पहात असल्याचें त्याला आढळून आलें. आज कृष्णा जेवायला येणार म्हणून मालतीला फार आनंद झाला होता. वसंताशीं विवाह करण्यास तिनें आपली संमति दिली होती. पण कृष्णाचें चित्र डोळ्यासमोर उभें राहिल्याबरोबर तिला अगदीं भरून गेल्यासारखें होऊन जाई. वसंताविषयीं विचार सुरु झाल्याबरोबर त्याच्या शेजारीं आपली कृष्णाची मूर्ति हजर असावयाचीच. कृष्णा पाय धुवून आपल्या नेहमींच्या जागीं जेवण्यास बसला. त्याची दृष्टि सहज मालतीकडे गेली. तों तिच्या डोळ्यांत आज कांहीं निराळेंच पाणी खेळत आहे, असें त्याला आढळून आलें. तो आपली दृष्टि दूर करण्याचा एकसारखा प्रयत्न करीत होता.

पण त्याची अगदीं भारल्यासारखी स्थिति झाली होती. त्याचे डोळे पुनः पुनः मालतीच्या चेहऱ्याकडे वळत होते. आप्पासाहेब व वसंतराव आपणाकडे पहात आहेत कीं काय नकळे अशा भीतीनें तो मधून मधून त्यांचे लक्ष कुठें आहे, हेंही बघत होता. त्याला आश्चर्य वाटलें कीं आपण ज्यावेळीं मालतीकडे पहातों, त्यावेळीं तिचें लक्ष अगोदरपासूनच आपल्याकडे असतें. आतां त्यानें निश्चय केला कीं सबंध जेवण होईपर्यंत मुळीं वर मानच करावयाची नाहीं.

**वसंत**—" काल रात्री अगदीं फुकटाफुकटीं जाग्रण झालें. मला तर बुवा अगदीं पहिल्यापासूनच कंटाळा आला होता."

**मालती**—" मला सुद्धां अगदीं कधीं घर गांठीनसें होऊन गेलें होतें. पण आप्पा कांहीं उठायला तयार होत ना. त्यांना आपली त्यांतच गंमत वाटत होती."

आप्पासाहेबांनीं मुळीं विषयच बदलून टाकला.

**अप्पा**—" कां कृष्णराव ? लोकमान्यांच्या निधनानिमित्त भरविण्यांत आलेल्या सभेंत तुम्हीं अगदीं बहार उडवून दिलीत म्हणून आमची मालती म्हणत होती. ?"

कृष्णा नुसता हंसला. हंसतांना त्याचें लक्ष सहज वसंतकडे गेलें. तोही हंसत असल्याचें दिसलें. पण त्याचें हंसणें मिस्किलपणाचें दिसत होतें. ' काय लेकाचा हंसतो आहे पहा ' अशा अर्थाचें हें हंसणें होतें. कृष्णाच्या तीक्ष्ण नजरेस त्या हंसण्याचा अर्थ उमजण्यास फारसा अवधि लागला नाहीं. त्याला वसंताचा अतिशय संताप आला. केव्हां हा मध्यें तोंड घालील, अशी तो नुसती वाट पहात राहिला. वसंताला तर मुळीं गरीबांची कुचेष्टा करण्यांतच करमणूक वाटत असे. त्याला स्वस्थ थोडेंच बसवतें. ! वास्तविक कृष्णा कोण वगैरे सगळें त्याला माहीत होतें. पण निव्वळ चावटपणा करण्यासाठीं तो म्हणाला " आप्पा, यांचा मला परिचय करून द्या ना ! मागील खेपेस यांची व माझी गांठ पडली होती तेव्हां तुम्ही फक्त माझीच माहिती यांना करून दिली, यांची कांहींच तुम्ही मला सांगितली नाहीं."

कृष्णानें अतिशय तीव्रतेनें वसंताकडे पाहिलें. यानें आपण यांच्याकडे वारावर जेवण्यासाठीं आलों आहोंत हें माहीत असून आपली मानहानि करून आपल्यावर खालीं मान घालण्याचा प्रसंग यावा, या दुष्ट हेतूनेंच आपला परिचय करून द्यायला आप्पासाहेबांना सांगितलें असलें पाहिजे, असें कृष्णाला वाटलें.

**आप्पा०**—" हे आमच्या मालतीच्या वर्गांतच असतात. फारच ब्रिलिअन्ट् करिअर आहे यांची."

**वसंत**--" असें कां ?" असें म्हणून पुनः कृष्णाकडे पाहून खवचटपणानें हंसला.

इतक्यांत पहिला भात संपून आंबरस वाढण्यास आला. इतरांबरोबर कृष्णानेंही आंबरसाची वाटी तोंडास लावली. कर्मधर्मसंयोग असा कीं नेमक्या त्याचक्षणीं मालतीला कसलीशी आठवण होऊन तिच्या तोंडून "मधु-रस-पान सौख्य फुकट्याचें" हे शब्द बाहेर पडले व ते म्हणतांना तिनें वसंताकडे पाहिलें. लगेच वसंतालाही कसलीशी आठवण होऊन तोही पोट धरधरून हंसूं लागला. अण्णासाहेब तीं दोघें हंसतात ह्मणून हंसत होते. कृष्णाच्या हातांतील वाटी मात्र ठणदिशीं ताटांत पडली. त्या तिघांचें लक्ष त्याच्याकडे गेलें. त्याचा चेहेरा संतापातिरेकानें अगदीं लालबुंद झाला होता. मालतीला वाटलेंच कीं आपण ह्मटलेल्या पदाच्या त्या ओळीचाच हा सारा प्रभाव असला पाहिजे. वसंत त्याच्याकडे गुर्मीनें पहात राहिला. आप्पासाहेब त्याच्याकडे विस्फारित चेहेऱ्यानें पहात होते. कृष्णाचा पारा आतां पूर्ण चढला होता. आपल्या तोंडून आता एक शब्द बाहेर पडला, तर लगेच आपण काय बोलतों याचें भान न राहून आपण काय वाटेल तें बोलत सुटूं हें त्याला माहीत होतें. ह्मणून तो बोलावयाचे नाहीं, असा विवेक करण्याचा प्रयत्न करीत होता. पण तें त्याला साधलें नाहीं. तो एकदम उखडलाच. तो एकदम हातवारे करून बोलूं लागला.

**कृष्णा**—" कां ? तुम्हा तिघांना माझा बराच राग आलेला दिसतो ? वसंतराव, मघांशीं मी बोललों नाहीं. पण आतां माझ्याच्यानें स्वस्थ रहाणें शक्य नाहीं. तुम्हाला माझा परिचय करून घेण्याची इच्छा होती नाहीं ? आप्पासाहेबांनीं माझा करून दिलेला परिचय तुम्हाला रुचला नाहीं हें या दोघांच्या लक्षांत आलें नसलें तरी माझ्या पूर्णपणें लक्षांत आलें होतें. तुम्हाला आवडेल अशा रीतीनें माझा परिचय मीच तुम्हाला करून देतों बरें का ? मी आठवड्यांतून एक दिवस दोन्ही वेळां आप्पासाहेबांच्या घरीं जेवावयास येणारा एक वारकरी आहें. तुम्ही सर्वजण फार श्रीमंत आहांत, व मी एक भिकारडा आहें. पण तुम्हा श्रीमंतांची खरी किंमत मी आज पुष्कळ दिवस ओळखून आहें. मागच्या गुरुवारच्या अनुभवानें शहाणा होऊन मी आज मुळीं इकडे यावयासच नको होतें. पण पुरी शहानिशा करून घेतल्याशिवाय असें करणें बरें नव्हे, असें वाटल्यावरून मी इकडे येण्याचा मूर्खपणा केला, आणि त्याचें प्रायश्चित्तही मला पुरेपूर मिळालें."

**वसंत** —" मूर्खपणा केलात असें तुम्ही एकदां कबूल केल्यावर त्याचें प्रायश्चित्त तुम्हाला भोगावें लागलें, हें ठीकच झालें असें म्हणणें ओघानेंच प्राप्त होतें."

मालती वसंताकडे बघूं लागली. कृष्णानें त्या बघण्याचा निराळाच अर्थ केला.

**कृष्णा**—"होय, खरें आहे तुमचें म्हणणें. आमच्यासारख्या गरिबांच्या मूर्खपणा-बद्दल प्रायश्चित्त घडविण्याचा अधिकार तुमच्यासारख्या कुबेरपुत्रांना परमेश्वरानें दिलेला आहे हें मला माहीत आहे. मालतीताईंना तुम्ही माझ्याशीं बोललेलें आवडत नाहीं. बरोबरच आहे त्यांचेंही. गरिबांना शिव्या देण्यांत सुद्धां गरिबांशीं बोलण्याचे पाप हातून घडल्याबद्दल श्रीमंतांना वाईट वाटणें सहाजिक आहे. आप्पासाहेब, आजन्म श्रीमंतींत लोळत पडलेल्या या आपल्या बाळांना दारिद्र्यांत खितपत असलेल्या या कृष्णाचा विटाळ यापुढें कधींही होणार नाहीं. आजपर्यंत मला आपण जें अन्नदान केलेंत, त्याबद्दल मी आपला जन्माचा ऋणि आहे. कारण त्याची फेड कोणत्याच रीतीनें करण्याची संधि मला मिळणें शक्य नाहीं. जातों मी आतां. पण लक्षांत ठेवा. गरीब मनुष्याला अंतःकरण नसतें अशी आपली समजूत असेल तर ती अजिबात खोटी आहे. श्रीमंत मनुष्यांनीं गरीबांना जुमानण्याचें कारण नाहीं म्हणून कधीं जुमानूं नये व त्यांना केव्हांही व कधींही घालून पाडून बोलावें असा वसंतराव, तुमचा समज आहे काय ? जेथें काळाच्या एका थपडेसरशीं राजवाडे जमीनदोस्त होतात, कोट्याधीशांना हातांत नारळाची करटी घेण्याचा प्रसंग येतो, तेथें तुमच्यासारख्यांचा काय पाड ? "

आपल्या बोलण्याचा अगदीं भलताच अर्थ कृष्णानें केला म्हणून अगदीं पहिल्यानें मालतीला हंसूं येत होतें. पण पुढें पुढें आपल्यामुळें हा सारा गैरसमज झाल्याबद्दल वाईट वाटूं लागून तिला रडूं येण्याच्या बेतांत आलें. ज्याच्या विषयीं आपल्या मनांत आदरबुद्धि वसत असते, त्याचा आपणाविषयीं निष्कारण गैरसमज झाला तर सहाजिकच कोणालाही वाईट वाटतें. मालतीचेंही असेंच झालें. तिचे डोळे पाण्यानें भरून आले. कृष्णानें तिच्याकडे पाहिलें.

**कृष्णा**—" माझ्या बोलण्यानें तुम्हाला वाईट वाटलेंसें दिसतें. वसंतरावांचे धडे गिरवीत चला म्हणजे असें होणार नाहीं. तुम्ही एवढ्या सुशिक्षित पण एखाद्या अडाणी, निरक्षर स्त्रीच्या मनावर झालेले संस्कृतीचे परिणामसुद्धां तुमच्या ठिकाणीं नाहींत. निव्वळ श्रीमंताची मुलगी म्हणून गरिबांना झिडकारणारी, त्यांचा अपमान करण्यांत

दिवस तुम्ही जेवायला घालतां, या एकाच कारणामुळें तुम्ही माणसांपेक्षां कोणी तरी उच्च दर्जाचे व मी माणसांच्या कुठल्या तरी खालच्या योनींतला असा अर्थ होतो कीं काय? परमेश्वरानें कांहीं मला तुमच्या जीवावर खास जन्माला घातलें नाहीं. मला कुठें तरी दोन घांस खात्रीनें मिळतील; आणि कदाचित् मिळाले नाहींत तरी हरकत नाहीं. अपमानानें दूषित झालेलें अन्न खाऊन मस्त होण्यापेक्षां उपास-मारीनें तडफडून मृत्यूच्या जबड्यांत पडणें मी शतपटीनें हितावह समजतों." असें म्हणून तो पानावरून उठला आणि हात धुवून आप्पासाहेब आपल्याला हांका मारीत आहेत हें माहीत असतांनाच कपडे करून त्या घराच्या बाहेर पडला.

घरीं आल्यावर त्याचें डोकें फारच दुखूं लागल्यामुळें त्यानें कपडे काढून ठेवले व आपल्या अंथरुणावर पडला.

"निव्वळ मी गरीब–अन्नार्थी म्हणून हे लोक माझा उपहास करतात काय? माझ्या वाडवडिलांनीं यांच्या बापजाद्यांप्रमाणें गोरगरिबांच्या मुंड्या मुरगळून माझ्याकरितां इस्टेट ठेवली नाहीं हा तरी त्या बिचाऱ्यांचा दोष म्हणावयाचा कीं काय? लक्ष्मीच्या कृपेला अनायासें पात्र झालेल्या या कुबेरपुत्रांना गोरगरिबांच्या अंतःकरणांला दुख-विण्यावांचून दुसरा काय उद्योग असणार? मालती एवढी सुशिक्षित! तिच्या थोर मनाची केशव देखील त्या दिवशीं मारे तारीफ करीत होता. पण श्रीमंताचीच बेटी कीं नाहीं? सर्पाचे पिलूं कितीही मोहक दिसलें तरी तें ओकणार विषच कीं नाहीं? निव्वळ पैसा म्हणजेच जर सर्वस्व असतें तर आज ज्या मानवविभूति सर्व जगाला वंद्य वाटत आहेत, त्या तशा वाटल्याच ना! पण श्रीमंतीच्या निशेनें धुंदावून गेले-ल्यांना हें दिसावें कसें व त्यांच्या हें लक्षांत तरी कसें यावें?"

त्या दिवशीं तो कॉलेजांत गेलाच नाहीं. केशवानें तर्क केलाच कीं मागील आठ-वड्यांत झालेल्या भानगडीपैकीं कांहीं तरी प्रकार असला पाहिजे. म्हणून पहिला तास संपतांच स्वारी कृष्णाला भेटण्यासाठीं कॉलेजच्या बाहेर पडली.

**केशव**—"कां रे कृष्णा? आज कांहीं आणखी झालें कीं काय?"

**कृष्णा**—"छे. छे. आणखी काय कसें होईल? त्या दिवशींचें आप्पासाहेबांचे वर्तन सहाजिक, आणि मालतीताईच्या थोर मनाबद्दल आपलें शिफारसपत्र"

**केशव**--"मग यांत काय शंका आहे? मालतीबाईच्या निष्कपट व सरळ स्वभावाबद्दल मी अजूनही हमी घेतों."

**कृष्णा**--" एखाद्या माणसाला वाईट म्हणायचेंच नाहीं असा कोणी एकदा निश्चयच केला, तर त्याला काय करणार ? "

**केशव**--" प्रत्यक्ष पुरावा असल्याखेरीज ज्याच्याविषयीं आपलें चांगलें मत आहे त्याबद्दल आपण तें वाईट तरी कां करून घ्या ? "

**कृष्णा**--" आतां याहून आणखी तुला प्रत्यक्ष पुरावा काय पाहिजे " असें म्हणून कृष्णानें झालेला सर्व प्रकार इत्थंभूतपणें केशवास सांगितला. त्यालाही त्या गोष्टीचें नवल वाटलें.

**के०**--" असें ! ज्या वस्तूला मी आजपर्यंत हिरा मानीत आलों, ती गारगोटीच होती एकूण ! असो. यापुढें झालेलें सर्व विसरून जा. तुझ्या झालेल्या अपमानाची मी सव्याज फेड केली नाहीं तर मला केशवच म्हणूं नकोस. मेहेरबानी करून मला त्या संबंधांत मात्र आतां कांहीं विचारूं नकोस. प्रत्यक्ष काय तें झाल्यावर दिसेलच. "

---

# प्रकरण ७ वें

आप्पासाहेब, मालती व वसंत यांच्या मनांत कृष्णाच्या त्या चमत्कारिक वर्तनामुळें निरनिराळे विचार येऊं लागले. आप्पासाहेबांना झालें तें चमत्कारिक झालें व बरें झालें नाहीं असें वाटत होतें. मालतीला अतिशय वाईट वाटत होतें व स्वतःचा व वसंताचा राग आला होता. वसंतालाही राग आला होता, पण तो कृष्णाचा.

**वसंत**--" काय लेकाचा मगरूर आहे पहा ! फुकटचें गिळायाचें आणि वर अन्नदात्याला उपदेश करण्याचा आव आणावयाचा ! जेवायला मिळतें म्हणून आनंद मानायचा सोडून नसत्या मानापमानांच्या कल्पनांनीं पिसाळून जाऊन आपला पारा चढवावयाचा ! आप्पा, तुम्ही फारच शांत बुवा ! मला प्रशस्त वाटेना, नाहींतर लेकाची मी स्वतःच बत्तीशी रंगवून काढली असती. "

आप्पासाहेब व मालती दोघेंही स्वस्थच होतीं. आप्पासाहेब स्वस्थ होते, ते त्यांना बोलावयाचें सुचेना म्हणून. मालती आपल्याच विचारांत गर्क असल्यामुळें वसंताच्या बोलण्याकडे तिचें लक्षच नव्हतें.

**वसंत**—" त्याची माझी जर पुनः कुठें गांठ पडेल तर बरें होईल. मूर्खाप्रमाणें स्वतः वर्तन करून आपल्या सारख्यांना उपदेश करण्याचा आव अंगी आणून आपला अपमान करावयास उद्युक्त होणें म्हणजे काय गोष्ट आहे? तें कांहीं नाहीं. कांहीं कांहीं श्रीमंत लोक ज्याप्रमाणें गरिबांना आश्रय देण्याला तयार होत नाहींत, इतकेंच नव्हे तर त्यांचा द्वेषही करितात तेंच बरोबर हें आतां मला तंतोतंत पटूं लागलें. इकडे तर गरीब असावयाचें आणि इकडे स्वाभिमानाचे नसतें थोतांड उभारावयाचे! स्वाभिमान जागृत ठेवायचा तर गरीब होण्याचा उपद्यापच कशाला करायचा? आणि गरीब असल्यानंतर स्वाभिमान कायम ठेवण्याची हाव कां बाळगावी, हेंच मला समजत नाहीं."

मालती मुकाट्यानें उठून आपल्या खोलींत गेली. त्यानंतर झाल्या गोष्टीबद्दल कितीवेळपर्यंत तरी आप्पासाहेबांजवळ वसंत व्याख्यान देत होता व आप्पासाहेब तें स्वस्थपणें ऐकून घेत होते.

मालती कॉलेजांतून परत आली तेव्हां देखील अगदीं उदासवाणी दिसत होती.

**वसंत**--" मालतीताई, तुम्हाला आज जरा बरें नाहींसे दिसत आहे. काय मजा आहे पहा! एक लेकाचा आततायीपणा करतो आणि शंभर जणांना त्याचे परिणाम भोगावे लागतात. आप्पासाहेबांचें सुद्धां एकसारखें डोकें दुखत आहे."

मालतीच्या मनांत त्याला कांहीं तरी उत्तर द्यावयाचें होतें. पण याचें नीट उत्तर देण्याला अंमळ स्वस्थपणा बरा असा विचार करून ती कांहींच बोलली नाहीं व चहा घेऊन टेनिस् ग्राऊंडवर निघून गेली.

कॉलेजचा जिमखाना म्हणजे वजवजपुरीच ती. केशवसारखे काही अपवाद सोडले तर बहुतेक सारे बडे बापके बेटेच तेथें जमावयाचे! विद्यार्थी अभ्यासाच्या श्रमानें श्रमून व कंटाळून गेल्यामुळें त्यांच्या मनोरंजनार्थ व त्याचप्रमाणें बलसंवर्धनार्थ कांहीं तरी साधन अशा स्तुत्य हेतूनेंच जिमखाना ही संस्था पहिल्यानें निर्माण करण्यांत आली असावी. पण कल्पकांच्या व चालकांच्या हेतूंचा हलके हलके विपर्यास होत गेला, असें म्हणण्यास हरकत नाहीं. अभ्यासामुळें मेंदूला आलेला थकवा दूर करण्याकरितां म्हणून जे खेळ खेळावयाचे, ते, ते खेळ खेळल्याशिवाय अभ्यास करण्यास जोर येणार नाहीं, अशा कल्पनेनें खेळले जाऊं लागले. म्हणजे खेळांस प्राधान्य मिळून अभ्यास हा विषय गौण समजला जाऊं लागला. खेळांमध्यें प्राविण्य

मिळविणारे बहुतेक विद्यार्थी प्रत्येक वर्गांत दोन दोन तीन तीन वर्षें रखडतात हा सार्वत्रिक अनुभव म्हणजे वर केलेल्या विधानास प्रत्यक्ष पुरावाच आहे.

विद्यार्थिनी व विद्यार्थी यांचीं कोर्ट्स् निरनिराळीं होतीं. परंतु लवकरच कॉलेजच्या टूर्नमेन्ट्स् व्हावयाच्या असल्यामुळें हल्लीं टेस्ट् मॅचिस् सुरू असत.

मालती ग्राउंडवर येऊन पोहोंचली, तेव्हां केशवाचा एका पारशी तरुणाबरोबर सामना चालला होता. केशवाची खेळण्याची पद्धत तिला फारच आवडत असे, व म्हणून ती त्याचा खेळ पहात पुष्कळदां उभी रहात असे. ती स्वतःही खेळण्यांत चांगली प्रवीण होती. पण केशवाच्या खेळांत कांहीं तरी विशेष आहे, व इतरांना आपण चीत केलें तरी हा आपल्याला हार जाणें शक्य नाहीं, ही तिची खात्री होती. ती त्याच्यापासून खेळाबद्दल कधीं कधीं सूचनाही घेत असे; व त्यांचा खात्रीनें उपयोग होईल असा त्याला विश्वास वाटत असल्यामुळें तोही त्या मोठ्या आनंदानें देत असे. नेहमींच्या रिवाजाप्रमाणें त्यांचा सामना पहाण्याला आजही ती उभी राहिली. केशवानें त्या पारशाला चांगलाच डिफीट् दिला.

नंतर मालतीचा आणि त्या पारशी तरुणाचा सामना झाला. तिनेंही त्याला पराजित केलें. अर्थातच पारशाला हा पराभव केशवानें केलेल्या पराभवाहून सौम्य दर्जाचा असून अधिक दुःसह वाटला. इतक्यांत आणखी कांहीं खेळाडू तेथें जमले. लवकरच होणाऱ्या स्पोर्टस्ची सध्यांच काही तरी कल्पना असावी म्हणून विद्यार्थीविद्यार्थिनींचा असा विचार ठरला कीं विद्यार्थ्यांमधील उत्तम खेळाडू व विद्यार्थिनींमधील उत्तम खेळाडू यांची आतांच एक मॅच करावी. झालें. विचार म्हणजे काय जवळजवळ ठरावच तो, आणि त्यातही एकमतानें जमलेला मग तर काय विचारायला नको. लगेच विद्यार्थिनींतर्फे मालती चँपिअन् म्हणून निवडली गेली; आणि विद्यार्थ्यांनीं आपल्यातर्फे केशवाला निवडला. मालतीनें आपल्या मैत्रिणींना परोपरीनें सांगितलें कीं जोशांशीं खेळण्याची माझी लायकी नाहीं. पण तिचें म्हणणें त्यांच्यापैकीं कोणीच ऐकेना. तिला आपल्या जाग्यावर जाऊन उभें रहावेंच लागलें. अंपायर्स् निवडले गेले. केशवाला मालतीशीं खेळण्याचा चॅन्स् मिळाल्याबद्दल कित्येकजण मनांतल्या मनांत त्याला धन्य समजूं लागले तर कांहींना त्याचा मनातून हेवाही वाटूं लागला. केशव होता तेथेंच बसून राहिला; व तेथून त्यानें मालतीकडे फक्त पाहिलें.

मालतीनें त्याला आपल्याकडे बघतांना आजपर्यंत कित्येक वेळां पाहिलें असेल. पण ती नजर तिला आतां इतकी तीक्ष्ण कधींच भासली नव्हती. तिला आश्चर्य वाटलें. याच्या नेहेमींच्या पोरकट खेळाडू वृत्तीच्या दृष्टींत आज क्रोधाची छटा कां दिसत आहे? याला आपण तर कधीं राग आलेला आजपर्यंत पाहिला नाहीं. आतांपर्यंतही तो नेहेमींसारखा आनंदीच दिसत होता, पण मला पाहिल्याबरोबर याची नजर अशी बदलली कां बरें? मी याचें काय केलें? काल का परवांच नाहीं का तो माझ्याशीं चांगला हंसून बोलून होता. मग आजच त्याला काय झालें? तिला अगदीं ओशाळल्यासारखें झालें. इतर कोणाच्याच हें लक्षांत आलें नव्हतें.

"चला जोशी, होऊं द्या सुरुवात. उगीच उशीर कशाला?" विद्यार्थ्यांपैकीं एकजण म्हणाला.

**केशव**—"मी आतां खेळण्याच्या लहरींत नाहीं; आणि त्यांतून माझी प्रकृतीही आज तितकीशी बरी नाहीं."

विद्यार्थ्यांत गडबड सुरू झाली. कोणी म्हणूं लागले कीं आपला खेळ हिला माहीत झाला तर कदाचित टूर्नमेंट्स्‌मध्यें ही आपणाला हरवील अशा भीतीनें हा खेळण्याचें टाळीत आहे; तर कांहींजण केशवावर विश्वास ठेवण्यास तयार झाले. केशव उत्तम खेळाडू आहे, ही सर्वांनाच खात्री होती. पण त्याचें मन कसें आहे, याबद्दल मात्र बराच मतभेद होता. तो मघांचा पारशी आतां पुढें सरसावला.

"कां मिस्टर जोशी? आमच्यासारख्या नवशिक्याशीं खेळण्यांतच तुमची सारी हुषारी वाटते? आतां अशा वेळीं माघार घेणें याचा अर्थच तो."

**के०**—"तुम्ही माझ्यावर असा आरोप केलात तरी माझें कांहीं म्हणणें नाहीं. तुम्ही मला भ्याड ठरविलेंत तरी त्याचीही मला फारशी पर्वा नाहीं. पण मला आतां यांच्याशीं तरी निदान खेळतां येत नाहीं, एवढें खरें," असें म्हणून त्यानें कोट टोपी चढविली व तडक वाट चालूं लागला.

दुसऱ्या एका खेळाडूनें पृच्छा केली, "अहो, पण अगदीं इतक्या घाईनें कुठें निघालांत?"

केशवानें सर्वांस ऐकूं जाईल अशा आवाजांत उत्तर दिलें, "कृष्णा परांजप्याकडे."

मालतीचा चेहेरा केशवाचे शब्द कानीं पडल्याबरोबर खरंदिशीं उतरला. तिला त्या दिवशींच्या सकाळची आठवण झाली. कृष्णानें आपली गैरसमजून करून घेतली ती

घेतलीच आणि शिवाय आपल्याविषयीं सर्वांची मनें कलुषित करण्याचा दुष्ट उद्योगही त्यानें आरंभिला आहे, म्हणून त्याचा तिला फार राग आला. इतर विद्यार्थिनींना त्यांत कांहीं विशेष वाटलें नाहीं. पण तिच्या डोक्यांत मात्र सर्व गोष्टी खेळूं लागल्या. "कृष्णा पराजप्यांकडे" हे शब्द तिनें ऐकले नसते तर केशव तिच्याशीं न खेळल्याचें तिलाही कांहीं विशेषसें वाटलें नसतें. इतर विद्यार्थिनींनीं तो भ्याल्यामुळेंच न खेळतां निघून गेला अशी तिची समजूत घालण्याचा खूप प्रयत्न केला, पण अशानें तिचें थोडेंच समाधान होणार ?

केशव ग्राउंडवरून निघाला तो तडक कृष्णाच्या घरीं आला.

**के०**--"कृष्णा, झाली आजपासून सुरुवात ! नमन इतरांच्या दृष्टीनें हिणकस ठरलें तरी मला तें जोरकसच वाटतें."

**कृ०**--"म्हणजे काय ? सुरुवात कसली झाली ? नमन कशाचें जोरकस झालें ? कुठें एकादें नाटक करीत होतास कीं काय ?"

**के०**--"करीत नव्हतों. करणार आहें, त्याचें आज नमन झालें. तुला मी मघांशीं सांगितलें होतें ना कीं तुझ्या झालेल्या अपमानाबद्दल मी पुरा सूड उगवीन म्हणून ? त्याचेंच मंगलाचरण आटोपून मी आतां इथें आलों."

**कृ०**--"पण माझ्या झालेल्या अपमानाबद्दल सूड उगविण्याला मी तुला परवानगी दिली नव्हती, हें तूं अजिबात विसरलास. मघांशी तूं माझ्या बोलण्याची वाट न बघतां झटक्यानें निघून गेलास म्हणून हें तुला सांगण्यास मला झालेंच नाहीं. इतक्या लवकर तूं सुरुवात करणार आहेस हें तूं मला सांगितलें असतेंस तर फार बरें झालें असतें."

**के०**--"तर मग काय ? याचा तूं स्वतः सूड घेणार आहेस ?"

**कृ०**--"सूड कशासाटीं घ्यावयाचा ? अपमानाच्या जाणीवेनें माझें मन कितीही क्षुब्ध होत असलें तरी सूडासारख्या राक्षसी भावनांना माझ्या अंतःकरणांत थारा नाहीं. माझा कोणाकडूनही अपराध झाला असतां किंवा माझ्या स्वाभिमानाला कोणीही दुखवितां असतां मी तेथल्या तेथेंच मला काय करावयाचें तें करून टाकून तें प्रकरण तेथेंच संपवून टाकतों. मालतीताईंचे ते मर्मभेदक शब्द ऐकल्याबरोबर मी त्यांच्याच घरांत व त्यांचेंच अन्न खात बसलों आहे याचाही विचार न करतां मला काय बोलावयाचें तें तडकाफडकीं बोलून टाकून मी मोकळा झालों आहें. हालाहलाची एकदां परीक्षा

झाल्यावर त्यापासून दोन हात दूर रहाणें एवढें आपलें काम आहे आणि तेवढें आपण केलें म्हणजे बस् आहे. ”

के०—“ मग तुला काय वाटतें ? मी मालतीबाईच्या दोन श्रीमुखांत लगावून दिल्या कीं काय ? ”

“ नाहीं—नाहीं—स्त्रियांवर हात उचलण्याइतका तूं नादान नाहींस ही माझी खात्री आहे, ” कृष्णा हंसत म्हणाला. “ बरें, पण तूं जोरकस मंगलाचरण तें कसें काय केलेंस ? ” केशवानें सर्व हकीकत त्याला विस्तृतपणें सांगितली “ एका वाक्यांत सांगावयाचें म्हणजे मी आज मालतीबाईशीं खेळण्याचें नाकारलें. ”

कृ०—“ माझी तर तशी इच्छाच नव्हती म्हणा. पण याच नमनाला कां तूं जोरकस म्हणतोस ? ”

के०—“ तें घरांतून कधीं बाहेर न पडणाऱ्या तुझ्यासारख्याच्या नाहीं लक्षांत यावयाचें. अरे, त्यांच्याशीं खेळण्याचा आपल्याला चॅन्स् मिळावा म्हणून तेथें हजर असलेल्या कित्येक विद्यार्थ्यांनीं देवाला नवससुद्धां केले असतील. चॅन्स् मला अनायासें मिळाला असतां मी त्याचा उपयोग करून घेतला नाहीं, एवढ्या-मुळेंच मुळीं माझ्या नमनाला जोरकसपणा आला असता. पण तेथून निघतांना मी तुझें नांव मोठ्यानें उच्चारून तुझ्याकडेच जातों म्हणून जेव्हां म्हटलें, तेव्हांच्या मालतीबाईच्या चेहऱ्यावरून तर माझी पक्की खात्रीच झाली कीं तें चांगलेंच जोरकस होतें. जमलेल्या मंडळीपैकीं कांहींनीं मला भ्याडही ठरविलें पण मी त्याची पर्वा केली नाहीं ”

इतर विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें आपण भ्याड ठरले जात असतां निव्वळ माझा अपमान करणारी स्त्री म्हणून मालतीताईशीं यानें खेळण्याचें नाकारलें या विचारानें कृष्णाला केशवाचें तें करणें फारसें पसंत नसलें तरी थोडेसें कौतुक वाटल्याशिवाय राहिलें नाहीं.

कृ०—“ बरें, चल. झालें तें झालें. आतां यापुढें हा विषयच सोडून देऊं या कसा. त्यांचा आणि आपला थोडाच आतां कधीं संबंध येणार आहे ? मग नसती पंचाईत पाहिजे कशाला ? ”

के०—“ संबंधच कधीं आला नाहीं तर बरेंच झालें. पण जर चुकूनमाकून आलाच तर मात्र मी आतांचीच पुनरावृत्ति करावयास सोडणार नाहीं. ”

कृ०—“ केशव, तुला यांत कांहीं वाईट दिसत नाहीं पण निदान माझ्या दृष्टीला तरी हा तुझा विचार बरोबर दिसत नाहीं. ”

**के०**" तुझ्यासारखे कुठें आहेत बुवा सगळे धर्मराज ? तूं तरी काय म्हणा ? तसें ह्मटलें तर शांतीचें तुझें तरी हें ढोंगच आहे कीं नाहीं ? कारण तसें नसतें तर तुला तरी इतकें जळल्यासारखें कां झालें असतें व अजूनही होत आहे ? "

**कृ०**—" तुझ्या ह्मणण्याचा पूर्वार्ध बरोबर आहे. उत्तरार्ध मात्र साफ चुकला. माझ्या झालेल्या अपमानाच्या वेदनांनीं माझें मन नुसतें जळत होतें ही गोष्ट अक्षरशः खरी आहे. पण चांगला विचार केल्यानंतर त्याबद्दल आपल्या हातांत जें कांहीं करणें शक्य होतें तें आपण केलें आहे, मग आतां त्याबद्दल डोक्याला व्यर्थ शीण देण्यांत कांहीं हंशील नाहीं, असा मी विवेक केला. आतां माझ्या मनांत मालतीताईबद्दल पूर्वीप्रमाणें किंवा पूर्वीइतका आदरभाव नाहीं, हें मी कबूल करतों. पण त्याचबरोबर हेंही सांगून ठेवतों कीं त्यांच्याविषयीं माझ्या मनांत सूडाची भावना यत्किंचितही नाही. त्यांनीं माझ्या-बाबतींत दाखविलेल्या अविचाराबद्दल मी केलें तेवढ्यानेंच भागणार नाहीं असें तुझी मनोदेवता तुला सांगत असेल तर तुला काय योग्य दिसेल तें करण्यास तूं मोकळा आहेसच. "

**के०**—" ठीक आहे. उद्यां कॉलेजांत येशीलच तूं. "

**कृ०**—" हो तर-वा. "

कृष्णाही उठून जेवण्यास गेला.

ग्राउंडवरून मालती घरीं आली तेव्हांही केशवानें आपल्याशीं खेळण्याचें नाकारून आपला उपहास केला हीच गोष्ट तिच्या डोक्यांत खेळत होती. आप्पासाहेब व वसंत यांच्या काय गोष्टी चालल्या आहेत याकडे तिचें लक्षच नव्हतें. चाणाक्ष वसंताच्या तीक्ष्ण नजरेला हें उमगल्यावांचून राहिलें नाहीं. चौकशी करतां मालतीनें ग्राउंडवर घडलेली सर्व हकीकत त्याला सांगून टाकली.

**वसंत**—" पाहिलेंत आप्पा ? मी सकाळींच म्हणत नव्हतों ? हीं भिकाऱ्याचीं पोरें अशींच नष्ट असतात. जाऊं द्या झालें. आपण काय त्यांच्याकडे लक्ष घालायचें आहे ? मालतीताई, विसरून जा तुम्ही सगळें. आज रात्रभर अगदीं स्वस्थ विश्रान्ति घ्या. अभ्यासाचे वगैरे बिलकुल श्रम करूं नका. चला, थोडेंसें जेवून निजाच तुम्ही. त्यांत आणखी त्या नाटकामुळें काल रात्रींही तुम्हाला जागरण झालेलें आहे. "

स्वस्थ निजण्यासाठीं म्हणून मालती अंथरुणावर पडली. पण डोकें स्वस्थ नसतां निद्रा देवीची कितीही आराधना केली तरी उपयोग काय ? तिच्या डोक्यांत

एकसारखे निरनिराळ्या प्रकारचे विचार येऊं लागले. वसंत तिला आतां फार चांगला दिसूं लागला. मध्येंच तिच्या अंतःचक्षूपुढें कृष्णा उभा राही. तो तेजस्वी होता हें तिला अजूनही पटे. पण आपला कांहींही अपराध नसतां त्यानें जें विनाकारण आकांडतांडव केलें, इतकेंच नव्हे तर त्यानें इतरांजवळही जें नव्हतें तें सांगण्यास सुरुवात केली, याचा तिला फार संताप आला. उलटसुलट तिच्या मनांत विचार येत होते.

'काल रात्रीं आम्ही त्या भिकार क्लबचें विद्याहरण नाटक पहाण्यास गेलों. कोण तो मेला फुकऱ्या कीं विकत्या ? काय तें त्याचें गाणें ? काय पण लेकाचा तो सारंग आळवीत होता ? 'मधुरस–पान सौख्य फुकट्याचें,–' अगबाई ! याच ओळीनें आजचा सगळा गोंधळ उडाला नाहीं का ? काय तो कृष्णा चमत्कारिक मनुष्य तरी ? त्यानें आपलें सगळे आपल्यावरच ओढून घेतलें. त्याला उद्देशून कां मी ह्मणालें होतें तें ? शीः ! असला हलकटपणा माझ्या हातून कधीं तरी होईल का ? एखादा कोणी रिकामटेंकडा बसून आमच्या घरीं बारा महिने बत्तीस काळ खात बसला असता, तरीसुद्धां असल्या तऱ्हेचे त्याच्या काळजाला घरे पाडणारे निष्ठुर शब्द मी कधीं आपल्या मुखावाटें काढले नसते ! मग याच्यासारख्या विद्यार्थ्याला त्यांतूनही कॉलेज ज्याची एकमुखानें स्तुति करतें–अशा विद्यार्थ्याला मी असें बोलेन का ? याची सगळी हुषारी आज सकाळी गेली तरी होती कुठें ? मी आजपर्यंत त्याच्याशी कधी तरी अशा रीतीनें वागल्यें होतें का ? याचा त्यानें कांहींच विचार नको होता का करायला ? अगदीं मूर्खच तो !–छे पण त्याला मूर्ख तरी कसें म्हणावयाचें ? त्या दिवशीं कॉलेजांत त्यानें जें भाषण केलें तें एखाद्या देशभक्ताला साजेसेंच नव्हतें का ? खरेंच होतें त्याचें म्हणणें. टिळकांनीं लिहिलेल्या ग्रंथामुळें कां ते लोकमान्य झाले ? त्यांच्या लोकमान्यतेचें कारण त्यांची विद्वता हें नसून त्यांची निस्सीम स्वदेशप्रीतीच होती. त्यांचा उज्वल देशाभिमानच होता. स्वतंत्रतेला अभिमान अवश्यच नाहीं का ? अभिमानच नसेल तर स्वतंत्र होण्याची दैवी महत्त्वाकांक्षा तरी मनांत कशाला उद्भवेल ? कृष्णाच्या ठिकाणीं सुद्धां जर स्वातंत्र्यप्रीति इतक्या उत्कटतेनें वास करीत आहे, तर त्याच्या अंगीं अभिमान असलाच पाहिजे. पण म्हणून स्वाभिमानाचें रक्षण करण्यासाठीं दुसऱ्यांच्या कृतीचा किंवा बोलण्याचा विपर्यास करण्याचा मूर्खपणा करावयाचा कीं काय ? पण त्यानेंही एका दृष्टीनें बरोबरच नाहीं का ? मी बोललें ती त्याला उद्देशून बोलल्यें नाहीं हें त्याला थोडेंच माहीत होतें ? त्याची अशीच कल्पना कीं मी श्रीमंताची

ऐदी मुलगी—गरिबांना घालून पाडून बोलण्यांतच आनंद मानणारी असावयाची ! तेव्हां त्याच्या त्या वेळच्या वर्तनामुळें त्याच्या हातून आमचा सर्वांचा अपराध घडला हें खरें असलें तरी त्यांत त्याची तेजस्वी वृत्ति स्पष्ट दिसून येते यांत शंकाच नाहीं. धीट तरी किती तो ! आपल्यांत आणि आमच्यांत जमीन अस्मानाचें अंतर आहे हें पुरतेपणीं माहीत असतां आमच्या तोंडावर तो आम्हाला फडाफड बोलून गेला ! मग ही मी त्याची चूक समजावयाची कीं त्यानें दाखविलेल्या तेजस्वी वृत्तीबद्दल त्याचें कौतुक करावयाचें ? तरी पण इतका सगळा प्रकार केल्यानंतर गांवभर त्याचीच चर्चा करीत फिरणें हा हलकटपणाच नाहीं का ? जोशानी सर्वांशीं माझ्याशी खेळण्याचें नाकारलें, यालाही कृष्णाच कारण असला पाहिजे. मूळांतच चुकीची समजूत करून घेण्याची चूक केलेली आणि वर आणखी हे असले प्रकार ! त्याची तेजस्वी वृत्ती य कुटिल वर्तनामुळें हिणकसच ठरते. मला वसंतरावांचें म्हणणें आतां हलके हलके पटूं लागलें आहे. मी तरी आपल्या डोक्याला हा नसता त्रास करून घेऊन मूर्खपणाच करीत आहें म्हणा ! जोशी माझ्याशीं खेळण्यास तयार कां नव्हते, याचें खरें कारण इतरांना थोडेंच माहीत आहे ? त्या सर्वांनीं तर त्यांना भ्याडच ठरविलें कीं नाहीं ? छान झालं—परस्परच शिक्षा झाली. कांहीं बाबतींत तेजस्वी असणारीं माणसें इतर बाबतींत नीच असूं शकतात तर ? मला तरी काय करायचें आहे त्यांच्याशीं ? बरी—लवकरच परीक्षा झाली. माझा आणि त्यांचा पुनः कधीं थोडाच संबंध येणार आहे ? व्हायचें तें होऊन गेलें. ”

किंचित् मन शांत झाल्यावर तिला झोंप लागली. तरी देखील स्वप्नांत तिला त्या दिवशींच्याच साऱ्या गोष्टी दिसत होत्या.

---

## प्रकरण ८ वें.

दुसऱ्या दिवशीं मालती कॉलेजांतून परत आल्यावर नेहेमीप्रमाणें ती टेनिस् खेळण्यासाठी ग्राउंडवर गेली नाहीं. मनाची करमणूक करण्यासाठीं म्हणून जावयाचें आणि निष्कारण डोक्याला त्रास करून घ्यावयाचा यांत कांहीं अर्थ नाहीं, म्हणून तिनें आज मलबार हिलवर फिरावयास जाण्याचें ठरविलें.

**मालती**—" आप्पा, आज मला खेळायला जाण्याचा अगदीं कंटाळा आला आहे. रोज आपला तोच तोच खेळ कसला खेळावयाचा? आज आपण कुठें तरी फिरायलाच जाऊं या ना? हँगिंग् गार्डन्स्वर चलता का? "

**आप्पा**—" मला बुवा अगदीं कंटाळा आला आहे. मला आधीं पूर्वीपासूनच बाहेर पडायला नको; आणि आतां तर काय मला मुळीं फिरण्याची फारशी ताकदच नाहीं. "

**मालती**—" मला नाहीं का हें माहीत? मी तुम्हांला पायीं का यायला सांगेन? गाडी जोडायला सांगतें म्हणजे झालें. "

**आप्पा**—" कशाला? म्हणजे त्यांत तुला व्यायाम कसा घडणार? वसंत येईल तुझ्याबरोबर. आतां काहीं तुला त्याच्या एकट्यावरोबर फिरावयास जाण्यास संकोचण्याचें कारण नाहीं, जा आपलीं तुम्ही. मात्र जेवायला वेळेवर परत या हो. नाहीं तर बसाल गप्पा ठोकीत आणि मला एकट्याला इथें ताटकळत बसावें लागेल. "

**वसंत**--" आप्पा, तशी भीति तुम्हाला वाटण्याचें कांहींच कारण नाहीं. शिलो-च्चये मूर्च्छति मारुतस्य। मी कितीही बोलका असलों तरी मालतीताईच्या तोंडातून शब्द तरी बाहेर पडला पाहिजे ना? नाहीं तर मी एकटा बोलणार तरी काय आणि किती? मी आपला एकटाच बडबडत बसलों तर यांनाच वाटूं लागेल ' कीं मी एक शब्दही बोलत नाहीं आणि यांचें तोंड आपलें एकसारखें सुरूं आहे.' पण मी बरें असें करीन! या माझ्याशीं बोलल्याशिवाय मी यांच्याशीं बोलणारच नाहीं. आणि या तर बोलणार नाहींत हें ठरलेलेंच आहे. तेव्हां आम्ही दोघेंही मूकस्तंभ वृत्तीनें कितीसा वेळ काढूं शकणार? "

**आप्पा**--" हां! हा ठीक प्रश्न केलास. अरे बाबा कसेंही असलें तरी या बाबींत पोरेंच आहांत. तरुण आणि तरुणी-विशेषतः तुमच्याप्रमाणें तीं वाग्दत्त वधूवरें असलीं म्हणजे एकमेकांच्या नुसत्या सहवासांत तोंडांतून एक शब्दही न काढतां वेळ कसा जातो हें त्यांना कळत सुद्धां नाहीं. मुक्यानेंच त्यांचें सर्व बोलणें चालणें सुरूं असतें. तुला आतांच त्याची कल्पना नाहीं येणार. पण आमचा अनुभव आम्हाला माहीत आहे ना? हंसायला कां आलें? तुमच्या दोघांच्या देखत मी या गोष्टी बोलतों आहें म्हणून होय? माझा स्वभावच आपला बुवा मोकळा आहे. तुम्ही काय आतां लहान आहांत? तुमची आम्ही आतां थट्टा करायची नाहीं तर आम्ही आपली

करमणूक तरी कशी करून घ्यावयाची ? आणि त्यांत तर तूं म्हणजे असा वस्ताद आहेस कीं तूं आपला एकटासुद्धां तासचे तास बोलत बसशील. बरें, चला आतां. उगीच इथेंच बोलत बसून उशीर करूं नका. नाहीं तर तुम्हाला उशिरानें परत येण्याला तेवढीच सबब सांपडावयाची !"

दोघांनाही आप्पासाहेबांचें बोलणें ऐकत असताना मनांतल्या मनांत आनंद होत होता. वसंतानें कपडे चढविले आणि मालतीसह तो बाहेर पडला.

वाट चालूं लागल्यावर कांहीं वेळ कोणीच कांहीं बोलेना. शेवटीं वसंतानेंच सुरुवात केली, "तुम्हाला बोलल्याशिवाय रहावतें तरी कसें बुवा ?"

**मालती**—"कांही तरी प्रश्न विचारल्याखेरीच किंवा कांहीं तरी विषय निघाल्याखेरीज बोलायचें तरी काय ?"

**वसंत**—"बोलण्याला विषयाची जरुरी कदाचित असूं शकेल. पण प्रश्नाची जरुरीच आहे, असें मात्र मला वाटत नाही. मला कुठें तुम्ही प्रश्न केला होतात ? पण मी बोलण्याला सुरुवात केलीच कीं नाहीं ? मला बुवा बोलकी माणसें फार आवडतात."

**मालती**—"मलासुद्धां बोलके लोक आवडतात व बोलण्यालाही आवडतें."

"मग मी बोलका आहेंच" असें म्हणून वसंत किंचित् हंसला. त्याच्या बोलण्याचा भावार्थ लक्षांत आल्यामुळें मालतीलाही हंसूं आलें.

बरोबर याच वेळीं कृष्णा व केशव दुसऱ्या फूटपाथवरून चालले होते. त्यांचें लक्ष या जोडीकडे गेलें. अविवाहित युवक आणि युवती एकमेकांबरोबर जात असतां चाललेला हास्यविनोद हा भावी मंगलसमारंभाचा सूचक समजला जातो. केशवाची तर जवळ जवळ खात्रीच झाली कीं वसंतानें कोर्टिंगला सुरुवात केली असून त्यांत त्यानें यशही संपादन केलें असलें पाहिजे. त्यांत त्याला वाईट किंवा चमत्कारिक वाटण्यासारखें कांहींच नव्हतें आणि तसें त्याला वाटलेंही नाहीं. दोघेंही सुशिक्षित, तरुण, सुंदर आणि श्रीमंत. तेव्हां इतके गुण एकमेकांशीं मिळते असल्यानंतर त्यांचें एकमेकांवर प्रेम जडणें यांत आश्चर्य करण्यासारखें कांहीं नव्हतें.

वसंताचेंही त्या जोडीकडे लक्ष गेलें. त्याला बोलायला आयताच एक विषय मिळाला.

**वसंत**—"तो पहा लेकाचा भटकत चालला आहे."

**मा०**—" तो कोण ? "

**वसंत**—" ते आपले-कृष्णराव वारकरी—"

कृष्णाचा मालतीला राग आला असतांही वसंताच्या तोंडचे ' कृष्णराव-वारकरी ' हे शब्द तिला ऐकवेनात. तिला वसंताचा त्याबद्दल राग आला. आपल्या डोक्यांत कृष्णासंबंधीं संतापाचे विचार असून सुद्धां वसंतानें त्याला वारकरी म्हणून हिणविलेलें आपल्याला कां खपलें नाहीं याचा तिला उमज पडेना. यामुळें तिला एवढेंच कळून आलें कीं आपली इच्छा नसली तरी कृष्णासंबंधीं कोणत्या तरी गोष्टीसंबंधानें आपल्या हृदयांत आदर वसत आहे.

**मालती**—" काय ? तो भटकत चालला आहे, नाहीं ? "

**वसंत**—" तो पहा-तो पहा-"

**मालती**—" आणि वसंतराव, आपण कसे चाललों आहोंत ? "

**वसंत**—" आपणही फिरायलाच जात आहोंत. "

**मालती**—" मग तोही फिरायलाच जात आहे, असें कां नाहीं तुम्ही म्हणालां ? "

**वसंत**—" याचें कारण काय, अगदीं उघड आहे. आपल्या स्वतःबद्दल कोणी वाईट शब्दाचा उपयोग करतो का ? "

**मालती**—" दुसऱ्याबद्दल सुद्धां बोलतांना कोणी तसें करावें हें मला बरें वाटत नाहीं. अशा बोलण्यानें बोलणाराचा कांहीं फायदा होत नाहीं किंवा ज्याला उद्देशून तो बोलत असतो त्याचेंही कांहीं नुकसान होत नाहीं, पण बोलणाराच्या मनाचा हलके-पणा मात्र जगाच्या निदर्शनास येतो. माझ्या तोंडून एखादा कठोर शब्द निघून गेला असला तर आपल्या मनाला लावून घेऊं नका हं ! "

**वसंत**—" O ! Never mind ! तुम्हाला जें कांहीं बोलावयाचें तें अगदीं खुशाल निर्भीडपणें बोलत चला. तुमच्या कोणत्याही बोलण्याचा, तें अगदी मना-पासून येत असल्यामुळें मला केव्हांही राग येणार नाहीं. पण आतां तुम्ही म्हणालांत यावर माझें असें म्हणणें आहे कीं दुसऱ्या कोणासंबंधानें मी असें बोललों असतों तर तुमच्या म्हणण्याप्रमाणें तें माझ्या मनाच्या हलकेपणाचें खरोखरच द्योतक झालें असतें. पण याच्यासंबंधानें असें बोलण्याला आपल्याला आतां हक्कच प्राप्त झाला आहे."

**मालती**—" आपल्याला एखादा हक्क प्राप्त झाला असला म्हणजे त्याचा दुरुप-योगच केला पाहिजे हा विचारच मूळांत नीचपणाचा आहे. असला हक्क आपल्याला

असतांही त्याचा दुरुपयोग न करणें हाच खरा थोरपणा आहे, असें नाहीं का तुम्हाला वाटत ? आणि शिवाय याच्या बाबतींत असल्या प्रकारचें बोलण्याला आपल्याला हक्क कसा प्राप्त झाला आहे, हेंच मला समजत नाहीं.''

**वसंत**—" एक तर कांहीं वेळां तरी यानें आपल्याकडे अन्न खाल्लें आहे—"

**मालती**—" तुमचे हे शब्द ऐकून मला फार वाईट वाटतें, वसंतराव ! चार दोन वेळां एखादा माणस आपल्याकडे जेवला तर त्याच्या संबंधानें कांहींही बोलण्याला आपल्याला अधिकार प्राप्त होतो काय ? तो आमच्या घरीं फुकट जेवून गेला असें तुमचें म्हणणें. पण आम्ही आमचें तरी फुकटच खात नाही का ? आम्ही तरी त्याकरितां कितीसे कष्ट केले आहेत ? आमच्या वाडवडिलांनीं आमच्या करितां इस्टेट् ठेवली—त्याच्या वाडवडिलांना ती ठेवतां आली नाहीं, हाच ना त्याचा दोष ? "

**वसंत**—" तुमच्या ध्यानांत नाहीं आला माझ्या म्हणण्याचा अर्थ. त्याच्या बापजाद्यांनीं त्याच्याकरिता संपत्ति ठेवली नाहीं, हा त्याचा दोष समजण्याइतका मी मूर्ख नाहीं. आपण श्रीमंत आहों हा जसा आपला सद्गुण नाहीं, त्याचप्रमाणें तो गरीब आहे हा त्याचाही दुर्गुण नाहीं हें मी जाणतों. तो गरीब म्हणून मी त्याला वाटेल तसें बोलतों ही तुमची झालेली समजूत साफ चुकीची आहे. तो गरीब आहे, हा त्याचा दोष नाहीं तर आपल्या परिस्थितीची जाणीव ठेवून जगांत आपण कसें वागावें, याची त्याला अक्कल नाहीं हा त्याचा दोष आहे. मला त्याचा संताप आला तो यामुळेंच. बरें, त्याला अक्कल नाहीं तर नाहीं पण त्याच्या बेअकलीपणामुळें आपणा सर्वांना निष्कारण त्रास सोसावा लागला आहे. "

आपल्या मनांत चाललेल्या विचारांचें काहूर तिला एकदां थाबवायचेंच होतें. तेव्हां ते सर्व ओकून टाकण्याचा तिनें अगदीं निश्चयच केला होता. वसंतरावांचें म्हणणें आपल्याला ऐकायला सांपडेल व त्यामुळें आपल्या डोक्याला स्वस्थता मिळेल अशी तिची कल्पना होती.

**मालती**—" त्याच्यामुळें आपल्याला कसला त्रास झाला आहे, माझ्या नाहीं लक्षांत आलें. "

**वसंत**—" कां बरें ? आपल्याला वाटेल तें बोलून आपला उपमर्द करून त्या दिवशीं तो चालता झाला तेव्हां आपल्याला त्रास झाला नाहीं का ? "

**मालती**—" पण त्याला जो त्रास झाला असेल त्याचा विचार करतां आपल्याला कांहींच त्रास झाला नाहीं असेंच म्हणणें आपल्याला भाग पडेल. त्याचा

मी अपमान केला, त्याच्या गरिबीला—ज्या दोषाबद्दल तो स्वतः जबाबदार नाहीं—मी टोमणा मारला अशी कल्पना झाल्यामुळेंच तो आपल्याला उपमर्दकारक शब्द बोलला. त्याला असल्या प्रकारचा संशय येण्यासारखे शब्द जर मींच बोललें नसतें तर त्याला तरी असें करण्याचें कारण कशाला पडलें असतें ? "

**वसंत**—" तुम्ही त्याला उद्देशून म्हणून बोलला नसतांना, त्यानें तुमचें बोलणें आपल्यावर ओढून घेतलें, हा काहीं आपला दोष नाही. म्हणजे अर्थातच त्याला जो त्रास पडला असें तुम्ही म्हणालांत त्याबद्दल कांही आपण जबाबदार नाही. पण आपल्याला त्रास झाला त्याबद्दल तो मात्र खात्रीनें जबाबदार आहे. "

**मालती**—" असें कसें तुम्ही म्हणतां ? त्याचें डोकें गरम व्हायला आपण नाही का कारण झालों ? "

**वसंत**—" पण आपण त्याचें काय घोडें मारलें होतें ? नुसत्या संशयानें अशी डोक्यांत राख घालणारा मनुष्य मूर्खच असला पाहिजे. म्हणजे हें आश्चर्य आहे बुवा. म्हणजे आपल्याच घरांत आपल्यालाच बोलायची चोरी झाली म्हणायची ! हा आमच्याकडे वारकरी म्हणून यायचा आणि आम्ही काहीं तरी बोललों तर तें आपल्याला उद्देशूनच आहे, अशी आपली समजूत करून आपल्या स्वाभिमानाचें नस्तें स्तोम माजवून आम्हाला हवें तसें बोलावयाचें हा शुद्ध मूर्खपणा आहे. "

**मालती**—" मला वाटतें कीं तो कदाचित् मूर्ख असला तरी बहाद्दर खात्रीनें असला पाहिजे. अपमानाची नुसती कल्पनाही ज्याला सहन होत नाहीं, तो प्रत्यक्ष अपमान तर सहन करून घेणार नाहींच नाहीं. मलासुद्धां पहिल्या प्रथम त्याचा राग आला होता. पण थोड्याशा विचारानें मला त्याचें कौतुक वाटायला लागलें. गरीब झाला म्हणून काय झालें ? त्याच्या अंतःकरणाला काय स्वाभिमानाची जाणीव नाही ? स्वाभिमानाला पारखा असलेल्या माणसानें आपल्या कपाळावर " मनुष्य " अशी पाटीच चिकटविली पाहिजे. नाहींतर इतर माणसांना त्याची ओळख पटणें जडच जाईल. "

**वसंत**—"नाहीं. नाहीं. म्हणजे गरीबांना स्वाभिमानच नसावा, असें माझें मुळींच म्हणणें नाहीं. स्वाभिमान ही माणसाची साक्षात् जीवनकला आहे, असेंच माझेंही मत आहे. पण स्वाभिमानी माणसानें मूर्खच असलें पाहिजे असें मला वाटत नाहीं. खरोखरच आपला अपमान झालेला आहे कीं काय याचा नीट विचार करूनच माणसानें

पुढें पाऊल टाकलें पाहिजे. आपणच आपली कांहीं तरी कल्पना करून घेऊन असला अविचार करणें म्हणजे आपल्या अकलेच्या दिवाळखोरीचें प्रदर्शन मांडण्यासारखें आहे."

**मालती**--" द्रव्याच्या दुर्बलतेबरोबरच ज्यांचीं मनेंही दीन दुर्बल बनलेलीं असतील, तेच मुर्दाड गरीब अशा प्रसंगीं विचार करून स्वस्थ बसतील. पण द्रव्याच्या बाबतींत हतबल असून, ज्याच्या नसांतून अस्सल मानवाचें जातिवंत रक्त सळसळत आहे, तो अपमानाची नुसती कल्पनासुद्धां निमूटपणें सहन करणें केव्हांही शक्य नाहीं. अपमानाच्या नुस्त्या कल्पनेनें सुद्धां मस्तक सुन्न होणें यांतच त्याच्या स्वाभिमानाची तीव्र उत्कटता दिसून येते."

**वसंत**--" स्वाभिमान हा सद्गुण आहे, हें मलाही नाकबूल नाहीं, हें मी तुम्हांला मघाशींच नाहीं का सांगितले ? तुमच्या व माझ्या विचारसरणींत फरक म्हणजे इतकाच आहे कीं अपमानाच्या नुसत्या कल्पनेनें खवळून जाणें याला तुम्ही तेजस्वितेचें लक्षण मानतां तर मी त्याला मूर्खपणाचें लक्षण समजतो. नुसत्या भ्रामक कल्पनातरंगांनी एकदम भलतेंच कांहीं तरी करण्यास तयार होणे हा शुद्ध आततायीपणा आहे, असें माझें स्पष्ट मत आहे; व तें केव्हांही बदलणें शक्य नाहीं. स्वाभिमानाबरोबरच माणसाच्या अंगीं विवेकही वसत असला पाहिजे. विवेकविरहित स्वाभिमानाला मी सद्गुण समजण्यास तयार नाहीं. उलट त्याची मी दुर्गुणांतच गणना करणार."

**मालती**—" मी आपलें उगीच तुमचे मन पाहिलें हो वसंतराव. मलासुद्धां तुमच्या सारखेंच वाटतें. पण आपला एखाद्याविषयी कायमचा वाईट ग्रह करून घेण्यापूर्वी उलटसुलट बाजूंनीं विचार केलेला बरा, एवढ्याचकरितां मी तसे बोलत होतें. पण माझें अजूनही नीटसें समाधान झालेलें नाहीं. तुम्हाला माझ्या बोलण्याचा कंटाळा तर नाहीं ना आला ?"

**वसंत**—" तुमच्या बोलण्याचा मला कधीं कंटाळा येईल, अशी शंका देखील मनांत आणूं नका. तुम्ही कोणत्याही विषयाबद्दल कांहींही बोलूं लागलां तरी तुमचें बोलणें ऐकत असतां मला आनंदच वाटतो. सांगा तुमची अजून कोणती शंका उरली आहे ती. प्रयत्न करून बघतों तिचें निरसन मला करतां आलें तर."

**मालती**—" कांहीं वेळाच अशा चमत्कारिक असतात कीं तेथें विवेकाला अवसरच मिळणें शक्य नसतें. तडफदार माणसांच्या हातून आपल्या झालेल्या—किंवा

झाला असें तो समजत असलेल्या अपमानाला तडकाफडकींच उत्तर दिलें जातें. असलाच कालचा प्रसंग नव्हता का ? त्याला त्या वेळीं विचार करायला वेळ होता कुठें ? तुम्हाला माझें ह्मणणें पटत नाहीं, हें तुमच्या चर्येवरून दिसतच आहे. बाकी खुद्द तुमच्याशीं एखाद्या गरिबाचा प्रसंग आलाच तर त्या बिचाऱ्याचें मरणच ओढवायचें !"

**वसंत**--" मूळपासून आपल्या मनाला असें शिक्षणच प्रत्येकानें देऊन ठेविलें पाहिजे कीं आपल्या हातून अविचारानें कोणतीही गोष्ट होऊंच नये. मनाला असें वळण एकदां लागलेलें असलें म्हणजे कोणत्याही प्रसंगीं त्याची विवेकबुद्धि नष्ट होत नाहीं. आतां तुम्ही म्हणतां कीं माझ्याशीं एखाद्या गरिबाचा प्रसंग आला तर त्या बिचाऱ्याचें मरणच ओढवायचें. पण ही तुमची खरोखरच चूक आहे. मला गरिबांचा तिरस्कार वाटतो, किंवा त्यांच्याकरितां मला कांहींच करावसें वाटत नाहीं अशी माझ्या एकंदर बोलण्यावरून तुम्ही आपल्या मनाची समजूत करून घेतली असेल तर साफ चुकीची आहे. मला राग येतो तो या भिकारड्यांच्या मगरूरीचा–त्यांच्या ताठरपणाचा ! हे जर आपल्या सारख्यांशीं जरा बेताबातानें वागले तर त्यांत यांना कसला कमीपणा येणार आहे ? उलट त्यांचा त्यांत फायदाच आहे. आमचा फायदा तर ते कधींच करूं शकणार नाहींत, हें तर कोणालाही कबूल करावें लागेल. मग दुसऱ्याचें हित आपल्याला साधतां येत नाहीं तर अनायासें साध्य होण्यासारखें आपलें हित त्यांनीं आपल्यासारख्यांशीं सरळपणानें वागून साधून कां घेऊं नये ? मिजासखोरपणापेक्षां विनयशीलपणाच आपल्या अधिक उपयोगी पडणारा आहे, एवढी साधी गोष्ट सुद्धां ज्यांच्या लक्षांत येत नाहीं, अशा मूर्ख लोकांचाच फक्त मला संताप येतो. तुमच्याचप्रमाणें गरिबी हा मीही दोष मानीत नाहीं. इतकेंच नव्हे तर श्रीमंतांइतकाच गरिबांविषयींही मला आदर वाटतो. पण तो फक्त त्यांनीं आपल्या मर्यादेचें उल्लंघन केलें नाहीं तर. प्रत्येकानें आपलें स्थान लक्षांत ठेवलेंच पाहिजे. "

**मालती**—" म्हणजे तुमचें असें म्हणणें कीं धनिकांची वर्तणूक कशीही असली तरी त्याविरुद्ध प्रतिकार न करणारा किंबहुना आपल्या हांजीहांजींत खळ पडूं न देणारा असा मुत्सद्दी दरिद्री मनुष्य असला तरच फक्त तुम्हाला त्याच्याबद्दल आदर वाटेल. "

**वसंत**—" असेंच नाहीं केवळ. आपण ज्यांच्यावर अवलंबून आहोंत किंवा ज्यांच्यापासून आपल्याला आपल्या फायद्याची कांहीं अपेक्षा आहे, अशा श्रीमंत मनु-

ध्याचें वर्तन त्या गरिबाला गर्ह्य वाटतच असेल तर तें त्यानें अशा बेतावातानें उघड करून दाखविलें पाहिजे कीं त्यांत त्या श्रीमंत माणसाचें मन दुखविलें जाणार नाहीं."

**मालती**—"थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे गरिबांनीं श्रीमंतांची मर्जी संभाळू-नच जगांत दिवस काढले पाहिजेत, असें तुमचें म्हणणें ?"

**वसंत**—"होय; आणि तें त्यांना भागच आहे, हें थोड्याशा विचारांतीं तुम्हा-लाही पटल्यावांचून रहाणार नाहीं. पण मला वाटतें या विषयाचा ऊहापोह आतां बराच झाला. तुम्हाला या प्रश्नाची उलट बाजू तरी मांडावीशी वाटली. पण मला तर ती दिसतही नव्हती व पटतही नाहीं. पुष्कळ वेळां आपल्याला हे वाद अगदीं साधे वाटतात पण अशा साध्या वादविवादानेंही एकमेकांना एकमेकांविषयीं वाटत असलेल्या प्रेमाचा हळुहळु लोप होत जातो याचे प्रत्यक्ष दाखले मला माहीत आहेत. तेव्हां या विषयांत पुनः वादविवाद न माजविण्याची खबरदारी आपण घेतली पाहिजे. कारण त्या व्यक्तीशीं आपल्याला आतां कांहींच कर्तव्य नाहीं. इतर विषय काय आपल्याला थोडे आहेत ? प्रेमी जनांनीं, ज्या विषयांवर मतभिन्नता उत्पन्न होते, असे विषय टाळणें नेहेमीं शहाणपणाचे असतें."

**मालती**—"आतां मलाही या विषयाचा अगदीं कंटाळा येऊं लागला आहे. त्यावेळचें कृष्णाचें वर्तन म्हणजे मूर्खपणाचेच होतें हें आतां मलाही तंतोतंत पटूं लागलें आहे. माझी किंवा आपल्यापैकी कोणाचीच यत्किंचितही चूक नसतां त्यानें आपला अपमान झाला अशी स्वतःची समजूत करून घेऊन मूर्खपणा तर केलाच. पण तेंच सर्वांना सांगत सुटून आणखी त्यांत नीचपणाचीही भर घातली. खरोखरच मला त्याचें नांव सुद्धां आतां तिरस्करणीय वाटत आहे."

हलके हलके तीं हँगिंग् गार्डन्स्वर येऊन पोहोंचलीं. आजपर्यंत तीं तेथें किती वेळां तरी गेलेलीं असतील. पण परस्परांच्या सहवासामुळें आज त्या ठिकाणीं त्यांना अननुभूत असा आनंद वाटूं लागला. एका बाजूला एक रिकामें बांक पाहून त्यावर बसल्यावर वसंत बोलूं लागला.

"आजपर्यंत शेंकडो वेळां मी या ठिकाणीं येऊन बसलों असेन. ही जागाच अशी आहे कीं इथें आल्यानंतर कोणीही प्रसन्न झालाच पाहिजे. पण त्यावेळीं अनुभ-विण्यास मिळालेला आनंद आज वाटत असलेल्या आनंदाशीं तुलना केली असतां कांहींच नाहीं. आज मला हा मृत्युलोकची बाग वाटत नसून इन्द्राचें नंदनवनच वाटत आहे."

" अगदीं नाटकी भाषाच बोलूं लागलां तुम्ही, " मालती हंसून म्हणाली.

" प्रसंगच नाटकी असल्यामुळें भाषाही नाटकीच सुचणार ! खरोखरच मालतीताई, तुमच्या सान्निध्यामुळें मला इथें स्वर्गीय सुख वाटत आहे. माझ्या सहवासामुळें माझ्या इतका नाहीं तर नाहीं पण तुम्हांला इथें येऊन नेहमीं वाटणाऱ्या आनंदांत कमीपणा वाटत नसला तरीहि मी स्वतःला मोठा भाग्यवान समजेन, " वसंत म्हणाला.

मालतीला हंसूं आलें. याच विषयावर आपण बोलत रहावें अशी तिची इच्छा आहे, हें वसंताच्या लक्षांत येण्यास फारसा अवकाश लागला नाहीं. तो पुढें बोलूं लागला.

" एखाद्या कवीला तर स्फूर्तीच व्हावयाची अशा जागीं. इथें लता आहेत, रंगीबेरंगी फुलें आहेत, नाना जातींच्या व वर्णांच्या युवती आहेत, त्यांच्याचबरोबर कित्येक हौशी युवकही आहेत, गोजिरवाणीं बालकें आहेत, वर नील नभोमंडळ आहे, त्यातच मधून मधून एखादी तारका लुकलुकते आहे, शीतल वायु सुटलेला आहे, एका बाजूला अफाट दर्या पसरलेला दिसत आहे, पक्षिगण आपापल्या घरट्यांकडे परत जात आहेत. यापैकी कोणताही एक विषय डोळ्यासमोर असतांना जर कवीची स्फूर्ति जागृत होते, तर ते सर्व एकसमयावच्छेदेंकरून इथें एकवटलेले दृष्टीस पडत असतां कवीला तर स्फूर्ति होईलच, पण एखाद्या रुक्ष मनाच्या मनुष्याला सुद्धां काव्य करण्याची उकळी येईल. "

**मालती**—" जाऊं द्या. निदान सध्यां तरी हें जिवंत काव्य माझ्या दृष्टीसमोर असतांना निर्जीव कागदावरील काव्याची मला कांहींच आवश्यकता भासत नाहीं. कारण कवि, काव्यांत जो विषय रेखाटणार तो मला डोळ्यांनी प्रत्यक्ष दिसत असतां, त्याच्या काव्यानें मला अधिक तो काय आनंद होणार ? ज्यानीं या सुंदर स्थलाचा अनुभव घेतलेला नाही अशा लोकांकरितां पाहिजे तर ' प्रत्येकानें एकदां तरी या ठिकाणीं यावेंच, ' एवढी एकच ओळ लिहिली म्हणजे बस् आहे.

**वसंत**--" मालतीताई, तुम्ही आतां लवकरच आर्ट्स्च्या ग्रॅज्युएट होणार. तुमच्या तोंडून असे शब्द बाहेर पडतील अशी माझी कल्पना नव्हती. कवि कोणत्याही काव्यांत आपल्या पदरचें असें कांहींच सांगत नाहीं. तो जें सांगतो तें सर्व जगाला ठाऊकच असतें. तें कसें सांगावयाचें एवढीच काय ती खुबी असते. "

**मालती**--" हें मलाही माहीत आहे. पण सध्यां तरी मला अशी खात्री वाटते कीं प्रत्यक्ष इथें बसल्यानें मला जो आनंद अनुभवितां येत आहे, त्याच्या शतांशही याच ठिकाणाचें वर्णन असलेल्या काव्यांत कांहीं मला वाटणार नाहीं. "

**वसंत**—" जिवंत काव्य निर्जीव काव्यापेक्षां श्रेष्ठतर आहे, हें मलाही कबूल आहे. पण प्रत्यक्ष स्थळ पाहिलेलें असतांना त्यावरील एखादी सुंदर कविता वाचली असतां मनाची दुप्पट करमणूक झाल्याशिवाय रहात नाहीं. तुमची स्वतःची कल्पना व कविकल्पना यांमधील फरक तुह्माला कळून आल्यावर सध्यांपेक्षा अधिक आनंद तुम्हाला झाल्याखेरीज रहाणार नाहीं, हें मी खात्रीनें सांगतों. याची प्रचीति तुम्हाला उद्यां सकाळींच दाखवीन."

कांहीं वेळ गप्पा झाल्यावर घरीं जाण्याला उशीर होऊं नये ह्मणून इच्छा नसतांही तीं लवकरच परतण्याकरितां उठलीं. जेवण झाल्यावरोबर वसंत कोणाशीं गोष्टी बोलण्याच्या नादीं न लागतां आपल्या निजण्याच्या खोलींत गेला. मघांशीं हिल्वर जागृत झालेली त्याची काव्यस्फूर्ति अद्यापि जागीच होती कविता लिहून पुरी झाल्यावर त्याचें त्यालाच समाधान वाटून मालतीताईंना ती केव्हां एकदां वाचून दाखवूं असें त्याला होऊन गेलें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं चहा घेत असतां त्यानें मालतीताईंना आपली कविता लिहून तयार असल्याचें सांगितलें. मालतीला त्यांत काय विशेषसें असणार असें वाटत होतें. पण केवळ वसंताकरितां म्हणून तिनें तें वाचण्यास घेतलें. ते वाचल्यानंतर मात्र आदल्या दिवशीचें वसंताचें म्हणणें तिला पटूं लागलें. ती कविता खरोखरच फार सुंदर होती. हिल्वर पोहोंचण्याच्या अगोदर त्या उभयतांमध्यें चाललेल्या गोष्टींनीं तिचें मन वसंताविषयीं किंचित् खट्टू झाल्यासारखें झालें असलें तरी आतां ती तें सर्व विसरून गेली. वसंताच्या विद्वत्तेची आणि हुषारीची तिला पहिल्यापासूनच जाणीव होती आणि आतां त्यांत ही एक भर पडली. मग काय विचारतां ?

**मालती**—" खरंच. वसंतराव, कालचें तुमचें म्हणणें अगदीं यथार्थ होतें हें आतां मला कळलें. मला कल्पनाही नव्हती कीं तुम्ही इतकी सुंदर कविता करूं शकाल. तुम्ही जर ही प्रसिद्ध कराल तर आज जे हाताच्या बोटांवर मोजण्याइतके कवि महाराष्ट्रांत आहेत त्यांतच तुमची गणना होऊं लागेल."

" Thank you for your kind opinion, " एवढेंच म्हणून वसंत अगदीं समाधानानें हंसला.

" मग कधीं देणार ही तुम्ही प्रसिद्ध करण्याला ?"

" I am sorry—मालतीताई, मला खरोखर आपल्या कविता वगैरे प्रसिद्ध

करून प्रसिद्धीस येण्याचा मनापासून कंटाळा आहे. मला आपला लहानपणापासूनच तो नाद आहे हें खरें. मला आपली ती एक करमणूकच आहे म्हणाना?" वसंत म्हणाला.

"बरें तर. सध्यां हा कागद माझ्याजवळ राहूं द्या. लीलाताईलाही मी तो दाखविणार आहें. माझी पक्की खात्री आहे कीं तिलाही ही कविता फारच आवडेल," मालती म्हणाली.

**वसंत**—"मालतीताई, मला तुम्हाला एक प्रश्न विचारावयाचा आहे, विचारूं का?"

**मालती**—" त्याला अगदीं एवढी परवानगीच कशाला विचारायला पाहिजे ?"

**व०**—" प्रश्नच जरा चमत्कारिक असल्यामुळें परवानगीची जरुरी भासली. मीं एकदम सरळच प्रश्न करतों म्हणून भांबावूं नका किंवा संकोचही करूं नका. आप्पा-साहेबांकडून मला समजलेंच आहे. पण प्रत्यक्ष तुमच्या तोंडून तें ऐकल्याशिवाय माझ्या मनाला खरें समाधान वाटणार नाहीं. माझ्याशीं विवाह करून मला तुम्ही धन्य कराल का ?"

**मालती**—" विनाकारण कालाचा अपव्यय न करितां मीही तुम्हाला अगदीं सरळ उत्तर देतें. अगदीं विनयशील म्हणून मी नांवाजली गेलेली असतांना मी इतकी स्पष्टवक्ती कशी झालें याचें तुम्हाला कदाचित् आश्चर्य वाटेल. पण मी आपण होऊनच तुम्हाला याबद्दल सांगणार होतें. इतक्या निर्भीडपणें सांगितल्याबद्दल तुम्ही माझ्याबद्दल गैरसमज करून घेणार नाहीं, ही माझी खात्री आहे."

वसंताला वाटलें कीं कांहीं तरी गाडें बिथरलें. तरी पण एकदां काय तो कायमचा निकाल लावून घेतलेला बरा म्हणून तो म्हणाला "सांगा–सांगा–काय तुम्हाला सांगायचें तें. मेहेरबानी करून अगदीं लवकर मात्र सांगा."

**मालती**—" वसंतराव, या जन्मांत माझा कधीं विवाह व्हावयाचा असेल तर तो तुमच्याशींच होईल हें मी तुम्हाला ईश्वरास साक्ष ठेवून सांगतें."

वसंत आनंदानें बेहोष झाला. मालती बोलतांना चटकन् बोलून गेली पण मग तिची तिलाच लाज वाटूं लागली. आपल्या तोंडून हे शब्द बाहेर पडले तरी कसे याचें तिचें तिलाच आश्चर्य वाटूं लागलें. वसंताकडे मान वर करून पहाण्याचेंही तिला धैर्य होईना. ती चट्दिशीं आपल्या अभ्यासाच्या खोलींत निघून गेली. वसंतही हर्षातिशयानें कपडे करून आपल्या एका मित्राकडे जाण्यास बाहेर पडला.

आपल्या खोलींत गेल्यावर समोरच लावलेली लोकमान्यांची तसबीर मालतीच्या

दृष्टीस पडली आणि त्याबरोबर कृष्णाची मूर्ति तिच्या अंतःचक्षूंसमोर येऊन उभी राहिली. वास्तविक या वेळीं आपल्या मनात वसंतशिवाय कोणतीही व्यक्ति नसावी असें असतांना आपल्याला कृष्णा कां आठवला, असें तिला वाटूं लागलें. आपल्याला उगीच कांहीं तरी भास झाला अशी आपल्या मनाची समजूत करून घेऊन आपलें मन तिनें पुनः ताळ्यावर आणलें, आणि विवाहोत्तर आपलें आयुष्य वसंताच्या सहवासांत किती सुखानें जाईल, याचा गोड विचार ती करीत बसली

---

# प्रकरण ९ वें.

वसंत आणि मालती यांची आतां पुरी दिलजमाई झाली होती. आतां एकमेकांना एकमेकांविषयीं संकोच वाटेनासा झाला होता. हळु हळु कॉलेजच्या स्पोर्ट्स्‌चा दिवस उगवला. मालतीनें अतिशयच आग्रह केल्यामुळें वसंत तिच्या बरोबर खेळ बघायला जाण्यास तयार झाला. खेळांतील आपली कर्तबगारी वसंतरावांच्या नजरेस पडावी, ही तिची इच्छा होती हें निराळें सांगणें नकोच.

स्पोर्ट्स् सुरू झाले. अगदीं पुढील रांग प्रोफेसर्स व प्रिन्सिपॉल यांजकरितां राखून ठेवण्यांत आली होती. त्यांच्याच मागील रांगेत सर्व कॉंपिटिटर्स बसले होते. वसंत मालतीचा गेस्ट असल्यामुळें तोही त्याच रांगेंत तिच्या शेजारींच बसला. त्याच्याच शेजारीं केशवानें आपलें आसन ठोकलें. कृष्णाला खेळण्यांत फारसें interest वाटत नसल्यामुळें तो येणारच नव्हता, पण केशवानें केलेल्या आग्रहाच्या पायीं त्याला येणेंच भाग पडलें होतें. तो आपल्या इतर सहाध्यायांबरोबर दूर उभा राहून खेळाच्या गमती पहात होता. केशवाच्या डोक्यांत कांहीं कल्पना आली. त्यासरशीं तो आपल्या खुर्चीवरून उठला आणि कृष्णा उभा होता त्या ठिकाणीं जाऊन त्याला आपल्याबरोबर खुर्चीवर येऊन बसण्यास आग्रह करूं लागला. पण कृष्णा कांहीं केल्या कबूल होईना. "त्या जागा फक्त कॉंपिटिटर्स् आणि पाहुण्यांकरितां राखून ठेवलेल्या आहेत. भलत्याच गोष्टीचा कसला आग्रह करतोस?" कृष्णा म्हणाला.

"भलत्याच गोष्टी करावयाच्या असल्या म्हणजे भलत्याच गोष्टीचा आग्रह करावा लागतो. मेहेरबानी करून निदान आतां तरी माझा विरस करूं नकोस," केशव म्हणाला.

" तें कांहीं नाहीं. अयोग्य दिसणारी कोणतीही गोष्ट करण्यास मी साफ तयार नाहीं; आणि इतर कोणालाही-निदान तुला तरी—करूं पण देणार नाहीं. "

" बरें आहे मर्जी तुझी, " असें म्हणून केशव आपल्या जागीं परतला.

कृष्णाचे आपण मित्र आहों हें कसें तरी एकदां वसंताच्या नजरेला पडावें अशी त्याची फार इच्छा होती. मालतीनें हें त्याला सांगितलें असेल अशी त्याची कल्पना नव्हती; आणि म्हणूनच कांहीं तरी कारणाच्या निमित्तानें कृष्णाजवळ तो दोन शब्द बोलून आला. पण कृष्णा आणि केशव जेव्हां मालती आणि वसंत यांना फिरतांना दिसले होते तेव्हांच तिनें वसंताला आदल्या दिवशीं आपल्याशीं खेळण्याचा इन्कार करणारा तोच हा जोशी, असें सांगितलें होतें.

वसंत मालतीशीं कांहीं तरी बोलूं लागला. केशवाला खात्रीनें वाटलें कीं हा आपल्याबद्दलच कांहीं तरी बोलत असला पाहिजे. म्हणून तो त्याचें बोलणें अगदीं लक्ष देऊन ऐकूं लागला. पण त्यांच्या अगदीं निराळ्याच विषयासंबंधानें गोष्टी चालल्या असल्यानें त्याची अगदीं निराशा झाली.

टेनिसचा खेळ सुरू झाला. रिझल्ट् ठरल्याप्रमाणेंच झाला मेल् स्टूडन्ट्स्मध्ये केशव पहिला आला व लेडीस्टूडन्ट्स्मध्यें मालती पहिली आली. आपल्या वाग्दत्त वधूशीं खेळण्याचें नाकारून केशवानें तिचा अपमान केला होता, ही गोष्ट केशवाचें त्या खेळांतील विलक्षण कौशल्य पाहून वसंत साफ विसरून गेला. केशव आपला खेळ आटोपून विश्रांतीसाठीं आपल्या जागेवर येऊन बसल्यावर वसंतानें त्याची खूपच वाहवा केली. परंतु आपल्या जिवलग मित्राच्या काळजाला घरे पाडणाऱ्यांपैकीं वसंत हा एक आहे, ही केशवाच्या हृदयाला पूर्ण जाणीव असल्यामुळें आपल्याबद्दल त्यानें काढलेल्या प्रशंसोद्गारांबद्दल नुसते आभार मानण्याचेंही केशवाला भान राहिलें नाहीं. उलट वसंताकडे तो अगदीं तिरस्कारानें बघूं लागला.

**केशव**—" अहो मिस्टर—आपला आणि माझा कांहीं परिचय नाही. मी आपल्याला ओळखतों, हें मात्र खरें. कसें तें मात्र सांगण्याची माझी इच्छा नाहीं. आपला आणि मालतीताईचा चांगलाच परिचय आहे, हे मात्र मला नक्की माहीत आहे. तेव्हां माझ्या वतीनें आपण त्यांना दोन शब्द कळविण्याची तसदी घ्याल तर माझ्यावर आपले फार उपकार होणार आहेत. "

मालती आपल्या मैत्रिणीबरोबर बोलत असल्यामुळें तिचें या दोघांच्या बोलण्याकडे लक्षच नव्हतें.

**वसंत**—" हो-हो-अवश्य. तुमचा निरोप मी त्यांना जरूर कळवीन. "

**केशव**—" निरोप असा कांहीं विशेष नाहीं. पण मागील खपेप्रमाणें याही वेळीं मी त्यांच्याशीं खेळण्यास तयार नाहीं, एवढेंच फक्त त्यांना कळवा. "

**वसंत**—" मी नाहीं समजलों याचा अर्थ. "

**केशव**—" तुम्हाला याचा अर्थ कळण्यासाठीं मी बोललों असतों तर माझें म्हणणें मालतीताईंच्या कानावर घालण्यासाठीं मी तुम्हाला विनंतीच केली नसती ! त्यांना समजेल माझ्या बोलण्याचा अर्थ ! "

**वसंत**—" मालतीताईंनीं मला सर्व सांगितलें आहे. मला तुम्हाला इतकेंच सांगावयाचें आहे, कीं त्यांच्या संबंधानें तुमचा त्या कृष्णा परांजप्यानें कांहीं तरी निष्कारण गैरसमज करून दिला आहे. "

**केशव**—" गैरसमज असता तर निष्कारणच काय पण सकारण असता तरीही मला वाईट वाटलें असतें; व मी आपली त्यांच्या बाबतींत झालेली चूक अगदीं प्रांजळपणें कबूल करून त्यांची क्षमाही मागण्यास तयार झालों असतों. कारण मी गरीब असलों तरी sportsman आहें. पण हा गैरसमजच नसल्यामुळें सकारण कीं निष्कारण हा प्रश्नच शिल्लक रहात नाहीं. एका सुशील पण दुर्दैवानें गरिबीचा कलंक लागलेल्या एका तेजस्वी तरुणाचा निष्कारण अपमान करतांना जिच्या हलकट मनाला तिळमात्रही शरम वाटली नाहीं, अशा त्या अहंमन्य सोनेरी कीटकाशीं सामना देण्यास उभें राहून आपली स्वतःची किंमत कमी करून घेण्याइतका कांहीं मी अजागळ नाहीं. Sportsmanship चा लेशही जिच्या अंगीं वसत नाहीं अशा स्त्रीबरोबर सामना करणें हें कोणाही Sportsman ला कमीपणाचेंच वाटेल. मी इतका वेळ तुमच्याशीं बराच सभ्यतेनें वागत होतों याचें कारण तुमच्याविषयीं मला कांहीं तरी आदरबुद्धि आहे हें नसून तुमचा मला हा असा उपयोग करून घ्यावयाचा होता, हें होतें. मला तसें ढोंग केल्याबद्दल आतां फार वाईट वाटत आहे. "

**वसंत**—" तुमचा निष्कारण गैरसमज करून देण्यांत आलेला आहे, असें मघाशीं मी जें म्हटलें तें म्हणूनच. कारण आज इतक्या दिवसांच्या चिर परिचयानें मी तुम्हाला अगदीं खात्रीपूर्वक सांगूं शकतों कीं त्या गरिबांच्या अगदीं पक्क्या पक्षपाती आहेत, आणि त्यांच्या हातून निव्वळ गरीब किंवा पोटार्थी म्हणून कोणाचाही अपमान करण्याचें अश्लाघ्य वर्तन आजवर कधीं घडलेलें माझ्या स्मरणांत नाहीं आणि पुढें कधीं काळीं घडेल अशी शंका सुद्धां माझ्या मनाला शिवत नाहीं. "

**केशव**—" म्हणजे पूर्वी केलेल्या पापांत आपल्या खोटें बोलण्यानें भर घालण्याचा तुमचा विचार दिसतो ! जाऊं द्या. मला तरी तुमच्या पापपुण्याशीं काय करावयाचें आहे ? माझ्या मित्राच्या झालेल्या अपमानाच्या जाणीवेमुळें माझ्या हृदयांत धडकलेला संतापरूपी अंगार तुमच्या या अनृत वाणीच्या खारट पाण्यानें विझला जाणें शक्य नाहीं. "

एवढा वेळ मालती आपल्या मैत्रिणीशीं गोष्टी बोलण्यांत गुंतली असल्यामुळें तिला त्यांच्यांत काय बोलणें झालें तें अर्थातच कळलें नाहीं. सामन्याची वेळ झाल्याची सूचक घंटी वाजतांच मालती आपल्या जागीं जाऊन उभी राहिली. तेव्हां सर्व विद्यार्थीवर्गानें तिला आपल्या टाळ्यांच्या गजरानें उत्तेजन देण्याचा प्रयत्न केला. केशवाला जाऊन उभें रहावेंसें सुद्धां वाटेना. पण अगदीं नुसतें निघून जाण्यांतही कांहीं मौज नाहीं असें वाटून तो उगीच नांवाला आपल्या जागेवर जाऊन उभा राहिला. आतां अगदीं सुरुवात होणार तोंच केशव एकदम ओरडला, " मी सर्वांना स्पष्ट सांगूं इच्छितों कीं मी यांच्याबरोबर खेळण्यास तयार नाहीं. माझ्या या वर्तनाचा वाटेल त्यानें वाटेल तसा अर्थ करावा. मला त्याची बिलकुल पर्वा नाहीं, " असें म्हणून तो एकदम कृष्णा उभा होता तिकडे जाऊन त्याला आपल्याबरोबर खेंचून घेऊन गेला. सगळीकडे एकच गोंधळ उडून गेला. स्पोर्ट्स् पहाण्यास आलेले प्रोफेसर्सही केशवाच्या त्या वर्तणुकीनें चकित झाले. त्यांपैकीं एकानें केशवाला लगेच गांठून विचारलें, " What is the idea ? "

**के०**—" मला स्पष्टीकरण करण्याची इच्छा नाहीं. मी फक्त एवढेंच सांगतों कीं यांच्याबरोबर खेळण्यास मी तयार नाहीं "

आणखी एक शब्दही न बोलतां तो व कृष्णा तडक घरचा रस्ता चालूं लागले. वसंत त्यांच्याकडे नुसता पहातच राहिला. मालतीला या प्रकारामुळें फार वाईट वाटत असलें पाहिजे, हें त्याला ठाऊक होतें. त्यामुळें तर त्याला त्यांचा फारच संताप आला. बहुतेक परीक्षकांचा मालतीला championship चें बक्षीस देण्याचा ठाम विचार झाला; व त्यांनीं तसें जाहीरही केलें. पण मालतीनें असें तेजस्वी उत्तर दिलें कीं त्यामुळें ते सर्व विस्मयानें चकितच झाले. ती म्हणाली, " मला असलें निर्जीव बक्षीस पदरांत पाडून घेण्याची मुळींच इच्छा नाहीं. दुसरा सामनेवाला सामना न करितां पळाला तर ठरलेलें बक्षीस सामना देण्यास ठाकलेल्या गड्यासच मिळावयाचें असा जरी

सामन्याचा साधारण नियम असला तरी असलें बक्षीस स्वीकारण्यास मी तयार नाहीं. समोरच्या गड्याला चीत करून लाभलेल्या बक्षीसाचाच मी स्वीकार करीन," असें म्हणून कोणाशीं एक शब्दही न बोलतां ती निघून गेली. वसंताला हांक मारण्याची देखील तिला आठवण राहिली नाहीं. पण तिची मनःस्थिति लक्षांत घेऊन त्यानेंही त्याबद्दल आपल्याला कांहीं वाटूं दिलें नाहीं. लवकरच तो मालतीजवळ जाऊन पोहोंचला. त्यानें एक गाडी ठरविली व त्यांत बसल्यावर म्हणाला, "हा आज आणखी एक गरिबीचा मिस्किल नमुना पहाण्यास मिळाला. पाहिलेंतना मालतीताई? आतां तरी गरिबांविषयीं मी बोलत असतों तें खरें अशी तुमची खात्री झाली कीं नाहीं? आतां तरी त्या कृष्णाच्या अंगी तेजस्वितेपेक्षां नीचपणाचाच अंश अधिक आहे, याबद्दल तुमची खात्री पटली कीं नाही?"

मालतीच्या तोंडून शब्दच उमटेना. गाडींत बसल्यावर तोंपर्यंत आंवरून ठेवलेला दुःखाचा आवेग एकदम उसळून बाहेर पडला. कृष्णाच्याच चिथावणीनें केशवानें आपल्याशीं खेळण्याचें नाकारून आपला धिःकार केला, या वसंतरावांनीं तिच्या मनांत भरवून दिलेल्या विचारानें तिचें मानी मन अगदीं धुंद झालें. आपण कोणत्याही प्रकारचा अपराध केलेला नसतांना दुसऱ्यानें आपल्याला अपराधी ह्मणून दोषी ठरवावी हाच मुळीं त्याचा अपराध, आणि त्यांतूनही त्याबद्दल परस्पर तिऱ्हाईताकडून असा कांहीं तरी आचरटपणा करविणें ह्मणजे या मूर्खपणाला तर सीमाच नाहीं. कृष्णाच या सर्वांच्या मूळाशीं असला पाहिजे अशा खात्रीमुळें तिला त्याच्याविषयीं वाटत असलेला आदर पार मावळून गेला. त्याची नुसती आठवणही तिला दुःसह वाटूं लागली. मालतीनें आपलें रडें कसेंबसें आंवरलें.

"वसंतराव, तुमचें ह्मणणें मला अगदीं तंतोतंत पटूं लागलें आहे. इतके दिवस खरोखरच माझ्या विचारसरणींत चूक होत होती, अशीही माझी आतां खात्री झाली आहे. अपमानाची कल्पनाही सहन न होणें याला मी अजूनही जरी जळजळीत स्वाभिमान मानण्यास तयार असल्यें तरी त्या कल्पनेनें आपल्या अपमानास कारणीभूत वाटत असलेल्या माणसाचा प्रत्यक्ष अपमानानें आणि तोही भ्याडासारखा परस्पर दुसऱ्याकडून सूड उगविणें म्हणजे आपल्या मनाचा हलकेपणा प्रदर्शित करणें होय; आणि असला पाजीपणा कृष्णासारख्या सुशील समजला जाणाऱ्या तरुणाकडून होईल ही गोष्ट मी स्वप्नांतही खरी मानली नसती. पण स्वप्नांतही न दिसणाऱ्या गोष्टी कधीं

कधीं सत्यसृष्टींत अनुभविण्यास सांपडतात, याचा मला चांगलाच प्रत्यय आला. त्याच्या त्या दिवशींच्या वर्तनाचा कैवार घेण्यांत आजपर्यंत माझ्याकडून मोठीच चूक घडत होती "

**वसंत**--" इतक्या उशीरानें व असल्या घाणेरड्या आणि कटु अनुभवानंतर तरी माझें म्हणणें तुम्हाला पटूं लागलें हें तरी नशीबच म्हणावयाचें ! "

**मालती**--" मी कांही इतकी हटवादी किंवा दुराग्रही नाहीं. मला कोणतीही गोष्ट एकदां पूर्ण अनुभवांतीं पटल्यानंतर माझा त्यावद्दलचा कबुलीजबाब केव्हांही तयारच असतो. "

इकडे केशव आणि कृष्णा चालूं लागल्यावर केशवाला आढळून आलें की कृष्णाला झालेला प्रकार कांहीं आवडला नाहीं. तरी पण एकदां स्पष्ट काय तें समजलेलें बरें असें वाटून तो म्हणाला--

" कृष्णा, तुझ्या झालेल्या अपमानाचा मी पुरा बदला आज घेतला, याबद्दल तुला समाधान वाटत नाहीं का ? "

**कृ०**--"तूं इतका मूर्ख असशील अशी मला आजपर्यंत कल्पनाच नव्हती. ही असली रानटी कल्पना तुझ्या डोक्यांत आली तरी कशी याचेंच मला आश्चर्य वाटतें."

**के०**--" म्हणजे ? मी आपल्या बुद्धीनें मित्रकार्य केलें, हा तुला रानटीपणा वाटतो काय ? "

**कृ०**--" मित्रकार्याला जंगली समजण्याइतका मी अडाणी नाहीं. पण अशा रीतीनें वागून तूं कोणतें मित्रकार्य साधलेंस, हेंच मला समजत नाहीं. "

**के०**--" कां बरें ? तुला न समजण्याइतकें कठीण असें त्यांत काय आहे ? तुझा अपमान झाला त्या वेळीं निदान फारशी परकी मंडळी तरी तेथें हजर नव्हती. पण त्या अपमानाचा जेव्हां मी बदला घेतला तेव्हां इतक्या मंडळीच्या देखत तो घेतला असल्यामुळें तुझ्या झालेल्या हानीबद्दल मी अगदीं पुरेपूर सूड उगविला असें नाहीं का होत ? माझी तर अगदीं पक्की खात्री आहे कीं इतरांना जरी नाहीं तरी निदान मालतीबाईच्या डोक्याला तरी मी त्यांच्याशीं खेळण्याचें कां नाकारलें हें पुरें समजलें असेल ! बस्. मला जें साधावयाचें होतें तें साधलें. माझा हेतु माझ्या इच्छेप्रमाणें सफल झाला. "

कृ०—" अशानें आपला हेतु सफल झाला असें तूं समजतोस म्हणूनच मी तुला जंगली म्हणतों. यांत मित्रकार्य तर तुला साधतां आलें नाहींच, पण उलट मित्रकार्याची हानि मात्र तुझ्या हातून घडली. "

के०—" आपण दुसऱ्याकरितां कांहीं तरी करावें आणि त्याची त्याला जाणीवही असूं नये हें मात्र खरें दुर्दैव ! "

कृ०—" खरोखरच तूं कांहीं तरी केलेंस. मात्र अगदीं निराळ्या अर्थानें ! तूं मला आपला जिवाचा सवंगडी मानतोस आणि तुझी माझ्याशीं आजपर्यंतची वर्तणूकही तशीच होती यांत शंकाच नाहीं. पण आज माझ्या शत्रूंनाही न शोभण्याजोगी तूं माझी हानि केली आहेस, याची तुला कल्पना नाहीं. "

के०—" मी तुझ्याकरितां मालतीबाईचा अपमान केला, यांत तुझी हानि कोणती झाली हेंच मला समजत नाहीं. "

कृ०—" तूं त्यांचा अपमान केलास त्याच्या मूळाशीं मीच असलों पाहिजे, असें त्यांना वाटणार नाहीं काय ? "

कृष्णा इतका रागावला होता तरी सुद्धां केशवाच्या नेहेमींच्या पोरकट स्वभावानें अजून त्याला सोडलें नव्हतें.

के०—" मग यांत काय खोटें आहे ? आणि खरें तेंच त्यांना वाटलें तर त्यांत त्यांची तरी काय चूक आहे किंवा तुझी तरी कसली हानि आली आहे ? "

कृ०—" काय ? आजच्या तुझ्या जंगलीपणाच्या मूळाशीं मी होतों ? म्हणजे ही खोटें बोलण्याची विद्या तूं कधीं संपादन केलीस ? "

के०—" या केशवाच्या—या तुझ्या जिगरजान दोस्ताच्या मुखांतून आजपर्यंत कधीं अनृत वाणी बाहेर पडली नाहीं आणि पुढेंही कधीं पडणार नाहीं. "

कृ०—" भूतकालासंबंधीं मला माहीत आहे. भविष्यकाळासंबंधीं तूं हमी घेत आहेस. पण चालू असलेल्या वर्तमानकाळाचे बिचाऱ्याचे धिंडवडे निघत आहेत, त्याची वाट काय ? "

के०—" व्हावयाच्या तशा व्यवस्थित गोष्टी घडून येत असतां त्यांचे धिंडवडे निघत आहेत असें मानणें व म्हणणें म्हणजे मूढपणाची कमाल आहे. "

कृ०—" पण वस्तुस्थितीचा जाणून बुजून विपर्यास करणें म्हणजे खट्याळपणाची कमाल आहे. "

के०—" बरें. तूं तरी परमेश्वरसाक्ष सांग बरें कीं आजच्या माझ्या कृत्याच्या मूळाशीं तूं नव्हतास ! "

कृ०—" सांगतों–अगदीं परमेश्वरसाक्ष सांगतों कीं आजच्या तुझ्या मूर्ख-पणाच्या कृतीशीं माझा कांहींही संबंध नाहीं. मी तुला असें करावयास कधींही सांगितलें नाहीं. इतकेंच नव्हे तर तूं असें करशील असेंही मला कधीं वाटलें नाहीं. "

के०–" मीही परमेश्वरास साक्ष ठेवून सांगतों कीं आजच्या माझ्या वर्तनाला मूळ कारण तूंच आहेस. तूं मला असें करायला सांगितलेंस असें माझें तरी कुठें म्हणणें आहे ? पण मूळांत तुझा मानभंग झाला आणि त्याचा सूड मी मालतीबाईवर उगवला. तेव्हां मी केलेल्या सर्व प्रकाराच्या मूळाशी तूंच आहेस, हें नाहीं का सिद्ध होत ? "

कृ०–" आतां केशव, हे पोरखेळ हळुंहळुं सोडून दिले पाहिजेत. माझ्या अप-मानाचा बदला घेण्याकरितां मीच हा आडवातिडवा आणि अडाणी वाममार्ग पत्करला, असेंच त्यांना आतां वाटणार नाहीं काय ? त्यांच्या दृष्टीनें तुझ्या या वागणुकीमुळे माझ्या पदरीं नादानपणा पडणार, त्याची वाट काय ? हें तूं आपलें स्वतःचेंच पोरकट डोकें चालविलेंस, त्यांत माझा काही संबंध नाहीं हे त्यांना कसें समजणार ? तुझ्या मित्राच्या वांट्याला निष्कारण मुर्दाडपणा येणार याचें तुझ्या मनाला कांहींच वाटत नाहीं का ? मागल्या खेपेला तूं मला आपला प्रताप सांगितलास तेव्हांही मी तुला सांगितलें नव्हतें का कीं मला तुझें हें करणे मुळींच पसंत नाहीं म्हणून ? "

केशवालाही कृष्णाचें म्हणणें आतां पटूं लागलें. आपल्या पोरकटपणाच्या थिल्लर लहरीच्या भरांत, एवढी साधी गोष्ट आपल्या मेंदूत कशी आली नाहीं याचें त्याचे त्यालाच आश्चर्य वाटूं लागलें, फक्त त्याच्या स्वतः विषयींच त्यांचें मत वाईट झालें असतें तर केशवानें त्याची फारशी फिकीर केली नसती. पण आपल्या अविचारी वागण्यामुळे आपला जिवलग स्नेही दुसऱ्यांच्या दृष्टीनें नापाक ठरावा, याचें मात्र त्याला जिवापाड दुःख वाटूं लागलें.

के०—" बरें, कृष्णा, अविचारानें माझ्या हातून भलताच मूर्खपणा झाला असें आतां मलाही वाटूं लागलें. माझी आजपर्यंत तूं हुषारीबद्दल उगीच तारीफ करीत होतास, असें आतां मला वाटूं लागलें आहे. माझ्या हातून घडलेल्या या तुझ्या हानी बद्दल मी तुझी प्रांजलपणें क्षमा मागतों. "

कृ०–" हें काय बरें केशव ? तुझ्या हातून माझी हानि घडली–हानि करण्याचा

कांहीं तुझा उद्देश नव्हता. तूं आपल्या मतानें मित्रकार्यच केलेंस, पण त्याचा परिणाम भलताच झाला; आणि तुला असें वाटतें काय कीं तुझ्या हातून माझें नुकसान झालें म्हणून तुझ्यावरील माझें प्रेम कमी होईल ? खऱ्या निरपेक्ष प्रेमाची हीच तर मुख्य खुबी आहे कीं आपल्या प्रेमी माणसानें आपलें एखादे वेळीं नुकसान केलें–तें त्यानें जाणून बुजून केलेलें असो किंवा त्याच्याकडून तें न कळत घडलेलें असो–तर त्याबद्दल आपल्याला क्षणमात्र राग आला तरी त्याची चूक त्याला नीट समजावून देण्यापर्यंतच त्या रागाची मजल जाते; या पुढची पायरी तो राग कधीं गांठणारच नाहीं. ज्याच्यावर आपलें प्रेम आहे असें आपण जगाला सांगत असतों किंवा भासवीत असतों तें पुष्कळ वेळा ढोंग असतें त्याच्याकडून आपला फायदा होत आहे निदान नुकसान तरी कांहीं होत नाहीं तोंपर्यंतच अशा प्रेमाचें अस्तित्व असतें. त्याचा आपल्या कोणत्याही कार्यांत अडथळा होऊं लागला किंवा त्याचें एखादें करणें आपली हानि करणारें असलें तर वरचा प्रेमाचा दिखाऊ पडदा फाटून आंतील हालाहल आपोआप बाहेर पडतें. तुझें माझ्यावर जसें हेतुशून्य प्रेम आहे तसेंच माझेंही तुझ्यावर निःस्वार्थ प्रेम आहे. झाल्या गोष्टीबद्दल मला तुझा राग आला असला तरी क्षणमात्रच. आतां झाल्या प्रकाराला एकच सरळ उपाय आहे. तो हा कीं—"

के०—"मी स्वतः त्यांना जाऊन भेटावयाचें आणि झालेल्या सर्व हकीगतीचा खुला खुला उलगडा करावयाचा ?"

कृ०—" अंहं ! असें करून नाहीं चालणार. त्या कदाचित् तुझ्याशीं बोलण्याचेंच नाकारतील. तूं त्यांना खुलासेवार पत्र लिहून सर्व उलगडा कर. मात्र तें तूं अशा व्यवस्थित रीतीनें लिहिलें पाहिजेस कीं त्यामुळें माझ्याबद्दलचा त्यांचा संशय ज्याप्रमाणें नाहींसा झाला पाहिजे, त्याप्रमाणेंच तुझ्याबद्दलही त्यांचा झालेला वाईट ग्रह नाहींसा झाला पाहिजे. तुझ्याबद्दल त्यांचें वाईट मत होणें हें माझ्या स्वतःबद्दल त्यांचें मत वाईट होण्याइतकेंच मला कष्टदायक होईल, हें तुला माहीतच आहे."

के०—" माझी त्याबद्दल अगदीं पुरी खात्री आहे. तुला आतां झाल्या गोष्टी-बद्दल मुळींच काळजी नको. पत्र लिहिल्यावर त्यांना पाठविण्यापूर्वी तुला तें वाचून दाखवीन ह्मणजे झालें."

कृ०—" ठीक आहे."

दोघेही आपापल्या घरीं निघून गेले.

# प्रकरण १० वें.

अनिष्ट अनुभव आल्यामुळें मालतीचें मन चलबिचल होऊं लागलें. आपण हिरा म्हणून समजत असलेली व्यक्ति अखेर गारगोटीच ठरावी, याचेंही तिला अत्यंत वाईट वाटूं लागलें. झाल्या गेल्या गोष्टीबद्दल आतां उगीच डोक्याला त्रास करून घेण्यांत कांहीं अर्थ नाहीं, असा विचार करून जणूं काय कांहींच घडलें नाहीं असें समजून चालावयाचें असा तिनें निश्चय केला.

सुटीच्या दिवशीं साधारण तीनचारच्या सुमारास लीलाताई आपल्या मैत्रिणीकडे येतच असे. मालतीच्या मनात लीलाताईला न सांगतां अशी कोणतीच गोष्ट रहात नसे. यामुळें तिला आजपर्यंत घडलेल्या सर्व गोष्टी समजलेल्या होत्याच. मालतीच्या विचारसरणीला लीलाताई नेहमीं उत्तेजन देत असे. वसंताची मतें वरीच अनुदार व चुकीचीं आहेत असें तिला वाटत असे. ती आली त्या वेळीं मालती एकटीच आपल्या मनाशी विचार करीत बसली होती. लीलाताई दिसल्याबरोबर तिला अंमळ मोकळेंसें वाटूं लागलें. आपल्या डोक्यांत चाललेली खळबळ कुठें तरी उघड करून दाखविली म्हणजे सहाजिकच आपल्या डोक्याला थोडासा आराम मिळाल्याचें समाधान लाभतें. मालतीला आपली मनःस्थिति उघडी करून दाखविण्याला लीलाताई एवढें एकच स्थान होतें. तेव्हां ती आल्याबरोबर तिला समाधान वाटल्याखेरीज कसें राहील ?

**लीला०**--" कां ? अगदीं स्वस्थ मनानें विचार करीत बसली आहेस ? आज वसंतराव गोष्टी बोलयला मोकळे नाहींत वाटतें ? तेंही एका अर्थी बरेंच झालें म्हणा. तुला एकटीला शांतपणें विचार करण्याला फुरसत मिळाली आणि मलाही तुझ्याशीं बोलण्याला एकान्त मिळाला. आज तूं थोडीशी phylosophic mood मध्यें दिसत आहेस. माझी विचारसरणी तुला आतां पटूं लागणार अशी आशा आतांच्या तुझ्या मुद्रेवरून मला वाटूं लागली आहे. "

**मालती०**--"अग पण तुझ्या आणि माझ्या विचारसरणींत भिन्नता आहेच कुठें ? "

**लीला०**--" भिन्नता नाहीं म्हटल्यानें कांहीं ती नाहींशी होत नाहीं. कांहीं दिवसांपूर्वीं ही गोष्ट खरी होती. तुझीं स्वतःचीं मतें व माझीं मतें यांत मुळींच फरक नाहीं

हें मला माहीत आहे. पण तुझीं सध्यां जीं मतें बनलेलीं आहेत किंवा बनविण्यांत आलेलीं आहेत तीं मात्र माझ्या मतांपासून किती तरी भिन्न आहेत. पण यांत मी तुला दोष देत नाहीं. ज्यांनीं तुझीं मतें अशीं बनविलीं तेच याला जबाबदार आहेत. बरं, पण आज इतका विचार तरी कसला चालला होता ?"

**मालती**--"ज्या माणसासंबंधीं आपल्या मनांत आदरबुद्धि वसत असते, त्याचीच एखादी नीचपणाची वागणूक आपल्या नजरेस आल्यावर आपल्या डोक्याला त्रास होणारच. जगांत आतां चांगलें तरी कोणाला म्हणावें हेंच मला समजत नाहींसें झालें आहे."

**लीला०**--"म्हणजे ? ही काय नवी भानगड आहे ? वसंतरावांसंबंधीं बोलत आहेस कीं काय तूं हें ?"

**मालती**—"छे–छे–त्यांच्या संबंधानें मी कशी बोलेन असें ?"

**लीला०**—"कां बरें ? जगांत चांगलें तरी कोणाला म्हणावें हें सुद्धां न समजण्याइतकें जिचें डोकें भडकलेलें आहे, तिला कोणासंबंधानेही कांहींही बोलणें काय कठीण आहे ?"

**मालती**--"उगीच कांहीं तरी बोलत बसण्यापेक्षां एकदमच तुला झालेली हकीकत सागून टाकतें म्हणजे झालें ती गोष्ट माझ्या डोक्यांतून काढून टाकण्याचा मी किती तरी प्रयत्न केला पण तें कांहीं जमत नाहीं. यामुळें माझें डोकें अगदी बधिर होण्याची पाळी आली आहे. त्या कृष्णरावांच्या हातून माझ्या बाबतींत असा अन्याय होईल असें यापूर्वीं मला कोणी सांगितलें तर मी त्याची मूर्खांतच गणना केली असती. कारण मागें तुला सांगितलें त्यावेळीं वसंतरावांच्या सांगण्यामुळेंच मी त्यांना वरकरणी त्यांचें बोलणें मला पटत होतेसें दाखविलें. पण कृष्णरावांबद्दल खरें सांगायचें म्हणजे मला वाटत असलेला आदर कालपर्यंत कायम होता."

**लीला०**—"म्हणजे ? कृष्णराव परांजप्यांनीं तुझ्या बाबतींत कांहीं अन्याय केला ? तुमच्या हातून घडलेल्या त्यांच्या अपमानानें पिसाळून जाऊन त्यांनीं तुमचें घरच वर्ज्य केलें असतांना तुझ्या बाबतींत अन्याय करण्याची संधि तरी त्यांना कुठें आणि कशी मिळाली ? मागें झालेली गोष्ट तूं मला सांगितल्यावर मी तुला सांगितलेंच होतें कीं यांत त्यांचें कांहीं अंग असणें शक्य नाहीं व तें तुलाही पटलें होतें. मग आतां ही आणखी नवी भानगड काय आहे ?"

**मालती**—" अग पण मला पुरेतेपणीं बोलूं तर देशील ? "

असें म्हणून आदल्या दिवशी झालेली इत्थंभूत हकीकत मालतीनें तिला सांगून टाकली. तिलाही पहिल्या झटक्याला यात कृष्णाच सूत्रधार असला पाहिजे असा संशय आला. पण तो एकच क्षण-अगदीं एक क्षणभरच टिकला.

**लीला०**—" त्या दिवशींप्रमाणें आजही तुझी कांहीं तरी गैरसमजूत झालेली आहे. सर्व गोष्ट ऐकल्यावर मला देखील त्यांचा क्षणमात्र संताप आला होता. पण पहिला झटका ओसरल्याबरोबर तूं केलेली कल्पना ही मूळ तुझ्या डोक्यांतून निघालेली नसून कोण्या तरी कावेबाज माणसानें ती तुझ्या डोक्यांत भरवून दिली असली पाहिजे अशी मला शंका वाटूं लागली आणि ती बहुतकरून खरीही असली पाहिजे. खरं सांग बरें. वसंतरावांनींच ती तुझ्या डोक्यांत भरवून दिली कीं नाहीं ?"

**मालती**—" मुळींच नाहीं. झालेली गोष्ट इतकी उघड होती कीं तीवरून कृष्णराव हे कोणत्या मनोवृत्तीचे माणूस आहेत याचा ठाव समजण्याला कांहीं दुसऱ्यांनीं डोकें भारण्याचीच आवश्यकता नाहीं. "

**लीला०**—" नाहीं कशी ? खात्रीनें आहे. अगदीं कालच त्यांनीं तुला तसें सांगितलें नसेल कदाचित् पण एकसारखें तुझ्या कानींकपाळीं ओरडून ओरडून त्यांनी कृष्णरावांबद्दल तुझ्या मनांत कायमचा तिरस्कार उत्पन्न केला आहे. दारू भरून तयार असल्यावर वर फक्त ठिणगी पडण्याचाच स्फोट होण्यास अवकाश असतो. त्यांच्याविषयी वाटेल तें सांगून सांगून वसंतरावांनीं त्यांच्याबद्दलची तुझी आदरबुद्धि हळुंहळुं नष्ट करून टाकली. यांत त्यांना आपला काय फायदा झाला वाटतें कोणाला ठाऊक ? तसें नसतें तर ज्यांनीं तुझा वास्तविक कांहींही अपराध नसतां तुझा प्रत्यक्ष अपमान केला तरी तुझा त्यांच्यावर राग न होतां उलट त्यांच्या अंगीं वसत असलेल्या तेजस्वी अभिमानाबद्दल तुझा त्यांच्याविषयीं वाटत असलेला आदर द्विगुणित झाला, त्यांच्याच करितां त्यांच्या एका मित्रानें तुझा अपमान केला असतां त्यांच्यासंबंधानें तुझ्या तोंडून असले अनुदार उद्गार बाहेर पडणें सहसा शक्य नव्हतें. "

**मालती**—" असें कसें म्हणतेस ? त्यांनीं प्रत्यक्ष माझा-माझ्या तोंडावर धिःकार केला यांत त्यांची प्रखर तेजस्विताच दिसून आली व माझा त्यांच्याविषयींचा आदर दुणावला हें योग्यच झालें. पण परक्या माणसाकडून आपल्या अपमानाबद्दल सूड घेवविणें म्हणजे हें आडून गोळी मारण्यासारखें करून आपल्या मनाचा नीचपणा व भेकडपणाच व्यक्त करणें नव्हे का ? "

**लीला०**--" इथेंच तुझी चूक होते आहे. अग, जो मनुष्य तुझ्या तोंडावर तुला हवें तें बोलावयास कचरत नाहीं, त्याला तुला अशी आडून गोळी मारण्याचें प्रयोजनच काय ? दुसऱ्यांनीं तुझ्या डोक्यांत ही कल्पना भरवून दिली नसती तर ती तुझ्या मनाला शिवलीही नसती. "

**मालती**--" दुसऱ्या कोणाकडून तरी माझ्या कल्पनेला दुजोरा मिळाला इतकेंच. बाकी ही कल्पना मूळ माझीच. "

**लीला०**--" शक्य नाहीं. तुझा कांहीं आज मला नवीन परिचय नाहीं. इतके दिवस मी तुझ्या संगतींत काढले ते तुझ्या अंतःकरणाची पुरी पारख केल्यावांचूनच काढले, असें तूं समजूं नकोस. मालती, तुझें अंतःकरण मूळचें अगदीं स्फटिकासारखें स्वच्छ आहे. पण त्यांत आपल्या अंतःकरणांतील घाण ओतून कोणी तरी तें मलिन करण्याचा प्रयत्न करीत आहे. पण मी हें खात्रीनें सांगतें कीं मला तूं तुझ्याशीं मोकळेपणानें बोलूं देत आहेस व माझ्यापासून तूं कोणतीही गोष्ट लपवून ठेवीत नाहींस, तोंपर्यंत मी तुझ्या विचारांना अधोमार्गानें केव्हांही जाऊं देणार नाहीं. उलट तुझ्या मनांत भरविण्यात येत असलेले कुजके विचार मी साफ दूर करीन आणि ते भरवून देणारे काय लायकीचे आहेत तेंही तुला पुरतेपणीं समजावून देईन."

**मालती**—" माझ्या कल्पनेला दुजोरा कोणी दिला याची तुला कल्पना असती तर असले शब्द तुझ्या मुखावाटे बाहेर पडले नसते ! "

**लीला०**—" तें माणूस कोण हें पुरतेपणीं ओळखूनच मी बोलल्यें व बोलत आहे. तुला माहीतच आहे कीं तोंडदेखलें बोलण्याची मला संवय नाहीं व तें मला कधीं साधणेंही शक्य नाहीं. ज्यांच्यासंबंधानें मी बोलल्यें त्यांची तूं वाग्दत्त वधू असल्यामुळें माझ्या बोलण्याचा तुला राग आला असेल, हेंही मी जाणून आहें. पण त्याला माझा नाइलाज आहे. कोणाविषयींही माझ्या बुद्धीला सरळ दिसत असणारी गोष्ट कोणासमोरही बोलण्यास मला कोणाचीही कसलीच भीति वाटत नाहीं. तुझी व त्यांची आतां जन्माची गांठ पडावयाची असल्यामुळें, पुढें आपल्याला त्रास पडूं नये म्हणून आतांपासूनच आपलीं मतें व आपले विचार तुझ्या गळीं हळुहळु उतरविण्याचा त्यांनीं उद्योग आरंभिला आहे. मला वाईट इतकेंच वाटतें कीं यांत त्यांनीं आपलें स्वतःचें कल्याण बघितलें, पण अशानें तुझा मात्र त्यांनीं नाश केला. "

**मालती**--" काय म्हणतेस हें तूं लीलाताई ? वसंतराव माझा नाश करण्याचा प्रयत्न करतील तरी का ? "

**लीला०**--" तुला त्यांच्या विषयीं वाटत असलेल्या प्रेमाभासामुळें-"

**मालती**--" प्रेमाभासामुळें ? म्हणजे काय ? "

**लीला०**--" होय-प्रेमाभासामुळें. तुझें त्यांच्यावर प्रेम नसून त्यांच्यावर आपले प्रेम असल्याचा तुला निव्वळ भास होत आहे. अंतःकरणाच्या उदारपणांत व तेजस्वितेंत तुम्हा दोघांत जमीन अस्मानाची तफावत आहे. असें असतां प्रेमासारख्या दैवी गुणानें तीं निगडित होण्याची आशा कशाला पाहिजे ? तुझ्याकरितां पाहिजे तर प्रेमाकरितां असें म्हणतें मी. पण त्यांत अर्थ काय ? त्या प्रेमाभासामुळें त्यांच्याविरुद्ध मी कांहींही बोलल्यें तरी तें तुला खरें वाटणार नाहीं. पण तुला तें खरें वाटलें नाहीं तरी मी काय बोलायचें तें बोलून टाकणारच. माणसाच्या बुद्धीच्या स्थिरतेची अशा बिकट प्रसंगींच परीक्षा लागत असते. म्हणजे पहा आतां कशी ती. कृष्णरावांबद्दल तुला पहिल्यापासून आदर वाटत होता. तो त्यांच्या तेजस्वी वृत्तीमुळें अधिकच झाला; आणि आतां तुला ज्या माणसावर आपलें प्रेम असल्याचा भास होत आहे तो तुला त्यांच्याबद्दल उलट रीतीनें सांगूं लागतांच त्या प्रणयी माणसाच्या सांगण्यावर तुझा विश्वास बसला व कृष्णरावांबद्दल तुला वाटत असलेल्या आदराचा पार लोप झाला. वसंतरावांवर तुझें प्रेम आहे हें खरें मानण्यास मी तयार नाहीं. तुझें प्रेम खरोखर कोणावर आहे व तुझ्या प्रेमाला कोण खरोखर पात्र आहे हें मला पुरतेपणीं माहीत असून त्याची आतांच वाच्यता करण्यास माझें मन मला सांगत नाहीं. परप्रत्ययनेयबुद्धीचा असा दोष तुझ्या माथीं मारल्यावांचून मला गत्यंतर नाहीं. तुझ्या शुद्ध व निर्विकार मनोभूमींत आपल्या मनांत वसत असलेल्या कुविचाराचें बी पेरून वसंतरावांनीं तुझें अतोनात नुकसान केले आहे, असेंही म्हणणे मला भाग आहे. "

**मालती**--" लीलाताई, तूं म्हणतेस तसें झालें आहे खरें थोडेसें. मी या गोष्टीचा अगदीं निर्विकारपणें विचार केला असता तर माझी अशी चूक झाली नसती. वसंतरावांनीं माझें नुकसान केलें असें तूं म्हणतेस हें मात्र मला तितकेसें बरें वाटत नाही."

**लीला०**--" तें मी तुला बरें वाटावें म्हणून बोललेंच नव्हतें. खरें काय तें तुला समजावें म्हणून बोललें होतें. आतां तुला कदाचित् तें खरें वाटणारही नाहीं. पण एक दिवस खात्रीनें असा उगवेल कीं त्या दिवशीं तुला माझें म्हणणेंच खरें वाटूं लागल्याशिवाय रहाणार नाहीं. आतां एवढें खरें कीं त्यांनीं तुला जें जें कांहीं

सांगितलें तें तें तुला माणसाची पारख बरोबर करतां यावी, अशा सद्‌बुद्धीनेंच सांगि-तलें असेल. पण त्याचा परिणाम कसा व काय झाला याचा तूं प्रत्यक्षच अनुभव घेत आहेस. कृष्णरावांचा व तुझा कधींही संबंध येण्यासारखा नसला तरी त्यांच्याविषयीं तुझें मन निष्कारण कलुषित होणें ही चांगली गोष्ट आहे कीं काय ? माझी तर पक्की खात्री आहे कीं वसंतरावांनीं त्यांच्याविषयीं तुझ्या कानांत गरळ ओकलें असलें तरी त्यांच्याविषयीं किंवा तुझ्याविषयीं निष्कारण गैरसमज उत्पन्न करणारा एक शब्दही कृष्णानें उच्चारला नसेल. तो मनुष्यच निराळा. असल्या नासक्या कल्पना त्याच्या शुद्ध बुद्धीला कधीं शिवणारच नाहींत. असल्या कल्पनांना प्रसवणारें अंतःकरण त्याच जातीच्या माणसाचें असावयाचें. मालती, तूं माझी जिवाची मैत्रीण म्हणून मी तुला सांगतें. तें कदाचित् सध्यां तुला कटु वाटलें तरी परिणामीं तेंच तुला हितावह होईल. वसंतरावांच्या सांगण्यावरून तूं कोणाविषयींही आपला वाईट ग्रह करून घेऊं नकोस. त्यांच्या मताप्रमाणें ते तुझ्या कल्याणाकरितां म्हणून तुला तसल्या प्रकारची शिकवण देत असले तरी तूं आपल्या बुद्धीला त्याशिक्ष-णाचा मोह पडूं देऊं नकोस. खरा प्रकार माझ्या बुद्धीला वाटतो तो असा. तूं व मी ज्याप्रमाणें जिवलग मैत्रिणी आहोंत व आपल्यामध्यें गुप्त असें कांहीं नाहीं तसेंच कृष्णराव आणि जोशी यांचें असलें पाहिजे. कृष्णानें तुझ्या घरीं घडलेली हकीकत त्याला सांगितली, तो अंमळ थिल्लर प्रकृतीचा आहे, हें आपला त्याच्याशीं कांहीं परि-चय नसतांही आपण सांगूं शकूं. आपल्या मित्राचा अपमान करणारी स्त्री या बुद्धीनें तो तुझ्याकडे पहात असला पाहिजे. आपल्या मित्राच्या अपमानाचा सूड तुझा अपमान करून उगवावा, असें त्याच्या पोरकट बुद्धीला वाटलें आणि म्हणून इतक्या लोकांच्या देखत तुझ्याशीं खेळण्याचा इन्कार करून त्यानें तुझा अपमान केला. म्हणजे त्यानें दखील हें मित्रकार्य म्हणून केलें. पण त्याचा परिणाम मात्र तुझें मन कृष्णरावांविषयीं कलुषित होण्यांत झाला. माझी पक्की खात्री आहे कीं कृष्णरावांनीं त्याची त्याच्या या कृत्याबद्दल अतिशय निर्भर्त्सना केली असेल. बरें झालें कीं तूं मला हें आतांच सांगि-तलेंस. तुझ्याकडून कृष्णरावांविषयींची आपली चुकीची समजूत करून घेण्याची चूक घडली यांत कांहीं विशेष आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. आतां यापुढें तरी असा निश्चय कर कीं कोणी कोणाविषयीं—विशेषतः ज्याच्याविषयीं आपल्याला आदर वाटत असतो, त्याच्याविषयीं—कांहीं सांगितलें तर त्याचा पुरता विचार करून मग काय तें ठरीव. अमुक मनुष्य सांगतो ह्मणून तें तसेंच असलें पाहिजे असें केव्हांही धरून चालूं

नकोस. हलक्या कानाचीं माणसें व्यवहारांत वारंवार फसत असतात. वरं, चल आतां चहा घेऊन आपण बाहेरच पडूं या. किती तरी दिवसांत मी तुझ्याबरोबर हिलवर गेले नाहीं. चल, ऊठ."

चहा घेऊन त्या दोघीजणी हिलवर गेल्या. वसंत व मालती ज्या बांकावर बसलीं होतीं तें कर्मधर्मसंयोगानें रिकामेंच होतें. मालतीच्या तें बांक चांगलेंच लक्षांत होतें. त्यावर बसण्याचा मोह तिला आंवरेना. बसल्यावर मालतीनें, " लीलाताई, हेंच तें बांक, " एवढेंच म्हटलें. लीलाताईचा चेहेरा अगदीं गंभीर दिसत होता.

**मालती**--" लीलाताई, माझ्या आयुष्यांतील अत्यंत सुखकर असा प्रसंग आठवून तो मी तुला सांगितला, त्यांत तुला आनंद न वाटतां तूं उलट अधिकच उदास दिसूं लागलीस ! "

**लीला**--" मालती, क्षमा कर मला. मी आज तुला पुष्कळ दिवस सांगेन सांगेन म्हणत होतें, पण आज तुला सांगितल्याशिवाय मला रहावतच नाहीं. वसंतराव तुझ्या प्रेमाला काडीमात्रही पात्र नाहीत असें माझें स्पष्ट मत आहे. व्यक्तिगत असे त्यांच्या अंगी अनेक सद्गुण आहेत ही गोष्ट मला नाकबूल नाहीं. पण सध्यांच्या आपल्या देशाच्या बिकट परिस्थितीचा विचार करतां प्रत्येक व्यक्ति आपल्या राष्ट्राकरितां किंवा समाजाकरितां किती स्वार्थत्याग करील याचा विचार अवश्य केला पाहिजे. स्वतंत्र देशांतील तरुणींना हा विचार करणें तित- केंसें अगत्याचें नसतें, असें एकवेळ म्हटलें तर चालेल. पण आपल्या देशासारख्या पारतंत्र्याचा कटु अनुभव घेत असलेल्या देशांतील तरुणींनी ज्या तरुणाला आपण माळ घालणार तो आपल्या देशाच्या स्वातंत्र्याप्रीत्यर्थ काय करण्यास तयार आहे याची नीट पारख केल्याशिवाय तसें करण्यास उद्युक्त होऊं नये. वसंतरावांच्या आज- वरच्या वर्तणुकीवरून समाजाकरितां किंवा राष्ट्राकरितां ते कांहीं करतील असें मला वाटत नाहीं. निव्वळ आपली व आपल्या पत्नीची हौस पुरविणारा तरुण आपल्या सारख्या देशहितेच्छु तरुणींना काय कामाचा ? तेव्हां आपल्या समाजाला व राष्ट्राला वसंतरावांचा कितपत उपयोग होईल याचा पुरता विचार केल्याशिवाय त्यांच्या गळ्यांत माळ घालावयास तूं तयार होणें हें माझ्या दृष्टीनें अनिष्ट आहे. "

**मालती**--" होय. तूं म्हणतेस तसेंच मलाही वाटतें. पण मला नाहीं वाटत

कीं राष्ट्राच्या इभ्रतीसाठीं ते आपल्या स्वार्थावर पाणी सोडण्यास तयार होणार नाहींत असें. "

**लीला**--" माझी कल्पना खोटी ठरून तुला वाटतें तें खरें ठरलें तर त्यांत मला आनंदच होईल. पण या बाबतीत नुसतें आपल्याला काय वाटतें यावर विसंबून रहाणें बरें नाहीं असें मला वाटतें. याउपर तुझी मर्जी. बाकी त्यांच्याबद्दल तुला इतकी खात्री वाटत आहे, यावरून तुझें त्यांच्यावर खरोखरच निरतिशय प्रेम आहे, असें मलाही वाटूं लागलें आहे. "

आणखी थोड्याच वेळानें त्या घरीं जाण्यास निघाल्या.

# प्रकरण ११ वें.



घरीं परत जातांना मालतीनें लीलाताईला आपल्या घरीं जेवण्यास थांबण्याचा आग्रह धरिला. तीही कबूल झाली. मालतीनें आपल्या एका नोकराकरवीं लीलाताईच्या घरीं निरोप पोहोंचता केला.

मालती घरीं येते तों तिच्या नांवाचें एक पोस्टाचें पाकीट तिच्या मेजावर पडलेलें होतें. येऊन जाऊन तिला पत्रें येत असत म्हणजे व्हेकेशनमध्यें तिच्या मैत्रिणींची. तेव्हां यावेळीं आपल्याला पत्र कोणी व कशासाठीं पाठविलें असावें याची तिला कांहींच कल्पना होईना. कांहीं हलकट लोक तरुण मुलींची कुचेष्टा करण्याकरितां त्यांना कांहीं तरी फाजिलपणाचीं पत्रें लिहून आपल्या पाजी मनाचें समाधान करून घेत असतात, हें तिला माहीत होतें. म्हणून ती तें पाकीट फोडायलाच तयार होईना. पण, " वाचून तर पहा. तसेंच कांहीं असलें तर तें तुला फाडून नाहीं का टाकतां येणार ? " असें लीलाताईनें म्हटल्यावरून तिनें तें फोडलें, व लीलाताईलाही काय ते कळावें म्हणून मोठ्यानें वाचूं लागली.

" प्रिय भगिनी कु. मालतीबाई यांस—

सा. न. वि. वि. माझा व आपला विशेषसा परिचय नसतांही मला आपणाला पत्र लिहिणें भाग पडत आहे. आपण तें नीट वाचून शांत मनानें त्याचा विचार कराल व काय ठरवायचें तें ठरवाल, अशी मला आशा आहे.

टेस्ट्मॅचमध्यें व प्रत्यक्ष टूर्नमेन्ट्स्च्या वेळीं माझ्याकडून आपल्यासंबंधानें जो अन्याय घडला त्याचें शक्य तर निराकरण करावें, अशा हेतूनें मी हें धाडस करीत आहें.

रा. रा. कृष्णाजी भास्कर परांजपे (ज्यांना आपण ओळखतां) यांचा व माझा आज जवळ जवळ पंधरा वर्षें स्नेह आहे. आम्हा दोघांमध्यें कोणतीही गोष्ट गुप्त राहूंच शकत नाहीं. देवदयेनें आपल्याला एखादी जीवाभावाची मैत्रीण लाभली असती तर आपल्या-लाही हा अनुभव आला असता. असो. तेव्हां आपल्या घरीं घडलेली सारी हकीकत त्यानें मला सांगितली, हें त्याचें करणें आपल्याला वावगें वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. ती हकीकत

ऐकल्यावर मला माझ्या मित्राच्या मानी स्वभावाचें जितकें कौतुक वाटलें तितकाच आपला व त्या प्रसंगीं हजर असलेल्या आपल्या घरच्या मंडळीचा राग आला. त्याच वेळीं मी निश्चय केला कीं आपल्या तेजस्वी मित्राचा अपमान करणाऱ्या या स्त्रीशीं आपला कोणत्याही तऱ्हेनें संबंध येऊं द्यावयाचा नाहीं; व यदाकदाचित् आलाच तर त्या वेळीं तिचा पाणउतारा करून आपल्या मित्राच्या झालेल्या मानखंडनेची सव्याज फेड करावयाची.

तशी संधि पहिल्यानें मला टेस्ट् मॅचच्या वेळीं मिळाली. तुम्हालाही खात्री वाटत असेल कीं मी तुमच्याशीं तुलना केली असतां फारच कसलेला खेळाडु आहें. तेव्हां त्या वेळीं किंवा नंतर टूर्नमेन्ट्स्मध्येंही मी तुमच्याशीं खेळलों असतों तर त्याचा परिणाम काय झाला असता याविषयीं तुम्हाला शंका वाटत असेल, असें मला वाटत नाहीं. त्या वेळीं मी तुमच्याशीं खेळण्याचा इन्कार केला तेव्हां कांहीं कमकुवत खेळाडूंनीं मला तुमच्याशीं खेळण्याची भीति वाटते, असा त्याचा अर्थ करून मला coward म्हटलें व तुमच्याशी खेळण्यास आपल्याला चॅन्स मिळावा म्हणून तेथें गोंडा घोळीत उभे असलेल्यांनीं माझी मूर्खांत गणना केली. दोघांचीही निर्भर्त्सना मी शांतपणें सहन केली. कारण त्यांत मला मी माझ्या मित्रासाठीं हें सर्व सहन करीत आहें असें सात्विक समाधान वाटत होतें.

मी ती हकीकत टूर्नमेन्ट्स्च्या पूर्वीं कृष्णाला सांगितली त्या वेळीं मी तुमच्याशीं खेळण्याचें नाकारलें यांत त्याला विशेष असें कांहीं वाटलें नाहीं असें मला वाटलें. म्हणून टूर्नमेन्टस्च्या वेळीं मी त्याची पुनरावृत्ति केली. तो माझ्या बेताच्या कदाचित् आड येईल म्हणून मी त्याला हें अगोदर सांगितलें नव्हतें.

आतां हें सर्व सांगितल्यावर मला पत्र लिहिण्याची जरूरी कां पडली तें सांगतों.

मी केलेल्या अविचाराबद्दल तुम्हाला किंवा वसंतरावांला माझा राग आला असेल यांत कांहीं आश्चर्य नाहीं. पण ज्याच्याबद्दलचा सूड उगविण्यासाठीं म्हणून मी तुमचा अपमान केला त्यानेंच माझ्यावर इतका भडिमार केला कीं तितका प्रत्यक्ष तुम्हीही माझ्यावर केला नसेल. मी केलेल्या अविचाराबद्दल माझा मलाच आतां संताप येत

आहे; आणि असा पोरकटपणा माझ्या हातून घडल्याबद्दल माझी मलाच आतां लाज वाटूं लागली आहे. सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं घडलेल्या सर्व प्रकाराबद्दल सर्वस्वी मी एकटाच दोषी आहें. कृष्णाचा त्याच्याशीं यत्किंचितही संबंध नाहीं. माझ्या हातून ही चूक घडली असली तरी त्यांत माझा कोणताही स्वार्थ मला साधावयाचा नव्हता किंवा तुमचा अपमान करावा हाही मूळ हेतु नव्हता. मित्राच्या झालेल्या अपमाना-बद्दल सूड उगविणें एवढा एकच हेतु माझ्या वागण्याच्या मूळाशीं होता.

झाल्या गोष्टीबद्दल मी तुमची प्रांजलपणें क्षमा मागतों. हातून खरोखरच चूक झालेली समजल्यानंतर तीबद्दल क्षमा मागण्यांत मला मुळींच कमीपणा वाटत नाहीं. आपला माझ्यावर झालेला कोप जरी मला क्षमा करण्याच्या मर्यादेबाहेर गेलेला असला तरी मला एक वेळ समाधान वाटेल; पण झाली गोष्ट ही कृष्णाच्या सांगण्यावरून झाली, असा तुमचा गैरसमज झाला असल्यास तो मात्र अजिबात दूर करा, एवढीच माझी आपल्याला विनंती आहे. तुम्हाला क्षमा करावयाचीच नसेल तर एकट्या माझ्यावरच तुम्ही किती त्या रागावा. पण माझ्या कृष्णाच्या बाबतींत मात्र आपला गैरसमज करून घेऊं नका. माझ्यामुळें त्याच्यासंबंधीं लोकांचा गैरसमज झाला तर तें मला अति दुःसह होईल. आपण आपल्या मनाशीं सर्व गोष्टींचा शांतपणें विचार कराल अशी पुनः एकवार आशा प्रगट करून मी आपली रजा घेतों.

कळावें. राग सोडून लोभ असावा हे वि.

आपला,

**केशव हरी जोशी.”**

पत्र वाचून झाल्यावर तर मालतीला फारच वाईट वाटूं लागलें. कृष्णाचा जसा त्यानें निष्कारण करून घेतलेल्या गैरसमजावरून तिला पहिल्या सपाट्याला राग आला होता, पण विचारांतीं तिचें मन बदललें, तसेंच तिचें या वेळींही झालें. आपल्या बरोबरीच्या इतर मंडळींची निष्कारण निंदा सहन करावी लागत असतांही आपल्या समजुतीप्रमाणें आपण मित्रकार्य करीत आहोंत एवढ्याच समाधानामुळें ज्यानें आप-ल्याशीं खेळण्याचा इन्कार केला, त्याच्या त्या चुकीच्या समजुतीबद्दल कदाचित् आपण त्याला दोष देऊं शकूं; परंतु अशी निंदा सहन करावी लागत असतांही तो आपल्या निश्चयापासून ढळला नाहीं, याबद्दल जोशांची तारीफच केली पाहिजे असें

तिला वाटूं लागलें. पत्र वाचल्यानंतर मालतीच्या चेहेऱ्यावरून तिची मनःस्थिति ओळखणें लीलाताईला जड गेलें नाहीं.

**लीला०**—"कां ? मालती, आतां तरी वसंतरावांनीं तुझी करून दिलेली कल्पना खोटी असून मी तुला सांगत होतें तेंच खरें, अशी तुझी खात्री झाली कीं नाहीं ?"

**मालती०**—"मी तुला मघाशींच नाहीं कां सांगितलें कीं मी जरा अधिक शांतपणें विचार केला असता तर माझी चूक मला खात्रीनें कळून आली असती म्हणून ?"

**लीला०**—"मग आतां तुझें मन अगदीं साफ झालें तर ?"

**मालती**—"होय. आतां झालेल्या प्रकारांत कृष्णरावांचें कांहींच अंग नव्हतें, अशी मला खात्री वाटूं लागली आहे. जोशांचें मात्र मला हंसूं येतें. आपल्या मित्रा-बद्दलचा सूड घेण्याची ही कुठली तऱ्हा ? अगदींच पोरकट आहेत !"

**लीला०**—"मनुष्य वयानें किंवा शिक्षणानें जरी वाढला तरी त्याचा उपजत स्वभाव कांहीं त्यामुळें अजिबात बदलत नाहीं. तो केव्हांना केव्हां तरी आपलें डोकें वर काढतोच काढतो. जोशांनीं अगदींच पोरकटपणा केला हें मलाही कबूल आहे. पण त्याबद्दल मी त्यांना दोष देण्यास मात्र मुळींच तयार नाहीं. कारण एकंदर प्रकारावरून त्यांचें अंतःकरण पवित्र आहे, अशी माझी ठाम समजूत झाली आहे. बरें, आतां त्यांची त्यांनाच झाल्या गोष्टीबद्दल खंति वाटूं लागली आहे. अजून त्यांच्यांतील थिल्लरपणा गेला नसल्यामुळें आपण काय करीत आहोंत व त्याचे परिणाम काय होणार आहेत, हें त्यांच्या लक्षांत आलें नाहीं. मी तुझ्या ठिकाणीं असतें तर मी खात्रीनें झालेला प्रकार विसरून जाण्याचा उदारपणा दाखविला असता. कारण मी नेहमीं वरवरच्या वागण्यावरून माणसाची परीक्षा करीत नसून त्याच्या अंतःकरणाच्या निर्मळतेवरून त्याची परीक्षा करीत असतें."

**मालती**—"माझेंही मन वसंतरावांच्या सांगण्यावरून जरासें बिथरलें म्हणून त्यांतील सर्व सद्‌गुणांचा लोप झाला आहे असें समजूं नकोस. त्यांच्यावरील माझ्या प्रेमामुळें ते जें बोलतील तें मला खरें वाटूं लागतें व त्यांच्याविरुद्ध बोलण्याची मला हिंमत होत नाहीं हें खरें असलें तरी सज्जनांना दुर्जन म्हणण्याला जर ते मला पढवूं

लागले तर तें मी केव्हांही मान्य करणार नाहीं. मागील खेपेस मला पडलेली भूल ही शेवटचीच असें तूं समज. ”

**लीला०**—“ हा तुझा निश्चय ऐकून माझ्या मनाला अतिशय समाधान वाटत आहे. तुझें वसंतरावांवर प्रेम आहे असें तुला वाटतें आणि त्यांचेंही तुझ्यावर प्रेम आहे, असें ते म्हणत असतात. तेव्हां दोघांनाही एकमेकांचें म्हणणें पटणें व खरें वाटूं लागणें हें कांहीं अस्वाभाविक नाहीं. पण आपण कोणाविषयीं व कसा गैरसमज करून घेत आहोंत, याची आपल्या स्वतःला जाणीव असूं द्यावी, एवढेंच माझें म्हणणें. बरें. आतां जेवून जातेंच मी घरीं. ”

लीलाताई गेल्यावर बराच वेळपर्यंत मालती त्या पत्राकडे स्वस्थपणें पहात बसली होती. आपल्या हातून निव्वळ वसंतरावांच्या सांगण्यामुळें कृष्णाच्या संबंधानें अन्याय झाला याबद्दल तिला वाईट वाटूं लागलें. तिला स्वतःलासुद्धां राग आला होता. नाहीं असें नाहीं. पण तो केशवाचा. केशवाच्या कृत्याच्या मूळाशीं कृष्णाच असला पाहिजे अशी तिची समजूत करून देण्यास वसंतच कारण होता. कृष्णासंबंधीं आपलें मन कलुषित करण्याचा वसंतराव इतका जारीनें प्रयत्न कां करीत आहेत, याचा उलगडा तिला होईना. माझें मन त्या बिचाऱ्याबद्दल वाईट झालें तर त्यांत यांचा काय फायदा? त्यापासून यांना कांहीं लाभ व्हावयाचा असता तर तें निदान त्यांच्या स्वार्थाच्या दृष्टीनें तरी योग्य ठरलें असतें. बरें. ते असें माझ्या हिताकरितां करितात असें ह्मणावें तर यानें माझें कांहीं हित होणार आहे असें कांहीं मला वाटत नाहीं. कारण कृष्णाविषयीं माझें मत चांगलें असलें काय वाईट असलें काय, त्यांत माझें प्रत्यक्ष नफानुकसान कांहींच नाहीं! मग हा काय त्यांचा स्वभावदोष म्हणावा? जोशांनीं अविचारानें कां होईना पण जो मार्ग पत्करला त्यांत त्यांच्या दृष्टीनें निदान मित्रकार्य तरी होतें, आणि तरीसुद्धां मी त्यांना पोरकट आणि मूर्ख म्हणावयास तयार! पण यांच्या अशा करण्यांत ना स्वार्थ ना परार्थ. असें असतां मला रागही येत नाहीं किंवा त्यांची कांहीं चूकही दिसत नाहीं. इतकेंच नव्हे तर ते जें कांहीं सांगतात त्याला होकार देण्याचा मोह मी आंवरूं शकत नाहीं, हें आश्चर्य नव्हे का? असे विचार मालतीच्या डोक्यांत घोळत आहेत तोंच वसंत तिच्या खोलींत आला. मालती आपल्या विचारांत अगदीं गढून गेली असल्यामुळें तो आल्याचें तिला समजलें नाहीं. तो हलुच तिच्या खुर्चीमागें जाऊन उभा राहिला. तिच्या हातांत अस-

लेलें पत्र त्याला दिसलें. तेव्हां तो तिच्यासमोर येऊन त्याबद्दल तिला विचारूं लागला. तिनें एक शब्दही न बोलतां तें त्याला वाचण्यास दिलें. तें त्यानें दोन वेळां वाचलें. आणि थोडेंसें हंसल्यासारखें करून म्हणाला—

" मालतीताई, हें पत्र वाचून तुमचा काय ग्रह झाला ? "

**मालती**—" कृष्णरावच या सर्व प्रकाराच्या मूळाशीं असले पाहिजेत अशी समजूत करून मी त्यांचा मोठा गुन्हा केला आहे, अशी माझी आतां पुरी खात्री झाली असून मला त्याबद्दल फार वाईट वाटत आहे. "

**वसंत**—" You are a simpleton मालतीताई. नुसत्या एवढ्याशा पत्रावरून झालेल्या प्रकारांत कृष्णाचा कांहींही संबंध नसला पाहिजे अशी तुम्हाला खात्री वाटूं लागली आहे म्हणतां ? मला तर याचें फार आश्चर्य वाटतें बुवा ! "

**मालती**—" वसंतराव, मी जरा स्पष्टच बोलतें याबद्दल क्षमा करा मला. पण तुम्ही माझ्या डोक्यांत शिरविली नसतीत तर या सर्व प्रकरणाच्या मूळाशीं कृष्णाच आहे, ही कल्पनाही माझ्या डोक्याला कधीं शिवली नसती. "

**वसंत**—" तुमच्या डोक्याला ही कल्पना आपण होऊन शिवली नसती, म्हणून मला ती तुमच्या डोक्यांत शिरवणें भाग पडलें. मी स्वतः बुद्धिप्रधान असल्यामुळें माझ्याप्रमाणेंच माझ्या भावी सहचारिणीनेंही तसेंच असावें अशी माझी इच्छा आहे, आणि म्हणूनच मी तुम्हाला आतांपासून माणसाची परीक्षा करण्याची विद्या शिकवून ठेवीत आहें. "

**मालती**—" माणसाची परीक्षा करण्याची विद्या शिकवितांना त्या माणसाबद्दल खोटेनाटे ग्रह करून यावयाचे, असें तुम्ही ठरवून ठेवलें असेल, तर ही विद्या शिकण्यास मी साफ तयार नाहीं. मी इतकी स्पष्ट स्पष्ट बोलत आहें, यावरूनच मला त्या विद्येचा किती तिरस्कार वाटत आहे हें तुम्हाला कळून येईल. माझा अगदीं नाइलाज आहे. सज्जनांना दुर्जन म्हणावयास शिकविणारी विद्या शिकण्यास माझें मन मला सांगत नाहीं. "

**वसंत**—" मालतीताई, माझ्या बोलण्यावर विश्वास न ठेवतां ज्याचा आणि तुमचा चार दोन वेळां एके ठिकाणीं खेळण्यापेक्षां ज्यास्त परिचय नाहीं, अशा माणसाच्या सांगण्यावर तुम्ही तो ठेवण्यास तयार होतां याबद्दल मला फार वाईट वाटतें. सज्जनांना दुर्जन

म्हणण्यास मी तुम्हाला शिकवीन असें तुम्हाला वाटतें काय ? बरें बुवा. असें करण्यापासून माझा स्वतःचा कांहीं फायदा असता तर एक असो तरी! मी स्वार्थांध झाल्यामुळें असा नीचपणा माझ्या हातून घडत आहे असें तरी तुम्हाला म्हणतां आलें असतें. पण यांत माझा स्वार्थ कांहींच नाहीं हें तुम्हालाही नाकबूल करतां येणार नाहीं. मग कृष्णा हा खरोखर कोणत्या मनोवृत्तींचा मनुष्य आहे हें तुम्हाला सांगत असतां त्याची खोटी नालस्ती करण्याचें मला कारण काय ? ज्या स्त्रीबरोबर मला माझें सबंध आयुष्य कंठावयाचें आहे, तिला मानवहृदयाची नीट कल्पना असावी एवढ्याच शुद्ध व निर्भेळ हेतूनें मी या उठाठेवींत पडलों आहें. परमेश्वरानें मनुष्याला बुद्धि दिली तिचा त्यानें पूर्ण उपयोग करून घेतलाच पाहिजे," असें म्हणून वसंत झटक्यानें आपल्या खोलीकडे जाऊं लागला. पण मालतीनें त्याला हांक मारल्यावरून तो परत फिरला.

**मालती—**" मला तुम्हाला एक फार महत्त्वाची गोष्ट विचारायची आहे. तुमचा व माझा विवाह होणार तेव्हां ती मला विचारून घेतलीच पाहिजे. तुम्ही आपल्या या परतंत्र देशाकरितां कोणता स्वार्थत्याग करण्याला तयार व्हाल ? "

**वसंत—**" एकदम हा भलताच विषय कुठून काढलात तुम्हीं ?

**मालती—**" देशासाठीं स्वार्थत्याग करणें हा तुम्हाला भलताच विषय वाटतो ?"

**वसंत—**" देशासाठीं स्वार्थत्याग करणे हा विषय मला भलताच कसा वाटेल ? पण या प्रश्नाचें उत्तर विचारल्याबरोबर देण्याइतका तो साधा आहे, असें मला वाटत नाहीं. मोघम रीतीनें मी तुम्हाला एवढेंच सांगून ठेवतों कीं माझ्या बुद्धीला पटणारी कोणतीही गोष्ट मी देशासाठीं करण्यास तयार आहें." असें म्हणून तो आपल्या खोलींत निघून गेला.

तो गेल्यावर मालती पुनः विचार करूं लागली. "कोणाचें तरी म्हणणें खरें धरावें ? जोशांचें आणि लीलाताईचें कीं वसंतरावांचें ? जोशांची मला नीटशी माहिती नसल्यामुळें त्यांनीं लिहिलें तें खरें लिहिलें कीं त्यांत त्यांचें कांहीं ढोंग आहे हें कळण्यास सध्यां कांहीं मार्ग नाहीं. राहितां राहिले वसंतराव आणि लीलाताई. एकाची मी वाग्दत्त वधू तर दुसरी माझ्या जिवाला जीव देणारी मैत्रीण. वसंतराव एका तिऱ्हाईत मनुष्याला नीच ठरवून माझा त्याच्याविषयींचा आदर कमी करूं पहात

आहेत तर लीलाताई माझ्या बदलल्या मनाला पुनः ताळ्यावर आणण्याच्या सदुद्योगांत गुंतली आहे. दोघांच्याही करण्यांत स्वार्थाची मलिनता नाहीं. मग खरें तरी कोणाचें धरावें ? पण याचें उत्तर अगदीं सोपें नाहीं का ? दोघांच्याही सांगण्यांत यत्किंचितही स्वार्थ नसला तरी एक दुसऱ्याबद्दल माझें मन कलुषित करूं पहात आहे आणि दुसरा तें तसें कलुषित होऊं नये म्हणून खटपट करीत आहे. दोघेंही माझ्याच कल्याणाकरितां म्हणून दोन परस्परविरुद्ध तऱ्हेनें मला गोष्टी सांगत आहेत. मग जें करण्यापासून त्या बिचाऱ्या तिऱ्हाईताचा तोटा होणार नाहीं तेंच मी कां करूं नये ? बस्. झाला—माझा अगदीं ठाम निश्चय झाला. वसंतराव कितीही चलाख किंवा बुद्धिवान असले व माझ्यावर त्यांचें कितीही उत्कट प्रेम असलें तरी त्यांच्या सांगण्यामुळें मला आदरणीय वाटत असलेल्या मनुष्याला कलंक लावण्यास मी केव्हांही तयार होणार नाहीं. मग वसंतराव मला मूढ म्हणोत—काय वाटेल तें होवो !"

तिला वसंतरावाविषयीं वाटत असलेल्या प्रेमांत कोठला तरी पडदा आडवा येत आहे असा तिला भास होऊं लागला. त्याच वेळीं कृष्णाचा चेहेरा तिच्या डोळ्यासमोर उभा राहिला.

वसंताला विलायतेस जाण्याला आतां थोडेच दिवस शिल्लक होते.

---

# प्रकरण १२ वें.

आतां आपल्याला थोड्याशा निराळ्या विषयासंबंधानें विचार करावयाचा आहे. मुख्य कथानकाशीं त्याचा संबंध येत असल्यामुळें त्याबद्दल विचार करणें भाग आहे.

लोकमान्यांच्या निधनानंतर अखिल भारतवर्षाच्या राजकारणाची धुरा आपल्या मानेवर तोलून धरण्यासारखा कोणीच धुरंधर पुढारी महाराष्ट्रांत राहिला नाहीं. जे कांहीं थोडेसे आपण ती तोलून धरण्यास समर्थ आहोत अशा घमेंडींत होते, त्यांच्याच्यानें पुढें सरसावण्याचा धीर होईना. ही जबाबदारी म. गांधी यांनीं आपल्या शिरावर घेतली. म. गांधी यांनीं देशाच्या राजकारणाची कोणती दिशा ठरविली आहे हें नीट तावून सुलाखून पाहिल्यानंतर लोकमान्यांच्या हयातींत आजन्म त्यांच्या उपदेशाप्रमाणें वर्तन करणारे कित्येक पुढारी महात्माजींस आपापल्या बलानुसार मदत करण्यास धांवले. त्यांच्या मनांत जातगोतीबद्दल किंवा महात्माजी अहमदाबादेचे म्हणजे महाराष्ट्राच्या बाहेरचे–त्यांच्याशीं आम्ही–राजकारण धुरंधर म्हणविणाऱ्या महाराष्ट्रीयांनीं सहकार्य करावयास उद्युक्त होणें म्हणजे लोकमान्यांच्या थोर नांवास कलंक लावणें आहे, असल्या प्रकारचे राष्ट्रहितास परम विघातक असणारे विचार शिवले नाहींत. त्यांचीं अंतःकरणें असल्या क्षुद्र विचारांच्या मर्यादेपलीकडे गेलेलीं होतीं. देशाचें राजकारण तेजस्वी मार्गानें–शरणागतीच्या अधोमार्गानें नव्हे–चालविणाऱ्या कोणत्याही बहाद्दर राष्ट्रभक्ताला त्यांनीं अशीच मनोभावानें मदत केली असती. पण त्यांच्या अशा वर्तनाचा तटस्थ राहिलेल्या पण पुढारीपणाचा टेंभा मिरवीत असलेल्या कित्येक पुढाऱ्यांनीं अगदींच निराळा अर्थ केला. ते महात्माजींस मदत करण्यास पुढें सरसावलेल्या पुढाऱ्यांच्या बुद्धिमत्तेबद्दलच शंका घेऊं लागले. मतभेद असूं शकतील, त्याबद्दल कांहीं वाद नाहीं. पण जे इतके दिवस लोकमान्यांच्या प्रभावळींतील तेजस्वी तारे म्हणून चमकत होते, तेच आज महात्माजींचे अनुयायी झाल्याबरोबर, त्यांच्यावर बुद्धिमांद्याचा आरोप करतांना अर्ध्या हळकुंडानें पिंवळ्या झालेल्या त्या निंदक व अहंमन्य शिष्टांना खरोखर कांहीं तरी लाज वाटावयास पाहिजे होती. असल्या प्रकारच्या कांहीं पंडितांनीं त्या वेळीं, " आपण आजन्म लोकमान्यांचे शिष्य

होतों व त्यांच्या निधनानंतर आपण महात्माजींचें शिष्यत्व पत्करणें म्हणजे महाराष्ट्राच्या आजवरच्या लौकिकास कमीपणा आणणारें आहे, ज्याचें काम त्यानेंच करावें, भलत्याच भानगडींत भलताच मनुष्य पडला म्हणजे कार्यसिद्धी ऐवजीं कार्यनाशच पदरीं पडतो असा सामान्य अनुभव आहे, सर्व जन्म नेमस्तपणांत घालविलेल्या आणि नामदार गोखल्यांना आपले राजकीय गुरू मानणाऱ्या या गुजराथी वाण्याला देशाच्या राजकारणांत काय समजणार आहे," असें म्हणून महात्माजींस मदत तर केली नाहींच पण उलट मवाळांबरोबर आपणही स्वतः गचाळ बनून त्यांचें महत्कार्य खच्ची करण्याचा दुष्ट उपक्रम त्यांनीं चालविला. असल्या क्षुद्रबुद्धीच्या लोकांनीं आपणांस लोकमान्यांचे शिष्य म्हणवून घेणें हें मूर्खपणाचें तर खरेंच पण त्याबरोबरच तें त्यांच्या गुरूच्या अजरामर कीर्तीला काळिमा फांसणारें होतें. जहालाग्रणी लोकमान्यांच्या शिष्यत्वाचा टेंभा मिरविणारांच्या देखत नेमस्ताग्रणी नामदार गोखले याचे आपण शिष्य असल्याचें सांगून राष्ट्राचें धुरीणत्व महात्माजींनीं आपल्याकडे ओढून घेतलें. शिष्य कोणाचा किंवा मुलगा कोणाचा हा महत्त्वाचा प्रश्न नसतो. त्या गुरूच्या किंवा त्या बापाच्या रक्तांतील किती अंश त्या शिष्याच्या किंवा मुलाच्या नसांत उतरला आहे, हा महत्त्वाचा प्रश्न असतो. या अहंमन्यांच्या त्यावेळच्या वागणुकीवरून असाही संशय येतो कीं लोकमान्यांना आपल्या हयातींत कांहीं तरी विलक्षण धडाडीचें कार्य करावयाचा सुप्रसंग प्राप्त झाला असता, तरी देखील हे असेच स्वस्थ बसले असते. आपल्या सुखमय जीविताच्या आड येणारा कोणताही कार्यक्रम या बुद्धिप्रधान पंडितांनीं आपल्या बुद्धीला पटतो असें कबूलच केलें नसतें. एखाददुसरें व्याख्यान देऊन पुढारीपणाचा मान मिळविण्याइतकी व तशाच रीतीनें तो संभाळून ठेवण्याइतकीच त्यांची धांव होती. परीक्षेची वेळ येतांच हे तटस्थच रहावयाचे! त्या वेळीं त्यांस महात्माजींचा कार्यक्रम पसंत नव्हता तर त्यांनीं मर्दासारखें पुढें सरसावून त्याहून अधिक धडाडीचा—राष्ट्राचीं दोन पावलें अधिक पुढें पडण्यासारखा कार्यक्रम आपल्या सुपीक मेंदूंतून काढून विचारासाठीं राष्ट्रापुढें ठेवावयाचा होता, व त्याच्या अंमलबजावणीस लागावयाचें होतें. पण एवढा जोम कोणाच्या अंगीं होता? सर्वांची 'किं कर्म किमकर्मेति,' अशी स्थिति झाली होती. स्वतःच्या अंगीं तेज नाहीं—दुसऱ्याचें तेज सहन होत नाहीं—असल्या लोकांची हीच गत व्हावयाची. त्यांनीं जन्मभर दुसऱ्यांच्या दिव्य तेजानें

दिपल्यामुळें व भांबावल्यामुळें डोळे चोळीत आणि बोटें मोडीत एखाद्या हतभागी विधवेप्रमाणें दिवस कंठीत रहावयाचें !

खरोखरच तो काळ अवर्णनीय होता. त्या वेळपर्यंत कोणाची अशी कल्पना नव्हती कीं शस्त्राच्या सहाय्यावांचून इतकेंच नव्हे तर दुसऱ्यानें आपल्यावर शस्त्र चालविलें असतांना सुद्धां त्याचा नुसता प्रतिकार केल्यावांचूनही सबंध हिंदुस्थान आसेतुहिमाचल राष्ट्रीय भावनेनें हादरून जाईल. त्या वेळीं असे हतभागी किंवा स्पष्ट भाषेंत बोलावयाचें म्हणजे श्वासोच्छ्वास करीत असलेले मृत तरुण फारच थोडे असतील कीं ज्यांचीं अंतःकरणें स्वातंत्र्याच्या लहरींनीं उसळून तुफान झालीं नव्हतीं. राष्ट्राच्या स्वातंत्र्यासाठीं उसळलेल्या वादळांत सामील होण्याची ज्यांना इच्छा व हिंमत होत नाहीं, त्या मुर्दाडांनीं, आपल्या तारुण्याच्या जोमाची व उसळत्या रक्ताची घमेंड मारणें म्हणजे जगाच्या डोळ्यांत धूळ फेंकणेंच होय.

आज मारवाडी विद्यालयांत नुसता तोबा उडाला होता. व्याख्यानाची ठरलेली वेळ ६॥ ची असतांना ६ वाजतांच विद्यार्थ्यांची व इतर सुशिक्षित समाजाची इतकी भयंकर गर्दी उसळली होती कीं आता त्या हॉलमध्यें, एकसुद्धां अधिक मनुष्य मावूं शकलें नसतें. हॉलमध्यें, हॉलच्या बाहेर, खिडक्यांतून व हॉलला लागून असलेल्या जिन्यावरून जिथून जिथून म्हणून व्याख्यान ऐकूं येण्याचा संभव होता, ती सर्व जागा श्रोतृवर्गानें व्यापून टाकली होती. आजचे व्याख्याते फारच लोकप्रिय असून त्याची भाषणशैली विलक्षण सडेतोड अशी होती. म. गांधी यांनीं ब्रिटिश सरकारनें केलेल्या जालियनवाला बागेंतील कत्तलीला उत्तर म्हणून " अनत्याचारी असहकारितेचें " निशाण उभारल्यामुळें लोकजागृति करून त्यांच्या दिव्य संदेशाचा पुरस्कार व प्रसार करण्याकरितां निरनिराळ्या ठिकाणचे देशभक्त निरनिराळ्या ठिकाणीं व्याख्यानें देत फिरत असत. सदरहू व्याख्यातेही अशाच कारणानें मुंबईंत आले होते.

व्याख्यान ऐकण्याला कृष्णा, केशव व वसंत असे तिघेही हजर होते. पैकीं वसंत हा कुठें तरी वेळ काढायचा तो इथेंच काढावा म्हणून आला होता. मालती आणि लीला याही हजर होत्या.

ठरल्यावेळीं व्याख्याते हजर होऊन टाळ्यांच्या प्रचंड कडकडाटांत त्यांनीं आपल्या भाषणास सुरुवात केली.

" प्रिय देशबांधवहो,

मी आपणांपुढें कोणता विषय प्रतिपादन करावयास उभा राहिलों आहें हें आपण जाणतच आहांत. विषय अतिशय महत्त्वाचा असला तरी मला वेळ फारच थोडा असल्यामुळें, मला माझें भाषण शक्य तेवढें आंखुडतें घ्यावें लागणार आहे. पुनः सवड झाली तर मी आपले विचार विस्तृतपणें आपणांपुढें मांडीन. आतां प्रास्ताविक भाषणांत अधिक कालापव्यय न करितां मी एकदम मुख्य मुद्याकडे वळतों.

ब्रिटिश साम्राज्याचें संरक्षण करण्याकरितां आपल्या देशबांधवांनीं रणयज्ञांत आपल्या आहुति दिल्या. त्याबद्दल इंग्रज सरकारकडून आपल्याला पारितोषक काय मिळालें ? दुसऱ्या एखाद्या सज्जनाकरितां देशानें एवढा अलौकिक स्वार्थत्याग केला असता तर त्यानें आपल्याकरितां व आपल्या देशाकरितां काय वाटेल तें केले असतें. आपण केलेल्या उपकारांची फेड—केवळ आपल्या उद्धारासाठींच इतक्या दूर अंतरावर आलेल्या आपल्या मायबाप सरकारनें ज्या रीतीनें केली, तीवरूनच आपल्याला कळून येईल कीं हे इंग्रज लोक तुमच्या आमच्यासारखे नव्हत. कारण कोणीही मानवानें दुसऱ्यानें आपल्यावर केलेल्या उपकारांची फेड प्रत्युपकारानेंच केली असती; पण इंग्रजांनीं तशी केली नाहीं. निरपराध, निःशस्त्र, असहाय असलेल्या आपल्या पंजाबस्थ देशबांधवांना जनरल डायरनें जालियनवाला बागेंत केलेल्या अमानुष कत्त-लीला नाहक बळी पडावें लागलें. कल्पना करा कीं मी आतां इथें आपल्यापुढें व्याख्यान देण्यासाठीं उभा राहिलों आहें व तें ऐकण्यासाठीं आपण सर्व इथें जमलां आहांत. अशा वेळीं एखादा जनरल डायरसारखा रणनवरा—गलबला करूं नका, अगदीं शांत रहा. जनरल डायरला मी रणनवरा म्हटलें तें तुम्हाला आवडलें नाहींसें दिसतें. पण तुम्हाला आवडलें नाहीं म्हणून खरें तें सांगण्यास मी कां भ्यावें ? मी तुम्हांला छातीवर हात ठेवून सांगतों कीं डायर रणनवराच आहे. तो महाबलाढ्य योद्धा आहे. हातांत बंदूक धरून निःसहाय व निःशस्त्र लोकांची निष्कारण कत्तल उडविणें म्हणजे मन किती घट्ट बनलें असलें पाहिजे ? मनाची केवढी विलक्षण तयारी झाली असली पाहिजे ? आपण भित्रे आहोंत—मुर्दाड आहोंत. आपल्या हातांत आज इंग्रज सरकारनें अगदीं मोठ्या उदार अंतःकरणानें बंदूक दिली तरी आपल्याला असलें अद्भुत पराक्रमाचें अचाट साहसी कृत्य साधणें शक्य

नाहीं. आपलीं मनेंच तितकीं बनलेलीं नाहींत. आपल्या मनाला निरपराध व दुर्बल लोकांचे नाहक बळी घेतांना द्रव आल्यावांचून रहाणार नाहीं. डायरला दया आली नाहीं. त्याचें काळीज पोलादाचें नसलें तर कदाचित् लोखंडाचें किंवा निदान दगडाचें तरी असलें पाहिजे. कत्तल करीत असतां अर्भक, म्हाताराकोंतारा असला बालिश पक्षभेद साहेबमजकुरांनीं दाखविला नाहीं. निःपक्षपातीपणाचे आपण मूर्तिमंत अवतार आहोंत, हें जनरलबहादुरांनीं आपल्या कृतीनें जगास पटवून दिलें.

पण आश्चर्याची गोष्ट अशी कीं वास्तविक म्हणजे इंग्रजांचा हा सद्गुण जगाच्या चव्हाट्यावर उघडा झाला असतां त्यांना आनंद वाटला नाही तर उलट त्यांनीं माफीदाखलही दोन शब्द उच्चारले. घरदार घशाखालीं घालून चार दोन रुपयांची सूट देण्याचें औदार्य जसें एखादा वस्ताद मारवाडी आपल्या कुळाला दाखवितो, त्याहीपेक्षां हा अधिक हास्यास्पद प्रकार नाहीं काय ?

धडधडीत आमच्या डोळ्यादेखत आमच्या बांधवांची तुम्ही निष्कारण कत्तल उडविली असतांना, आम्ही तुमच्या माफीदाखल उच्चारलेल्या दोन शब्दांवर खुष राहून स्वस्थ बसावें काय ? तुमच्याच हिशेबानें उत्तर द्यावयाचें म्हटल्यास तुमच्या या अमानुष अत्याचाराबद्दल तुमच्या इंग्लंडलाच जलसमाधि घेण्यास लावणें आम्हाला भाग होतें. पण आमच्या अंगांत मनुष्यपणा-माणुसकी–आहे; आम्ही कांहीं दैत्य नाहीं आम्हांला फक्त आमच्या घरीं पावलेल्या संभावितपणाच्या पांघरुणाखालीं हवा तसा धिंगाणा घालणाऱ्या पाहुण्याकडून आमच्या घरच्या माणसांची होत असलेली गळचेपी बंद करावयाची आहे; व त्यासाठीं आम्हाला स्वराज्य मिळविणें जरूर आहे. ज्याचा माल त्याला मिळणें हें ईश्वरी कायद्याला धरून आहे. तो मिळत नसेल तर तो मिळविण्यासाठीं आपण योग्य उपाय अमलांत आणणें हेंही ईश्वराच्या दरबारांत पातक गणलें जात नाहीं.

आपली भूमाता निव्वळ परतंत्र, ह्मणून तिची चाललेली असली पायमल्ली जर आपण निमूटपणें सहन केली तर सरकारची अगदीं खात्रीच होईल कीं आतां कांहीं हरकत नाहीं ! इतका प्रकार झाल्यावर सुद्धां यांपैकीं कोणाला राग येत नाहीं. त्याअर्थीं ही हिंदभूमि नसून षंढभूमि असली पाहिजे ! मी आपणास जो उपाय

म. गांधी यांच्या मताप्रमाणें व आज्ञेप्रमाणें सुचविणार आहें तो ऐकून तुमच्यापैकीं बऱ्याच जणांना आश्चर्य वाटण्याचा संभव आहे. तो मार्ग ह्मणजे 'अनत्याचारी असहकारिता' हा होय. हलकट अत्याचाराचा प्रतिकार सात्विक अनत्याचारानें करावयाचा ही कल्पना सध्यां तुम्हाला जराशी चमत्कारिक भासली तरी विचारांतीं ती तुम्हाला पटल्याशिवाय रहाणार नाहीं.

सध्यांच्या आपल्या धूर्त राज्यकर्त्यांनीं चाकू, सुरी, कात्री हीं लहान मुलांचीं खेळणीं नव्हेत, त्याप्रमाणें तलवारी, बंदुका, तोफा हीं गुलामांचीं हत्यारें नव्हेत हें जाणून आपल्याला बिन हत्यारी करून टाकलें आहे. पशुपक्ष्यांना देखील परमेश्वरानें स्वसंरक्षणाकरितां आयुधें देऊन ठेवलेलीं आहेत. परंतु शांतता प्रस्थापित करण्याकरितां अवतरलेल्या या शांतिब्रह्मांनीं आमच्यांत शांति उत्पन्न करण्याकरितां आमचीं हत्यारें तर काढून घेतलींच पण आमच्या लोकांतील शांति वाचेनें किंवा मनानेंही ढळूं नये म्हणून आम्हाला अधिक उणें लिहिण्याचीही किंवा बोलण्याचीहि सक्तीनें मनाई केली. तेव्हां अशा दुर्बल परिस्थितींत म. गांधी यांनीं प्रवर्तिलेल्या अनत्याचारी असहकारितेच्या मार्गाशिवाय कोणताही मार्ग आपल्याला चोखाळतां येत नाहीं. मला आश्चर्य वाटतें कीं कित्येक लोकांना आपण शस्त्रहीन असल्यामुळें आपण आपलें गतस्वातंत्र्य संपादन करूं ही कल्पनाच हास्यास्पद वाटते. त्याच्या हें लक्षांत येत नाहीं कीं स्वातंत्र्यगंगेचा उगम शस्त्रांत होत नसून अंतःकरणांत—अंतःकरणांच्या पावित्र्यांत—अंतःकरणाच्या तेजांत होत असतो. भीरु अंतःकरणाच्या व गुलामगिरीस चटावलेल्या मुडद्यांच्या हातांत शस्त्रेंच काय पण अस्त्रें जरी दिलीं, तरी त्यांचा काय उपयोग होणार आहे? स्वातंत्र्याच्या दिव्य लहरींनीं तुमचें अंतःकरण उचंबळून येऊं द्या म्हणजे तुमचें तुम्हालाच कळून येईल कीं आतां आपल्याला निव्वळ शस्त्र नाहीं म्हणून स्वातंत्र्यसंस्थापनेच्या प्रयत्नास कोणताच अडथळा येऊं शकत नाहीं. अंतःकरणांतील कमकुवतपणाचा लोप होऊन वीरवृत्तीचा उदय झाला म्हणजे मनगटांत आपोआपच ताकद उत्पन्न होत असते. दुष्प्राप्य वाटत असणारी गोष्ट प्राप्त करून घ्यावयाची असल्यास मनुष्यानें त्याकरितां नादी बनलें पाहिजे—वेडें बनलें पाहिजे. एकदां त्या वेडानें डोक्याचा कबजा घेतला म्हणजे पुढचे मार्ग कोणी कोणाला सांगावे लागत नाहींत. ते ज्याचे त्यालाच आपोआप सुचत जातात व मग हिमालयासारखे पर्वतही त्याचा रस्ता रोखूं शकत नाहींत.

झाल्या गेल्या गोष्टी विसरून जाऊन आपण आपलें दीडशें वर्षांचें मित्रत्वाचें नातें कायम ठेवूं या, असें कांहीं मुत्सद्यांकडून आम्हाला उपदेशिण्यांत येत आहे. Black Hole of Calcutta या स्वकपोलकल्पित दुःखपर्यवसायी गोष्टीचा सूड म्हणून एवढा मोठा देश–कीं ज्याला 'खंड' म्हणून संबोधण्यांत येतें, त्याला आज इतकीं वर्षें पारतंत्र्यांत ठेवण्यास सदसद्विवेकबुद्धीला तिळमात्रही भीड वाटली नाहीं त्यांना आम्हाला असा उपदेश करतांना आमची नाहीं तर नाहीं पण निदान आपल्या स्वतःच्या मनाची तरी काही तरी लाज वाटावयास पाहिजे होती. जखम करणारा मनुष्य जखम विसरूं शकतो, पण ज्याला जखम होते, त्याला मात्र त्या जखमेनें उत्पन्न झालेल्या वणामुळें जन्मभर आठवण रहाते. ती बुजूं शकत नाही.

दुर्योधनानें धर्मराजाला द्यूतांत हरवून त्याचे सर्व भाऊही जिंकले. अखेरीस धर्मानें द्रौपदीस पणास लावली. तीही दुर्योधनानें जिंकली. जिंकलेल्यांची पायमल्ली करण्याकडे दुष्ट व नादान मनोवृत्तीच्या जेत्याच्या मनाचा स्वाभाविकच कल असतो. द्रौपदी आतां आपली झाली, आता आपण हिची प्रत्यक्ष तिच्या नवऱ्यांच्या देखत कितीही विटंबना केली तरी ती आपलें करणार काय, अशा कल्पनेनें दुर्योधनानें आपला सहोदर दुःशासन यास तिला भर सभेत खेचून आणण्याची आज्ञा केली. दुःशासन आपल्या वडील बंधूच्या आज्ञेची तामिली करण्याकरितां द्रौपदीला बोलावण्यास गेला. तिनें आपण जित आहोंत याची जाणीव ठेवून त्याचा जेता या नात्यानें योग्य सन्मान ठेवला व सांगितलें कीं "सध्यां मी रजस्वला आहें. तेव्हां मी सभेंत येऊं शकत नाहीं." जेता या नात्यानें गर्वानें ताठरलेल्या त्या दुःशासनानें त्या महासाध्वीला ओढून नेण्यासाठीं तिच्या अंगाला स्पर्श केला त्याबरोबर उसळून जाऊन द्रौपदी त्याच्यापासून दूर जाण्याचा प्रयत्न करूं लागतांच त्यानें तिचा पदर पकडला आणि एखादा कसाब गाईला फरफटत–ओढीत–नेतो, त्याप्रमाणें आपल्या मागोमाग त्या माउलीला खेंचून घेऊन चालला. तिनें त्यावेळीं फोडलेल्या त्या करुण हंबरड्यांनीं त्या पाषाणाचें अंतःकरण द्रवलें तर नाहींच. पण उलट तिचे मोकळे केंस आपल्या निष्ठुर हातांनीं पकडून तिचे अधिक हाल करण्याचें त्याला स्फुरण चढलें. ती सभेंत येतांच दुर्योधनानें तिच्या पतींना बैलांची उपमा देऊन तिला गाय म्हटलें. इतकेंही करून न थांबतां त्या मांगानें आपली मांडी तिला उघडी करून

दाखविली आणि 'नग्न होऊन या माझ्या मांडीवर येऊन बैस,' अशी निर्लज्जपणें आज्ञा केली. सभेंत जमलेल्या ज्ञानवृद्ध-तपोवृद्धांना सुद्धां या त्याच्या बेशरम हुकुमाचा संताप आल्याखेरीज राहिला नाहीं. मग त्या बिचाऱ्या द्रौपदीचें काय झालें असेल ? आपल्या झालेल्या अपमानाचें आपल्याला व आपल्या पतींना केव्हांही विस्मरण होऊं नये म्हणून त्या वीरपत्नीनें आपले केंस पुढें १३ वर्षेपर्यंत मोकळेच्या मोकळे ठेवून दिले होते. तिचे सर्वच पति शूर होते. पण तिला भीमसेनाविषयीं सर्वांपेक्षां अधिक विश्वास वाटत होता. खडतर वनवास भोगून अज्ञातवासाचें उरलेलें वर्ष संपताच तिनें आपले मोकळे केंस आपल्या हातात घेऊन भीमसेनापुढें धरले आणि म्हणाली, "पहा—या केंसाकडे पहा. ज्या या केंसावर मोठमोठ्या तपस्व्यांकडून आपल्या तपोबलानें पूनित केलेल्या अमृततुल्य जलाची सततधार धरली जावी, तेच हे माझे केंस या तेरा वर्षांत आपल्या कट्या दुस्मानांबद्दलचा आपला तीव्र जळजळाट कायम रहावा व त्यांचें मला व आपणाला क्षणमात्रही विस्मरण पडूं नये म्हणून मी कधीं नुसते विंचरले सुद्धां नाहींत. आपल्या शत्रूचा सूड आपण उगविणार ना ?" भीमसेनानेंही उत्तर दिलें कीं, "धर्मराज आडवा आला नसता तर त्या चांडाळ दुर्योधनाची ती उघडी मांडी मी माझ्या वज्रप्राय मुष्टिप्रहारानें तेथल्या तेथेंच फोडून टाकली असती. तुझ्या डोक्यावर ते केंस मोकळे आहेत, याची जाणीव तुला स्वतःला नसेल इतकी तीव्र ती मला आहे. ज्या नराधम दुःशासनान दुर्योधनाच्या आज्ञेवरून तुला नग्न करण्याकरितां तुझ्या निरीला हात घातला, त्याच्या त्या काळ्याकभिन्न काळजाच्या रक्तानें माखलेल्या हातानेंच मी तुझ्या मोकळ्या केंसांची वेणी घालीन, या माझ्या प्रतिज्ञेचें मला विस्मरण पडलें आहे, असें समजूं नकोस. आपल्या काळजाला दुःशासनानें केलेली जखम तो विसरला असेल पण त्या नराधमाचें काळीज बाहेर खेंचून काढल्याशिवाय मी रहाणार नाहीं." त्यानें आपली प्रतिज्ञा पुरी केली वगैरे हकीकत आपणा सर्वांस माहीतच आहे.

मी इथें मुख्यत्वेंकरून विद्यार्थ्यांकरितां आलों आहें. परकीयांच्या गुलामगिरींत भूषण मानावयास शिकविणारीं हीं शाळा कॉलेजें म्हणजे विद्यालयें नसून गुलामखानेच आहेत असें म्हणण्यास मला बिलकुल दिक्कत वाटत नाहीं. अशा या शिक्षण-संस्थांत शिक्षण घेऊन बाहेर पडल्यावर परदास्य पत्करण्याशिवाय आपल्या पोटाची खळगी भरण्यास दुसरें कोणतेंही साधन नाहीं, असेंच बहुतेकांना आढळून येत असतें. तेव्हां या शिक्षणसंस्थांचा उपयोग काय ? जें शिक्षण घेतल्यामुळें कोट्यावधि गुलामांच्या मालिकेंत आणखी एक गुलाम गुंफला जातो, त्याला काय शिक्षण म्हणावयाचें ?

स्वातंत्र्य हेंच ध्येय यापुढें प्रत्येकानें आपल्यापुढें ठेवलें पाहिजे. विद्यार्थ्यांना माझें असें अगदीं कळकळीचें सांगणें आहे कीं तेच या राष्ट्राचे खरे आधारस्तंभ आहेत. आपल्या दीनवाण्या देशाच्या हांकेबरोबर जे त्याला मदत करण्यासाठीं धांवून जात नाहींत, त्यांना काय नांव द्यावें हेंच मला समजत नाहीं. सरकारनें सुरू केलेलीं व त्याचा आश्रय घेत असलेलीं सर्व शाळाकॉलेजे ओस पाडून अलम दुनियेला जाहीर करा की हिंदुस्थानची तरुण पिढी मेलेली नाहीं. ती जिवंत आहे. देशाचें स्वातंत्र्य मिळविण्यासाठीं जेथें लक्षावधि किंवा कोट्यावधि लोकांचे बळी द्यावे लागतात, तेथें नुसत्या शिक्षणावर पाणी सोडण्यास सुद्धां तुम्ही तयार होणार नाहीं काय ? राष्ट्राच्या इभ्रतीपेक्षां तुम्हाला आपला स्वार्थ अधिक मोलाचा वाटतो काय ? मला पुष्कळांकडून असा प्रश्न विचारण्यांत येतो कीं आमच्या मुलांना तुम्ही शाळा कॉलेजें सोडण्यास सांगतां व आम्हाला कोर्टांवर बहिष्कार घाला म्हणून उपदेश करितां. पण आम्ही आपल्या सांगण्याप्रमाणें वागलों तर आमच्या पोटापाण्याची व्यवस्था लावण्याची तुम्ही हमी घेता का ? किती मुर्दाडपणाचा सवाल आहे हा ? आम्ही जर तुमच्या पोटापाण्याची जिम्मेदारी पत्करली असती तर तुमच्यापुढें येऊन मला रक्त आटविण्याचें कांहींच प्रयोजन नव्हतें. आपण आपण होऊनच माझ्या घरीं आपलीं आसनें ठोकलीं असतींत. देशासाठी ज्याला कार्य करावयाचें आहे त्याला व्यक्तीचें हित साधतां येणेंच शक्य नाहीं. देशाचें हित तेंच आपलें हित अशीच त्याची भावना असली पाहिजे. तेव्हां आपलें व्यक्तिगत कायमचें नुकसान होणार ही खात्री ठेवूनच निव्वळ देशाच्या हांकेला ओ देण्यासाठीं मर्दासारखे पुढें येऊन आपलीं नांवें या N. C. O. लिस्टमध्यें नोदवा. देशासाठीं प्राण देण्यास सुद्धां आपण तयार आहोत अशा बढाया मारणारांनीं देशासाठीं एवढी साधी गोष्टही करावयास तयार होऊं नये, याचें आश्चर्य वाटतें. मला खादीसंबंधानेंही विवरण करावयाचें होतें. पण मला दुसरीकडे व्याख्यानास जावयाचें असल्यामुळें तें काम पुढील व्याख्यानापर्यंत तहकूब करणें भाग पडत आहे. इतका वेळ माझें भाषण आपण शांत चित्तानें ऐकून घेतलेंत याबद्दल आपले आभार मानून व परमेश्वर आपल्याला देशासाठीं एवढा स्वार्थत्याग करण्याची बुद्धि देवो, अशी त्याची प्रार्थना करून मी आपली रजा घेतों.”

# प्रकरण १३ वें.

व्याख्यान ऐकत असतां श्रोतृवर्ग अगदीं तल्लीन होऊन गेला होता. जिवंत व जातिवंत तरुणांचें रक्त धमन्यांतून सळसळूं लागलें. हा राष्ट्रीय अपमानाचा डाग आपण आपल्या स्वार्थत्यागानें धुवून काढलाच पाहिजे, अशी प्रत्येकाची मनोदेवता ग्वाही देऊं लागली. फक्त आपण सध्यां घेत असलेल्या शिक्षणाच्या संस्थेवर बहिष्कार घालावयाचा, एवढ्या साध्या स्वार्थत्यागालाही जर आपण तयार झालों नाहीं तर आपली देशभक्ति तरी कसली ? जेथें आपल्या देशाच्या मंगलाकरितां आपल्या पूर्वजांनीं स्वातंत्र्यासाठीं पेटलेल्या रणयज्ञात आपल्या आहुति दिल्या त्याच ठिकाणचे आम्ही त्यांचे वंशज अशा आणीबाणीच्या प्रसंगीं षंढाप्रमाणें मूग गिळून स्वस्थ बसणार काय ? असे विचार सर्वांच्या डोक्यांत एकसमयावच्छेदेंकरून घोळूं लागले. आपण या वेळीं आपलें कर्तव्य बजावलेंच पाहिजे, असा कृष्णाच्या मनाचा अगदीं ठाम निश्चय झाला. आजपर्यंत ज्यांनीं आपल्याला पोसलें त्यांच्या संमतीशिवाय ही गोष्ट आपण करणे उचित आहे किंवा नाहीं, याचा त्यानें विचार केला नाहीं. त्याचा तर निश्चय झालाच होता. पण आपल्या मित्राचें या बाबतींत काय मत आहे, हें अजमावून पहाण्याची त्याला सहाजिकच बुद्धि झाली.

" काय ? केशव, तुझा काय विचार ठरला ? "

**के०**—" मला स्वतंत्र विचार करण्याची जरूरच वाटत नाहीं. तूं आहेस तोंपर्यंत तुझ्या पावलावर पाऊल टाकावयाचें एवढेंच माझें काम. "

**कृ०**—"असें कां म्हणतोस ? देवानें तुला स्वतंत्रपणें विचार करण्याची बुद्धि दिलेली आहे. अंधाप्रमाणें किंवा मूढाप्रमाणें दुसऱ्याचा आधार घेऊन पाऊल टाकण्याचें तुझ्यासारख्याला कारण काय ? "

**के०**—" माझ्या म्हणण्याचा भावार्थ असा कीं घरांत कोणी वडीलधारा मनुष्य असल्यानंतर कोणती गोष्ट केव्हां करावयाची अगर करावयाची किंवा नाहीं याचा विचार करण्याचें ज्याप्रमाणें लहान मुलांना कारण पडत नाहीं त्याचप्रमाणें तुझ्यासा-

रखा मित्र असल्यामुळें कोणत्या प्रसंगीं कसें वागावें, याचा स्वतंत्रपणें विचार करण्याची आवश्यकताच मला भासत नाहीं."

**कृ०**—"पण तुला स्वतःला आजचें व्याख्यान ऐकून कांहींच वाटलें नाहीं का?"

**के०**—"कांहींच वाटलें नाहीं, असें होणें शक्य तरी आहे का? राष्ट्रीय अपमानाचा बदला घेण्याचा राष्ट्रांतील सर्वमान्य पुढाऱ्यांनीं चंग बांधला असतांना आपल्यासारख्या तरुणांना त्यांना आपल्याकडून होईल तेवढी मदत केल्याशिवाय कसें बरें चैन पडेल?"

**कृ०**—"शाबास केशव! पण हेंच उत्तर तूं मला एकदम दिलें असतेंस तर मला किती आनंद झाला असता?"

**के०**—"पण मी पहिल्यानें दिलेलें उत्तर हेंच नव्हतें का?"

**कृ०**"तें कसें रे?"

**के०**—"अरे म्हणजे मी आतां बोलून दाखविलेला विचार तुझ्याही डोक्यांत चालत असला पाहिजे, ही तुझ्याविषयींची माझी खात्री. आपल्या व्यक्तिगत अपमानानें ज्याच्या अंगाचा तिळपापड उडतो, तो एकदा राष्ट्रीय भावनेची अंतःकरणांत प्रेरणा झाल्यानंतर राष्ट्राचा झालेला अगर होत असलेला अपमान स्वस्थ बसून पहाणेंच शक्य नाहीं, हें अगदीं उघड नाहीं का?"

**कृ०**—"म्हणजे माझ्याबद्दल तुझी खात्रीच होती तर?"

**के०**—"अर्थात्. नाहीं तर मी तुला तसें उत्तरच दिलें नसतें."

**कृ०**—"चल—तर मग उशीर कशाला?"

असें म्हणून ते तडक प्लॅटफॉर्मजवळ गेले, व N. C. O. लिस्टमध्यें आपल्या नांवाची नोंद केली. हिमालयाप्रमाणें स्थिर असलेल्या व व्यवहारचातुर्याच्या गड्यांना देखील त्या दोन तरुणांचें अभिनंदन केल्याखेरीज रहावेना. आपणास एखादी गोष्ट करतां येत नसली, विशेषतः ती करण्यास आपल्याला भीति वाटत असली किंवा हिंमत होत नसली तर ती दुसऱ्याला करतांना पाहून आपल्याला कौतुक वाटतेंच. टाळ्यांचा कडकडाट झाला. मालतीला त्या दोघा तरुणांची ती धडाडी पाहून आनंद झाला. उद्यां आपली अन्नान्नदशा होईल, ही जाणीव असूनसुद्धां यांचीं मनें कचरलीं

नाहींत, याचें तिला कौतुक वाटलें. त्यांच्या मनाच्या हलकेपणाविषयीं आपण घेतलेल्या संशयाची तिची तिलाच लाज वाटूं लागली. ती अनिमिष नेत्रांनीं त्यांच्याकडे पाहूं लागली. वसंताला तें बरें वाटेना.

**वसंत**—"मालतीताई, चला आतां. इथें आतां अगदीं कंटाळवाणें वाटूं लागलें."

**मालती**—"होय. पण त्या लिस्टमध्यें मला माझें नांव घालावयाचें आहे."

**वसंत**—"काय ? तुम्हालाही त्या लिस्टमध्यें नांव घालण्याची अवदसा आठवली का ? आश्चर्य आहे बुवा !"

**मालती**—"त्यांत काय एवढें आश्चर्य वाटलें तुम्हाला वसंतराव ? आपल्या राष्ट्राच्या नेत्या पुरुषांनीं आपणास आपल्या या वेळच्या कर्तव्याची जाणीव करून दिली असतां त्यांच्या हांकेला ओ देणें आपलें कर्तव्यच नाहीं का ?"

**वसंत**—"असें माझें मुळींच म्हणणें नाहीं. पण प्रश्न एवढाच आहे कीं राष्ट्राच्या हांकेला विद्यार्थ्यांनींच ओ कशाला दिली पाहिजे ? विद्यार्थी दशेत आपणाला या नसत्या भानगडी करावयाच्या काय ?"

**मा०**—"हा प्रश्न वसंतराव, तुम्ही करावा, हें आश्चर्य आहे."

**वसंत**—"तुमच्या बोलण्याचा रोंख आला माझ्या लक्षांत. पण म्हणूनच विलायतेस जाऊन आपला अभ्याक्रम पुरा करून आल्याखेरीज विवाहाच्या भानगडींत पडण्यास मी तयार नाहीं म्हणून मी आप्पासाहेबांस सांगितलें हें तुम्ही विसरतां."

**मा०**—"मला कांहीं हा तुमचा युक्तिवाद पटत नाहीं. विद्यार्थ्यांनी विद्यार्थीदशेंत काय करावें व काय करूं नये हें विद्यार्थ्यांइतकेंच किंबहुना त्यांच्यापेक्षां अधिक राष्ट्राच्या पुढाऱ्यांना कळत असलें पाहिजे, असा मला विश्वास आहे; आणि ज्याअर्थी ते आपल्याला सध्यांच्या परिस्थितींत आपला शिक्षणक्रम तहकूब करण्यास सांगत आहेत, त्याअर्थी आपण तो केलाच पाहिजे, असें माझें मत आहे."

**वसंत**—"मला नाहीं तसें वाटत. लोकांच्या मुलांचें नुकसान झालें तर त्यांत या लेकांचें काय बिघडतें ?"

**मा०**—" म्हणजे तुमचें असें म्हणणें कीं आम्हाला बहिष्कार घालावयास उपदेश करणाऱ्या या पुढाऱ्यांनीं आपल्या मुलांना अजून सरकारी शिक्षणसंस्थांतून बाहेर काढलें नसेल ? "

**वसंत**—" होय. असाच माझा समज आहे. "

**मालती**—" तो समज खरा असेल किंवा खोटाही असेल. तें आपल्याला नक्की समजण्याला कांहींच मार्ग नाहीं. पण इतकें मात्र खरें कीं मी यांच्या सांगण्याप्रमाणें कॉलेज सोडायला तयार आहें. इतकेंच नव्हे तर यांचीं मुलें तुमच्या म्हणण्याप्रमाणें अजूनही सरकारी शिक्षणसंस्थांतून शिक्षण घेत असलीं तरीही मला तयार झालेंच पाहिजे. अमुक आपलें कर्तव्य बजावीत नाहीं मग आपण तरी तें कशाला बजावा, ही कर्तव्यचुकार माणसाची सबब असते. "

**वसंत**—" मी तुम्हाला असा अविचार करूं देणार नाही. "

**मालती**—" हा अविचार आहे काय ?

**वसंत**—" होय. हें कर्तव्यपालन नसून हा अविचारच आहे. तुम्ही तो करूं नये, अशी माझी सूचना आहे-अशी माझी इच्छा आहे. "

**मालती**—" राष्ट्राच्या इच्छेपुढें मला व्यक्तीच्या इच्छेची मग ती व्यक्ती कोणीही असो-बिलकूल किंमत वाटत नाहीं. "

वसंतराव आणखी कांहीं तरी बोलण्याच्या विचारांत होते. पण मालती तें ऐकण्यास न थांबतां उठली व तडक जाऊन तिनें आपलें नांव N. C. O. लिस्टमध्यें दाखल केलें. त्यावेळीं सर्व लोकांनीं व विशेषतः प्लॅटफॉर्मवर विराजमान झालेल्या थोर लोकांनीं इतक्या जोरानें टाळ्यांचा गजर केला कीं त्यांनीं जर आपले हात लवकरच थांबविले नसते तर त्या आवाजाच्या लहरींच्या आघातानें हॉलच्या भिंती जमीनदोस्त झाल्या असत्या. मधली मालतीची खुर्ची रिकामी झाल्यामुळें वसंत लीलाताईशीं बोलूं लागला. इतका वेळ पर्यंत ती एक शब्दही न बोलल्यामुळे वसंताला, ही आपल्याच मताची असली पाहिजे असें वाटूं लागलें होते.

**वसंत**—" पहा लीलाताई, तुमच्या मैत्रिणीचे प्रताप ! "

**लीला०**—" प्रताप खरोखरच पाहाण्यासारखा आणि वाखाणण्यासारखा आहे!" वसंताला वाटलें कीं आपल्याप्रमाणेंच तीही उपरोधिकच बोलत आहे–

**वसंत**—" म्हणजे हीं माणसें एकदम अशीं हुरळून कशी जातात मला कळत नाहीं. अरे, इतके दिवस तुम्ही त्याच शाळांकॉलेजांतून शिक्षण घेत होतां ना? आणि आजच तुम्हाला त्याची अगदीं शिसारी येण्यासारखें काय झालें?"

**लीला०**—" छान प्रश्न केलात! रणशिंगाचा युद्धप्रवर्तक ध्वनि ऐकून जातिवंत मर्द लढाईच्या मैदानावर दाखल होण्यास सज्ज झालेले पाहून, 'अरे, आतांपर्यंत तर हे बेटे हंसत खेळत होते, मग आतांच याच्या अंगांत हें वारें कुठून संचारलें?' असें विचारण्यापैकींच आतांचा तुमचा प्रश्न आहे."

लीलाताईसंबंधानें केलेला आपला कयास चुकला हें पाहून वसंताला ओशाळल्या-सारखें झालें. पण म्हणून तो स्वस्थ थोडाच बसणार होता? आपण त्यांची केव्हांच खात्री पटवून देऊं ही त्याची खात्री होती.

**वसंत**—" म्हणजे आतांच्या तुमच्या बोलण्यावरून हें नाहीं का सिद्ध होत कीं लढाईवर गेलेला मनुष्य लढाईत मरतो, त्याप्रमाणेंच शाळा कॉलेजावर बहिष्कार घातल्यामुळें विद्यार्थ्यांचीही मेल्यासारखीच स्थिति होणार आहे?"

**लीला०**—" मग हें त्या शाळा कॉलेजें सोडणाऱ्यांना कळत नाहीं अशी तुमची समजूत आहे कीं काय? आपलें जन्माचें नुकसान होणार अशी खात्री असतांनाच ते आज बहिष्कार घालण्यास सिद्ध झाले आहेत, आणि यांतच त्यांच्या त्यागाचें रहस्य आहे. नाहीं तर आपण केलेल्या त्यागाच्या मानाने तितकाच किंवा त्याहून अधिक मोलाचा मोबदला मिळण्याचा संभव असतांना त्यागाचें लौकिकाकरितां ढोंग माजविणारे कोटयवधि लोक पृथ्वीच्या पाठीवर 'आपण हयात आहोंत' अशी पाटी कपाळावर लावून जिवंत आहेतच."

**वसंत**—" बोलतांना या गोष्टी फार उदात्त व चित्ताकर्षक वाटतात. पण त्यांचे प्रत्यक्ष परिणाम भोगण्याची पाळी आली म्हणजे मात्र डोळे पांढरे होण्याची वेळ येते"

**लीला**—" युद्धस्य कथा रम्या, या उक्तीनुरूप तुमचें म्हणणें यथार्थ आहे. घरबसल्या लोकांना लढाईवरील हकिकतींचें फक्त कौतुकच वाटत असतें. त्यांच्या

तोंडीं तुम्ही वापरीत अहांत ही भाषा शोभते. पण तुमच्या हें लक्षांत येत नाहीं कीं युद्धाचें वर्णन वाचून किंवा ऐकून ऐकणाराच्या चित्ताला नुसतें समाधानच लाभतें. पण प्रत्यक्षपणें त्यांत भाग घेणाऱ्या मर्दांना देहभान विसरून गेल्यामुळें मोक्षाचा लाभ होत असतो. ''

**वसंत**—'' असला हा कपाळमोक्ष करून घेण्याची माझी इच्छा नाहीं. मला जगांत जिवंत रहावयाचें आहे आणि म्हणून असला हा आततायीपणा करण्यास मी केव्हांही प्रवृत्त होणार नाहीं. ''

**लीला०**—'' स्वातंत्र्ययुद्धासाठीं नौबत झडत असतांना, मला अजून कांहीं दिवस जगण्याची इच्छा आहे तेव्हां ही नौबत ऐकून युद्धाचा संचार माझ्या अंतःकरणांत होऊं नये, अशी खबरदारी घेणें मला भाग आहे, असें म्हणणाऱ्या शेंदाड शिपायांनीं एक तर आपल्याला स्वातंत्र्याची चाड नाहीं असें, किंवा समरांगणावर जाऊन गर्दन पुढें करण्याची आपल्या भेकड वृत्तीमुळें आपल्याला हिमत होत नाहीं, असें तरी प्रांजलपणें कबूल केले पाहिजे. ''

**वसंत**—'' वारे समरांगण ! वारे युद्ध ! लीलाताई, हें समरांगण नसून हा मारवाडी विद्यालयाचा हॉल आहे आणि या लोकांनीं चालविलेलें हें युद्ध नसून शिक्षणावर पाणी सोडून पुंड बनणाऱ्यांच्या झोटिंगपाऱ्छाईचा हा ओनामा आहे ! ''

**लीला०**—'' मारवाडी विद्यालयाच्या हॉलमध्येंही ज्यांना पुढें सरण्याची हिंमत होत नाहीं, त्यांनीं समरांगण किंवा युद्ध हे शब्द उच्चारणें म्हणजे सुद्धां जगाची फसवणूक करण्यासारखें आहे. पण जाऊं द्या. तुमच्यासारख्यांपुढें कितीही उरस्फोड केली तरी त्याचा इष्ट परिणाम थोडाच व्हावयाचा आहे ? ''

असें म्हणून लीलाताई उठली व तिनें जाऊन त्या लिस्टवर आपली सही केली. लोकांनीं तिचेंही अभिनंदन केलें. आणखी कांहीं विद्यार्थ्यांनीं आपलीं नांवें नोंदविल्यावर सर्वजण आपापल्या घरीं निघून गेले.

घरीं परत आल्याबरोबर वसंतानें आप्पासाहेबांस घडलेली सारी हकीकत सांगितली.

**वसंत**—'' आप्पा, आपल्या मालतीताईनीं हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळवून देण्यासाठीं सुरू झालेल्या स्वातंत्र्ययुद्धांत सैनिक म्हणून आपलेंही नांव दाखल केले बरें कां ? ''

**आप्पा०**—" म्हणजे ? मी नाहीं याचा अर्थ समजलों. "

**मालती**—" याचा सरळ अर्थ असा कीं म० गांधी यांच्या सांगण्याप्रमाणें मी आजपासून कॉलेजांत जावयाचें नाहीं असें ठरविलें आहे. वसंतरावांनीं सांगितलें नसतें तरी मी आतां तुम्हाला तें सांगणारच होतें. असा निश्चय करण्यापूर्वी मी तुमची परवानगी घ्यावयास पाहिजे होती. परंतु परवानगी विचारण्याचा तो नुसता फार्सच झाला असता, म्हणून त्या भानगडींत मी पडलें नाहीं. कारण काय करावयाचें त्याबद्दल माझ्या मनाचा ठाम निश्चय झाला होता; आणि तुमचा अभिप्राय जरी माझ्या विरूद्ध पडला असता तरीही मी माझाच निश्चय अंमलांत आणला असता. "

आप्पासाहेब राजकारणाच्या भानगडींत कधींच पडत नसत. कोणाच्याही कोठल्याही उपद्यापांत पडावयाचें नाही असा त्यांचा खाक्या असल्यामुळें ते घरच्या माणसांव्यतिरिक्त कोणाशीं गप्पागोष्टीही करीत नसत. म० गांधी यांनीं त्या परिस्थितीत काढलेली तोड त्यांच्या वाचनांत आली नव्हती असें नाहीं, पण ती इतक्या लवकर अंमलांत आणली जाईल, अशी मात्र त्याची कल्पना नव्हती. इतकीं वर्षे मोठ्या हौसेनें शिक्षण घेत असलेल्या आपल्या आवडत्या व एकुलत्या एक मुलीनें आपला शिक्षणक्रम एकदम तहकूब करावा हें त्यांना बरें वाटेना. विशेषतः वसंताच्या खवचट बोलण्यावरून हिचें हें करणें त्याला पसत नाहीं हें कळून चुकल्यामुळें तर तें त्यांना मुळीच रुचेना.

**आप्पा०**—" ह्या भलत्याच भानगडींत तुम्हा पोरींना पडण्याचें कारण काय ? मोठमोठे मुत्सद्दी रात्रंदिवस डोकेंफोड करीत बसले असतांनासुद्धां जर त्यांना स्वराज्याच्या बाबतींत एक पाऊल देखील पुढें सरकतां येत नाहीं तर तुम्हा पोरासोरांच्या हातून त्या बाबतींत काय होणार ? "

**मालती०**—" आमच्या हातून प्रत्यक्ष स्वराज्य मिळविणें शक्य नसलें तरी निदान आपल्या देशाच्या स्वातंत्र्यार्थ अहोरात्र जिवापाड मेहेनत करणाऱ्या पुढारीवर्गाच्या सांगण्याप्रमाणें वागणें हें यासारख्या प्रसंगीं आम्हा पोरासोरांचें कर्तव्यच नाहीं का ?"

**वसंत**—" पण हे असले दे. भ. जर आपल्याला वाटेल तें करावयास सांगूं लागले तर तें निमूटपणें ऐकून घेऊन तें प्रत्यक्ष आचरण्यालाही आपण सुरुवात करावयाची कीं काय ? उद्यां हे लेकाचे आम्हाला नग्न होऊन रस्त्यांत फिरण्याचा किंवा

सर्वांनीं एकदम विहिरींत उडी घेऊन जीव देण्याचा उपदेश न करोत, म्हणजे मिळविलें ! हे आपले सगळे डिग्र्या घेऊन बसले आहेत. आतां इतरांना डिग्र्या घेऊं नका म्हणायला यांचें काय बिघडतें ? आपण तर बुवा प्रत्यक्ष ब्रह्मदेव येऊन सांगूं लागला तरी आपला अभ्यास कांहीं सोडणार नाहीं. विद्यार्थ्यांनीं शाळा कॉलेजे ओस पाडून जर स्वराज्य मिळवितां येत असतें तर जगांत कोणताच देश परतंत्र राहिला नसता !"

**मालती—**"ज्यांना स्वतः कांहीं न करतां नुसती तोंडाची वाफ दवडायची असते, त्यांना काय कांहीं बोललें तरी त्यांचें त्यांना शोभून जातें."

मालती आज जराशी अधिक धीटाईनें बोलत होती, याचें आप्पासाहेब आणि वसंत या दोघांनाही नवल वाटत होतें. आजचा प्रसंगच तसा चमत्कारिक होता. नेहेमीं घुम्या म्हणून समजल्या जाणाऱ्या व्यक्तीही कांहीं कांहीं प्रसंगीं मनमुराद बोलत असतातच.

**वसंत—**" म्हणजे ? नुसती तोंडाची वाफ दवडणारांच्या वर्गांतीलच मीही एक आहे, असें तुमचें म्हणणें आहे तर ?"

**मालती—**" होय. असेंच माझें म्हणणें आहे. उद्यां कोणी स्वातंत्र्याकरितां बंडाचें निशाण उभारलें तरीही तुम्हाला त्यांत प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष कोणत्याच रीतीनें भाग दाखवायाचा नसल्यामुळें तुमचें हेंच argument पुढें येईल कीं बंडानें जर स्वराज्य मिळतें तर पृथ्वीच्या पाठीवर एकही देश परतंत्र राहिला नसता !"

**वसंत—**" म्हणजे देशाच्या स्वातंत्र्यासाठीं बंडाचें निशाण उभारणें आणि विद्यार्थ्यांनीं आपल्या पुढाऱ्यांच्या उपदेशावरून शाळाकॉलेजें ओस पाडणें या दोन्ही गोष्टी सारख्याच तोलाच्या आहेत, असें तुम्हाला वाटतें ?"

**मालती—**" या दोन्ही गोष्टी सारख्या तोलाच्या नाहींत हें कळण्याइतकी अक्कल देवानें मलाही दिलेली आहे. ज्यांना देशाकरितां कांहींही करावयाचें नाहीं त्यांच्याबद्दल मी बोललें देशाकरितां आपण कांहीं तरी करावयास तयार आहोंत, हें आपण पुढाऱ्यांना पटवून देणें हें आपलें कर्तव्य आहे असें मला वाटतें; आणि सभ्यांच्या परिस्थितींत ते आमच्याकडून ज्या गोष्टीची अपेक्षा करितात तेवढी करून दाखविणें आपल्याला भाग आहे."

**वसंत**—" पण यावर माझें असें म्हणणें आहे कीं तुम्ही सध्यां ज्या गोष्टीला देशकार्य समजत आहां त्यांत देशकार्य तर कांहीं नाहींच पण आपलें आणि आपल्या समाजाचें अपरिमित नुकसान मात्र आहे. आपलें शिक्षण पुरें करून मग आपल्याला वाटल्यास खुशाल देशकार्य करीत रहावें. मी मुळीं देशकार्याच्याच विरुद्ध आहें हा तुमचा झालेला समज अजिबात खोटा आहे."

**मालती**—" सध्यांच्या शिक्षणसंस्थांतून शिक्षण घेऊन बाहेर पडणारांना देशकार्य करण्याची बुद्धीच होत नाहीं, असा प्रत्यक्ष अनुभव असल्यामुळेंच त्यांनीं आपणाला त्यांवर बहिष्कार पुकारण्याचा उपदेश केला आहे."

**वसंत**—" या त्यांच्या उपदेशात कांहींच तथ्यांश नाहीं. लोकमान्यांसारखे धुरंधर पुढारी याच शिक्षणसंस्थांतून शिक्षण घेत होते ना ? आणि आजच्या या चळवळीचे जनक म. गांधी तरी राष्ट्रीय संस्थांतून शिकत होते कीं काय ?"

**मालती**—" परंतु लोकमान्यांच्या पिढींतील तेवढाच एक पुरुष सरकारशीं धीरोदात्तपणें झगडूं शकला. त्यांच्याबरोबरीचे बाकीचे बहुतेक लोक मायबाप सरकारच्याच चरणारविंदीं विलीन झाले. म्हणजे लोकमान्य अलौकिक लोकनायक झाले याचें श्रेय कांहीं ते शिक्षण घेत असलेल्या संस्थांकडे जात नाहीं. शिवाय खुद्द लोकमान्यांनींही १९०८ सालच्या चळवळींत राष्ट्रीय शाळा स्थापन करण्याची आपल्या कार्यक्रमापैकीं एक बाब ठेवली होती, ही गोष्ट आपल्या लक्षांत नाहीं वाटतें ?"

**वसंत**—" म्हणजे त्यांत एवढें तरी ठरतें कीं या शाळा कॉलेजांतून शिक्षण घेऊन बाहेर पडणारा कोणताही तरुण देशभक्त होणेंच शक्य नाहीं असें नाहीं. तें ज्याच्या त्याच्या उपजत देहस्वभावावरच अवलंबून रहाणार."

**मालती**—" होय. हें तर खरेंच. पण सामान्यतः असाही निष्कर्ष काढण्यास हरकत नाहीं कीं एखादा अपवादात्मक तरुण सोडला तर बाकीचे सारे आपल्या पोटाची खळगी भरण्यासाठीं साहेबाच्या बुटाचाच आश्रय करणारे मिळावयाचे."

**वसंत**—" आपल्या स्वतःच्या व मनाच्या खंबीरतेचा ज्यांना विश्वास वाटत नसेल, त्यांनीं खुशाल आपलें मन मारलें जाईल या भीतीनें आपल्या शिक्षण संस्थांतून बाहेर पडावें. आम्हाला आमच्या बुद्धीच्या स्थिरतेबद्दल पूर्ण विश्वास आहे. आमचीं मनें मारलीं जाणें शक्य नाहीं असा आम्हाला ठाम भरंवसा आहे."

**मालती**—"सगळ्यांचींच अंतःकरणें व सर्वांचीच बुद्धि सारखी स्थिर कशी असणार ? शिलोच्चये मूर्च्छति मारुतस्य । पण मानवांचें बिचाऱ्यांचें असें कुठें आहे ? प्रसंगविशेषीं त्यांच्या हृदयांतील पडदे हालतात, त्यांचीं मनें बिथरतात, त्यांची बुद्धि स्वार्थत्यागाच्या उच्च वातावरणांत विहार करूं लागते सागरासारख्या अगाध आणि मेरु-मंदारासारख्या अचल बुद्धीच्या Super human कोटींतील प्राण्यांना हा नियम थोडाच लागूं करून चालणार आहे ? वसंतराव तुम्हाला स्वतःला कांहीं करावयाचें नाहीं तर खुशाल करूं नका. मला तुम्हाला त्याबद्दल कांहींच म्हणण्याची इच्छा नाहीं. पण मला मी टाकलेलें पाऊल मागें घ्यावे म्हणून आपल्या तीव्र बुद्धीचा निष्कारण दुरुप-योग करूं नका. त्यापासून कांहीं लाभ होणार नाहीं. माझा निश्चय अढळ आहे आणि तो कोणालाही पटला नाहीं किंवा रुचला नाहीं तरी तो केव्हांही पालटणें शक्य नाहीं," असें म्हणून मालती उठली. पानें मांडून तयार असल्याची आंतून वर्दी आल्यामुळें वसंत व आप्पासाहेबही उठले.

---

# प्रकरण १४ वें.

व्याख्यात्यांना दुसरीकडे व्याख्यानासाठीं जावयाचें होतें, हें खरें होतें. पण एकाएकीं त्यांना बरें वाटेनासें झाल्यामुळें त्यांनीं दुसऱ्या दिवशीं तिकडे जाण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें तेथील मंडळीस कळविलें. व्याख्याते सरदारगृहांत उतरले आहेत, हें कृष्णा व केशव यांस माहीत होतें. तेव्हां आतां आपण पुढें काय करावें याची सल्ला घेण्याकरितां ते तिकडेच गेले. पहिल्याच धडाक्याला हे दोघे पुढें सरसावले असल्या-मुळें सदर व्याख्यात्यांच्या ते चांगलेच स्मरणांत होते. तेव्हां त्यांनीं यांचें मनः-पूर्वक अभिनंदन केलें आणि असेच धडाडीचे तरुण आज राष्ट्राला हवे आहेत असे म्हणून त्यांचा गौरव केला.

**कृ०**—" आम्हा दोघांनाही प्रत्यक्ष कार्य करण्याची फार हौस आहे. तेव्हां आपल्या ठरलेल्या पुढील कार्यक्रमांत आमच्या हातून जें कांहीं अल्पस्वल्प काम होण्यासारखें असेल तें आम्हास आपण कृपा करून सांगावें. आम्ही तें चोख बजावून दाखविण्यांत यत्किंचितही कसूर करणार नाहीं."

**व्याख्या०**—" आम्ही मनांतून पुष्कळच कार्यक्रम ठरविले आहेत. त्यांना मूर्त-स्वरूप येण्याचाही थोडाफार संभव आहे, असें एकंदर परिस्थिति लक्षांत घेतां वाटतें. मुंबईंतच आम्ही शक्य तितक्या लवकर एक राष्ट्रीय शाळा व एक राष्ट्रीय कॉलेज सुरू करणार आहोंत. ज्यांना आपला अभ्यासक्रम सरकारी अगर निमसरकारी संस्थांतून नाहीं तर निदान राष्ट्रीय संस्थांतून तरी पुरा करण्याची इच्छा असेल, त्यांच्याकरितां ही व्यवस्था आम्ही करणार आहोंत."

**कृष्णा**—" मला तर त्या राष्ट्रीय कॉलेजांत दाखल होतां येणारच नाहीं. कारण मी ज्यांच्याकडे वार लावले आहेत—"

**व्याख्या०**—" काय तुम्ही वारांवर जेवीत असतां ?"

**कृष्णा**—" होय. आतांपर्यंतचें माझें सर्व शिक्षण मी माधुकरीवर व वारांवरच केलें आहे. आतां मला तीही आशा नाहीं. कारण मी कॉलेज सोडल्याचें कळतांच माझ्यावर त्यांच्याकडून उडाणटप्पूचा आरोप लादण्यांत येईल, हें मी जाणून आहें. पण मला त्याची फिकीर वाटत नाहीं. मी प्रत्यक्ष कांहीं तरी कार्य करण्यांतच माझें यापुढचें आयुष्य वेंचीन."

**व्याख्या०**—" या तुमच्या स्नेह्यांचाही असाच ठाम निश्चय झाला आहे का ?"

**केशव**—" माझा विचार याच्या बाहेर नाहीं. माझे पालक कदाचित् मला राष्ट्रीय कॉलेजांतही पाठविण्य स तयार होतील. पण मलाही प्रत्यक्ष कांहीं तरी काम करण्याची ईर्ष्या असल्यामुळें आम्ही दोघेही एकाच ठिकाणीं काम करूं. "

**व्याख्या०**—" ठीक आहे. ही चळवळ सुरू करण्यांत हा कांहीं आमचा प्रधान हेतु नाहीं. सरकारी संस्थांतून आपला शिक्षणक्रम सुरू ठेवणारांपेक्षां राष्ट्रीय शिक्षण संस्थांतून तो पुरा करणारे हे दगडापेक्षां वीट मऊ याच प्रमाणांत देशाच्या उपयोगी पडणारे आहेत. म्हणजे असें करण्यांत त्या बिचाऱ्यांचा मुळींच स्वार्थत्याग नाहीं, असें नाहीं. पण आम्हाला सध्यां मुख्यतः सुशिक्षित तरुण पाहिजे आहेत ते थोड-क्यांत सांगावयाचें म्हणजे फकिरी बाण्याचे हवे आहेत. खेडोपाडीं फिरून तेथील अशिक्षित समाजांत लोकजागृति करणें, हा आमच्या या सुरू केलेल्या चळ-वळीचा आत्मा आहे. सुशिक्षित समाजाला कार्याची जाणीव झाली तर ती हवीच आहे. पण कामकरी, मजूर व शेतकरी वर्ग यांच्यांत मुख्यतः जागृति होण्यास हवी आहे. ती झाली म्हणजे त्याचा प्रत्यक्ष परिणाम आपल्याला लवकरच अनुभवावयास सांपडणार आहे. कारण आपण आपल्या शिक्षणाची अगर बुद्धिमत्तेचा कितीही घमेंड मारीत असलों तरी आपल्या जीविताची लगाम सर्वस्वीं त्यांच्याच हातांत आहे, हें आप-ल्याला विसरून चालणार नाहीं. शिवाय शिक्षित समाजाच्या व आपण ज्यांना अशि-क्षित समजतो त्या शेतकरी वर्गाच्या लोकसंख्येकडेही दुर्लक्ष करून भागणार नाहीं. "

**कृ०**—" आम्ही आपल्या सामर्थ्याचा शक्य तो विनियोग राष्ट्राकडे करावयाचा अशा निश्चयानेंच कॉलेजला रामराम ठोकला आहे, हें मघाशीं मी आपणांस सांगित-लेंच. आपण आम्हाला कोठेंही जाण्यास व कोणतेंही काम करण्यास सांगावें. आम्ही तें आपल्या मगदुराप्रमाणें करण्यांत काडीमात्रही हयगय करणार नाहीं. "

**व्या०**—" साधारण या ८–१५ दिवसांत आम्हाला ज्या मानानें अनुयायी मिळतील, त्यामानानें आम्ही तो कार्यक्रम निश्चितपणें आंखणार आहोंत. "

**केशवः**—" मग सध्यां आम्हाला कांहींच करतां येण्यासारखें नाहीं का ?"

**व्या०**—" नसायला काय झालें ? तुम्हाला आपण होऊन कामाला लागण्याला काय हरकत आहे ? कॉलेजांतील आपल्या इतर मित्राना देशाची सर्व परिस्थिति समजावून देऊन त्यांना बहिष्कारवादी बनविण्याच्या उद्योगाला लागा. म्हणजे

आम्हालाही त्याचा थोडाफार उपयोग झाला तर होईल. तुम्हाला हें बऱ्याच प्रमाणांत साधलें नाहीं तरी त्यामुळें निरुत्साह होऊं नका. आपल्याला आपलें कर्तव्य करावयाचें. त्याची इतरांना जाणीव करून देत असतां, त्यांनीं तिकडे लक्ष दिलें नाहीं तर तो कांहीं आपला दोष नाहीं. कार्यसिद्धीची फारशी आशा नसली तरी आपल्याला प्रयत्न करणें तर भागच आहे कीं नाहीं ? आपल्या प्रयत्नांचा काहीं उपयोग होणार नाहीं अशी मनाची खात्री बाळगूनच आपण उद्योगाला लागावयाचें म्हणजे ते निष्फळ झाल्याचें आपणाला दुःख वाटत नाहीं. कारण आपल्या मनाची तशी तयारीच असते. बरें, ते सफल झाले तर ठीकच झालें."

**कृ०**—" ठीक आहे. ८–१० दिवसांनीं आम्ही पुनः आपल्या भेटीला येऊं " असें म्हणून ते दोघेही त्या सद्गृहस्थांना नमस्कार करून घरीं जाण्यासाठीं परतले.

**कृष्णा**—" लोकमान्यांचें अखेरचें दर्शन आपण घेतलें आणि त्या वेळीं आपण जो निश्चय केला, तो अंमलांत आणण्याची संधि इतक्या लवकर आपल्याला लाभेल, अशी आपली कल्पनाही नव्हती, नाहीं ? "

**के०**—" खरोखरच नव्हती. पुण्यवंतांचें अंतःकरणपूर्वक घेतलेलें दर्शन कधींही फुकट जात नाहीं म्हणतात तें अगदीं खरें. बरें. पण तें जाऊं दे. मालतीताईना कॉलेज सोडण्याची ही सद्बुद्धि कशी काय झाली ? "

**कृ०**—" मला सुद्धां त्यांच्याबद्दल थोडेसें आश्चर्य वाटलें. बाकी वसंतरावांना त्यांचें हें करणें मुळींच आवडलें नसेल, ही माझी खात्री आहे. मनुष्याची पारख होण्याला कांहीं त्याच्या सतत सहवासाचीच आवश्यकता आहे, असें नाहीं. मी त्यांची अगदीं पहिल्या प्रथमच परीक्षा केली होती. प्रत्येक व्यक्तीला स्वार्थाबरोबरच आपण वावरत असलेल्या समाजाचें व राष्ट्राचेंही हित साधावयाचें असतें ही कल्पनाही त्यांच्या ताठर मनाला कधीं शिवणें शक्य नाहीं ही माझी खात्री आहे. "

**के०**—" मलाही असेंच वाटतें. इतक्या बुद्धिवान माणसांना आपल्याला आपल्या राष्ट्रासाठीं कांहीं तरी केलें पाहिजे ही कल्पना सुद्धां कशी शिवत नाहीं याचेंच मला आश्चर्य वाटतें. "

**कृ०**—" यांत खरें म्हटलें तर आश्चर्य वाटण्यासारखें कांहींच नाहीं. तुला या गोष्टींचें नवल वाटतें तसें इतरही पुष्कळांना तें वाटत असेल. परमेश्वरानें माणसाला बुद्धि दिली आहे, त्याप्रमाणेंच अंतःकरण दिलेलें आहे. या लोकांच्या बुद्धीचा विकास

झालेला असतो. पण अंतःकरण त्या मानानें विकसित झालेलें नसतें. त्यांतील प्रेमाचा सांठा अल्प व मर्यादित असतो. प्रेमाचा अजिबात अभाव मात्र असत नाहीं. वाघासारख्या अतिक्रूर योनींत सुद्धां या ईश्वरी भावनेचा वास असतो. मात्र ती भावना आपल्या मादीपुरती व छाव्यांपुरतीच मर्यादित असते. यांचेंही असेंच असतें. यांच्या प्रीतीचा ओघ हे स्वतः व यांच्या भोंवतीं असणारीं याना आपलीं अशीं वाटणारीं इतर माणसें यांच्याबाहेर सहसा जाऊं शकत नाहीं. देशकार्य करण्याची बुद्धि ज्यांना होते त्यांच्या अंतःकरणांतील प्रेमाला मर्यादा नसते. तसें नसतें तर ज्या कित्येक देशबांधवांचें आपल्याला कधीं तोंडही पहाण्यास मिळालें नाहीं त्यांच्याकरितां जिवंतपणीं नरकवास भोगण्यास लोकमान्यांसारखे महात्मे तयार कसे झाले असते? म्हणूनच कोणच्याही देशांतील इतिहास पहा. स्वातंत्र्यसंस्थापना भावनाप्रधान माणसांच्या हातूनच होत असते. तेव्हां नुसत्या बुद्धिमत्तेबद्दल फाजील घमेंड बाळगणाऱ्या माणसाच्या हातून देशासाठीं कोणत्याही प्रकारचा स्वार्थत्याग होण्याची आशा कशाला पाहिजे?"

**केशव**—"तुझें लक्ष होतें कीं नाहीं कोणास ठाऊक! मालतीबाई सही करण्यास प्लॅटफॉर्मकडे जात होत्या तेव्हां ते त्यांच्याकडे कसे अगदीं मारक्या म्हशीसारखे बघत होते!"

**कृ०**—"जाऊं दे. त्या वसंतरावांशीं आपल्याला काय करावयाचें आहे? मालतीबाईनीं आपलें कर्तव्य केलें याबद्दल त्या खरोखरच अभिनंदनाला पात्र आहेत. माझा तर त्यांच्यासंबंधींचा सर्व तिरस्कार त्यांनीं त्या लिस्टवर सही केल्याबरोबर पार नाहींसा झाला. गरिबांचा अपमान करून त्यायोगें आपल्या मनाची करमणूक करून घेणारी स्त्री समाजाकरितां व राष्ट्राच्या अपमानाचा बदला घेण्याकरितां स्वार्थत्याग करूं शकते याबद्दल मला आश्चर्य वाटलें हें खरें असलें तरी त्यांच्या संबंधीं एक तऱ्हेचा आपलेपणा वाटूं लागला. युद्धावर निघालेले सैनिक पूर्वीचें आपापसांतील हाडवैर विसरून जिवाला जीव देणारे मित्र होत असतील हें मला आतां अगदीं अल्प प्रमाणानें पण पटूं लागलें."

केशव घरीं आला तों त्याचे वडील हरिपंत त्याची वाटच पहात होते. ते **Government servant** होते हें पात्रांचा परिचय करून देतांना सांगितलेंच होतें. पण त्यांत मुख्य सांगावयाचें राहिलें होतें. तें हें कीं ते नुसतेच **servant** नसून

most obedient servant होते. केशवानें Non-co-operation तत्त्वाचा अंगिकार केला हें कळल्याबरोबर त्यांच्या अंगाचा नुसता तिळपापड उडाला. हरिपंत तसें म्हटलें तर स्वभावानें कांहीं वाईट मनुष्य नव्हते. केशवावर तर त्याचें फारच प्रेम होतें. परंतु या पोरानें आतां कॉलेज सोडलें म्हणजे यानें आपल्या जन्माची माती करून घेतली या कल्पनेनें त्यांना फार वाईट वाटलें.

**हरि०**—" केशव, ही गोष्ट करतांना तूं आपला पुढचा नीट विचार केला आहेस का ? "

**केशव**—" त्यांत नीट विचार करण्यासारखें काय आहे ? आपलें कर्तव्य आपण करीत असतां विचार करण्याची जरूरी काय वाटणार ? "

**हरि०**—" उद्यां पोटाला चिमटे बसण्याची पाळी आली म्हणजे लोकांचे पाय धरणें हेंच तुझें कर्तव्य होऊन बसेल ! "

**के०**—" बाबा, स्पष्ट बोलतों याबद्दल मला क्षमा करा. पण ही आपली समजूत सपशेल चुकीची आहे. मला लोकांचे पाय धरल्याशिवाय आपल्या पोटाची खळगी भरतांच येणार नाहीं अशी का आपली कल्पना आहे ? "

**हरि०**—" होय. असल्या अविचारी वागणुकीनें तुझ्यावर अशी पाळी केव्हां तरी आल्याशिवाय रहाणार नाहीं. तूं आज जो मार्ग स्वीकारला आहेस, तो ज्याच्या डोक्यांतील मेंदु शावूत आहे, असा कोणीही मनुष्य इष्ट म्हणून मानणार नाही. आज इतकीं वर्षें तुझ्या शिक्षणाकरितां, कांहीं कांहीं वेळीं तुझ्या धाकट्या भावंडांचीही कदर न करतां मी जो पाण्यासारखा पैसा खर्च केला, त्याचें तूं आतां कॉलेज सोडलेंस म्हणजे काय चीज झालें ? आता इतके दिवस त्या कॉलेजांत काढल्यासारखे एकदां डिग्री घेऊन टाक म्हणजे मोकळा झालास. "

**के०**—" मला त्या डिग्रीची मोठीशी मातब्बरी वाटत नाहीं. शहाणपणा कांहीं डिग्रीतच असतो असें नाहीं. निव्वळ डिग्रीच्याच जोरावर ज्यांना आपला चरितार्थ चालविण्याची महत्त्वाकांक्षा असेल, त्यांनी पाहिजे तर तिची काळजी वहावी. मला तिची कांहींच किंमत वाटत नाहीं. आणखी कांहीं दिवस अभ्यास करून आणि परीक्षा पास होऊन म्हणजे माझ्या सध्यां असलेल्या ज्ञानांत कांहीं अधिक भर पडेल, असें मला वाटत नाहीं."

हरि०—" म्हणजे तूं कॉलेज सोडलेंस ही गोष्ट माझ्या अगदीं मनाविरुद्ध आहे, याचें तुला कांहींच वाटत नाहीं तर ? "

के०—" बाबा, क्षमा करा मला. आजपर्यंत मी तुमची कोणत्याही बाबतींत कधींही अवज्ञा केलेली नाहीं. इतकेंच नव्हे तर तुमच्या समोर मी कधीं कमज्यास्त बोललोंही नाहीं. आतां हा प्रश्न तुम्ही केला नसतात तर बरें झालें असतें. या प्रश्नाचें उत्तर देणें माझ्या जिवावर येत असले तरी तें देणें मला भाग आहे. सध्यांच्या माझ्या या कालेज सोडण्याच्या कृत्यानें तुम्हाला काय वाटेल, याचा विचार खरो-खरच मला करतां येत नाहीं, व तो करून चालणारही नाहीं. माझ्या राष्ट्राला मी सध्यां करीत असलेली गोष्ट हवी आहे. तुम्हाला ती पसंत नसली तर माझा नाइलाज आहे; कारण मला ती केलीच पाहिजे. "

हरि०—" म्हणजे तुझ्या बापाच्या सांगण्याची तुला कांहींच किंमत वाटत नाहीं तर ? त्याच्या पसंतीनापसंतीचीही तुला दिक्कत वाटत नाहीं ?"

के०—" असें कसें होईल बाबा ? ज्यानीं मला जन्म दिला, ममतेनें माझें पालन पोषण करून मला लहानाचा मोठा केला, त्यांच्या आज्ञेचें पालन करणें व त्यांना पसंत असेल तेंच करणें हें माझें पवित्र कर्तव्य आहे, अशीच माझी समजूत आहे. पण ते जसे मला पूज्य व वंदनीय आहेत, त्याचप्रमाणें त्यांनाही पूज्य व वंदनीय असणारी राष्ट्रदेवता आहे. तेव्हां आपल्याला पूज्य असणाऱ्या माणसांनाही पूज्य असलेल्या राष्ट्र-देवतेच्या आज्ञेचें पालन करणें व तिला हवी असेल तीच गोष्ट करणें हें माझें अधिक पवित्र कर्तव्य नाहीं का ? "

हरि०—" तर तूं आतां आपल्या पोटापाण्याची सोय तुला माझ्याहून अधिक पूज्य वाटत असलेल्या राष्ट्र देवतेकडेच करावीस हें बरें. "

के०—" म्हणजे काय बाबा ? मला यापुढें तुम्ही आपल्या घरांत राहू देण्यास तयार नाहीं ? "

हरि०—" नाही. त्याला माझा अगदीं नाइलाज आहे. मला कुठें तुझ्यासारखी देशभक्तीची उकळी फुटली आहे ? तुला काय ? तूं आपला सडा फटिंग ! तुझ्या पाठी-वर तुझा संसार ! आमचें तसें थोडेंच आहे ! आमच्या मुलाबाळांचें आम्हाला पाहिलें पाहिजे. उद्यां तुझ्यामुळें कांहीं तरी नस्तें किटाळ पाठीशीं लागलें म्हणजे ती यातायात कोण करीत बसणार ? "

के०—" बाबा, माझ्या इथें रहाण्यापासून तुम्हाला किंवा माझ्या भावंडांना कोण-त्याच प्रकारचा धोका पोहोंचण्याचा संभव नाहीं. आम्हाला कांहीं कोणाचे खून पाडाव-याचे नाहींत, जाळपोळ करावयाची नाहीं–किंवा कोणाचीं घरेंदारें लुबाडायचीं नाहींत ! या चळवळींत असल्या प्रकारच्या घातुक इलाजांना तर सक्त बंदी करण्यांत आलेली आहे. मग आपल्याला माझ्यामुळें सरकारी रोषास कां पात्र व्हावें लागेल हेंच मला समजत नाहीं."

हरि०––" तुला समजत नसलें तरी मला तें चांगलें समजतें आहे; आणि तुझें म्हणणें घटकाभर खरें धरून चाललें तरी तुझ्या मनांत उसळलेली ही देशभक्तीची लाट तूं या घरांत राहिलास तर मुलाबाळांच्याही मनांत उद्भवल्याशिवाय रहाणार नाहीं. तेव्हां त्यांच्या तरी जन्माचें नुकसान होऊं नये, म्हणून तरी निदान मला तुला इथें ठेवतां येत नाहींच नाहीं. माझ्या सामर्थ्याप्रमाणें मी आतांपर्यंत तुझा संभाळ केला. आशा होती कीं तूं मागेंपुढें कुळाचें नांव काढशील. आतां तरी मी तुझ्याच हितासाठीं म्हणून मी आपलें मत तुला सांगितलें. तें कितपत सत्य आहे तें पडताळून पहाण्याची देवानें तुला बुद्धि दिलेली आहे. आणि तुझी सदसद्विवेकबुद्धि तुला सांगेल तें करण्यास तूं पूर्ण स्वतंत्र आहेस परंतु कोणतीही गोष्ट करण्यापूर्वीं ती केल्याचा परिणाम काय होईल याचा नीट विचार करून मगच ती करणें बरें एवढेंच माझें म्हणणें. मी कांहीं तुझ्याइतका शिकलेलों नाहीं, पण जगांत चार पावसाळे तुझ्यापेक्षां अधिक पाहिले आहेत म्हणून आपलें तुला सांगतों."

के०––" बाबा, माझ्या जन्माचें हित व्हावें म्हणून जर मी असा वागत असतों तर तुमच्या सांगण्याचा विचार करणें मला भाग होतें. पण मी माझ्या शिक्षणावर पाणी सोडण्यास तयार झालों तो माझें जन्माचें कल्याण करून घेण्याच्या अपेक्षेनें नसून माझ्या देशाला त्याची जरुरी भासत आहे म्हणून झालों आहें, यानें माझें जन्माचें नुकसान होण्याचाही संभव आहे, हें मला माहीत आहे, तेव्हां बोलून चालून राष्ट्रासाठीं हालअपेष्टा सहन करण्याच्या तयारीनेंच ज्याअर्थीं मी असें केलें आहे त्या-अर्थीं पुढें माझें काय होईल याचा विचार करण्याची मला कांहींच जरुरी नाहीं. लढाई-वर जाणारा शिपाई लढाई करून परत आल्यावर आपणाबरोबर आपण किती पैसा जमविलेला असेल, याचा विचार करीत नसतो. त्याला पक्कें माहीत असतें व तो धरूनच चालतो कीं आपण ही मृत्यूच्या जबड्यांत उडी घेत आहोंत. त्यांतूनही तो

बचावलाच तर नशीब त्याचें म्हणावयाचें ! तेंही त्याला कांहीं नको असतें असें नाहीं. पण तो कांहीं त्या अपेक्षेनें तेथें जात नाहीं. तो जातो तो मरणाच्याच तयारीनें जातो. ”

**हरि०**—“ तर मग तुझा हा निश्चय अगदीं ठामच आहे ना ? ”

**के०**—“ होय. तो कशानेंही बदलणें शक्य नाहीं. इतकेंच नव्हे तर मी सध्यां आचरणांत आणलेल्या मार्गाचाच राष्ट्रांतील अलम तरुण विद्यार्थ्यांनीं अवलंब केला पाहिजे असें माझें मत आहे. निव्वळ आपलें स्वतःचें हित जाणण्याकडेच प्रत्येकाची आजपर्यंत प्रवृत्ति असल्यामुळेंच राष्ट्राचा घात झालेला आहे. आपलें होत असलेलें अगर होणारें अहित सोसावयास तयार होऊन राष्ट्राच्या हिताची गोष्ट करण्यास तयार होणें हेंच आजच्या तरुणाचें कर्तव्य आहे. ”

**हरि०**—“ तर मग माझा नाइलाज आहे. असल्या प्रकारच्या विचारांचा मनुष्य—मग तो माझा प्रत्यक्ष पोटचा मुलगा कां असेना—जवळ बाळगणें माझ्या पेशाला फारच घातुक आहे. तेव्हां तूं आपला कांहीं तरी स्वतंत्र मार्ग पत्करावास हेंच ठीक. ’

**के०**—“ ठीक आहे. जशी तुमची मर्जी. ”

केशव हें बोलला खरा, पण ते शब्द उच्चारतांना त्याचा कंठ दाटून आला. दोन अश्रूही त्याच्या डोळ्यांत दिसूं लागले. हरिपंतांच्या हृदयाला देखील कंप सुटला. कांहीं असलें तरी पित्याचें अंतःकरण तें !

**हरि०**—“ तुला घरांतून बाहेर काढतांना मला फार आनंद वाटत असेल, नाहीं ? ”

**के०**—“ बाबा, तुम्ही माझ्यावर आजपर्यंत किती अलोट प्रेम केलें आहे, याची मला केव्हांही विस्मृति पडणें शक्य नाहीं. मला, ‘ घरांतून बाहेर जा, ’ असें सांगतांना तुमच्या जिवाला किती कष्ट होत असतील याचीही मला पूर्ण कल्पना आहे. पण काय करावयाचें ? मला घरीं ठेवून घेण्यांत तुम्हाला व त्यामुळें माझ्या भावंडांना गोता येण्याचा संभव आहे, असें तुमचें प्रामाणिक मत आहे; आणि माझी सदसद्विवेकबुद्धि ‘ तूं करीत असलेलेंच सध्यांचें तुझें कर्तव्य आहे आणि कोणताही प्रसंग ओढवला तरी त्यापासून तूं यत्किंचितही चळूं नकोस,’ असा आंतून मला इषारा देत आहे. तेव्हां या बिकट परिस्थितींत आपणां दोघांचाही अगदीं नाइलाज आहे. तेव्हां परमेश्वराची मर्जी म्हणून आली आहे या परिस्थितींत समाधान मानण्यापलीकडे आपल्या दोघांनाही कांहीं इलाज नाहीं.’

हरि०—" तर मग मर्जी तुझी ! तूं आतां जाणार; तेव्हां जातां जातां तुला एवढें मात्र सांगून ठेवल्यावांचून माझ्याच्यानें रहावत नाहीं कीं आपण केली ती अगदीं चूक केली असें तुला कळून आलें व माझें आतांचें तुला सांगणेंच बरोबर होतें अशी तुला खात्री वाटूं लागली व त्याप्रमाणें आचरण करण्याची तुझी तयारी झाली तर माझ्या घराचें दार तुला केव्हांही खुलें आहे."

के०—" बाबा, तुम्ही आतां म्हणत आहांत तेंच खरें असें मला यापुढें केव्हांही वाटूं लागेल व पटूं लागेल, असें मला वाटत नाहीं. पण त्यांतूनही मला तसा बुद्धि-भ्रम झालाच तर मी पुनः येईनच."

असें म्हणून त्यानें हरिपंतांना व आपल्या मातुःश्रींना नमस्कार केला आणि आपल्या धाकट्या भावंडांची भेट घेतली. त्या बिचारीच्या व त्या लहानग्या जिवांच्या डोळ्यांतील पाणीच खळेना. केशवालाही आपले हुंदके आंवरणें फार जड जात होतें. पण मायापाश तोडतांना अशी स्थिति कोणाची होत नाहीं ? ते पाश आडवे येत असतांना कर्तव्य-पराङ्मुख न होणें, हाच खरा पुरुषार्थ आहे. केशव जड पावलांनीं घराबाहेर पडला. अगदीं नजरेच्या टापूच्या बाहेर जाईपर्यंत तो आपल्या घराकडे वळून वळून पहात होता.

---

# प्रकरण १५ वें.

असा प्रसंग प्राप्त झाल्यास पुढें जावयाचें कुठें वगैरे केशवाचें ठरलेलें होतेंच. त्यामुळें त्यासंबंधानें विचार करण्याचें त्याला कारणच पडलें नाहीं. तो तडक कृष्णाकडे गेला. कृष्णानें त्या दिवशीं जेवणाला फांटाच दिला होता. कारण व्याख्यान आटोपायला किती वेळ लागेल याचा कांही नेम नसल्यामुळें 'आज मी जेवायला येणार नाहीं,' असें त्यानें आगाऊच कळवून ठेवलें होतें. घरीं आल्याबरोबर आपल्या वहिनींना त्यानें आपण कॉलेज सोडल्याचें सांगितलें. त्या बिचारीला त्यांत विशेष कांहींच वाटलें नाहीं. केशवाला त्यावेळीं आपल्याकडे आलेला पाहून त्याची खात्री झालीच कीं स्वारीला थारेपालट करावयाची नोटीस मिळाली असली पाहिजे.

कृ०—" कां रे केशव ? बाबांनीं तुला बाहेरचा रस्ता दाखविला वाटतें ?"

के०—" होय बुवा. मी कॉलेज सोडलें हें त्यांना मुळींच आवडलें नाहीं. इतकेंच नव्हे तर मी घरीं राहिल्यानें त्यांच्या नोकरीवर गदा येईल व घरांतील इतर मुलेंबाळें बिघडतील अशीही त्यांना भीति वाटली. मी त्यांची समजूत घालण्याचा आपल्या परीनें थोडासा प्रयत्न केला. पण ते कांहीं मला घरीं राहूं देण्यास तयार होईनात."

कृ०—" तुझ्या बाबांच्या विषयींच मला आतां बोलावें लागणार आहे. पण त्याबद्दल तूं मनाला लावून घेऊं नकोस. अरे, यांची मनेंच मेलेलीं ! आपल्या जातीचें विस्मरण झालेले सिंह हे ! तो आपली जात विसरला म्हणजे ज्याप्रमाणें मेंढरापेक्षांही दुर्बल बनतो, तशी यांची स्थिति झालेली ! कोणतेंही उज्ज्वल तत्त्व आचरणांत आणावयाचें तर दूरच राहो, पण त्याचा नुसता वारा यांच्या अंगाला लागला तर यांना हींव भरावयाचें ! तुझे बाबा म्हणजे किती गुणी आणि सच्छील गृहस्थ ! पण आतां इतके दिवस सरकारच्या कच्छपीं लागून लागून किती शिळपट बनले आहेत पहा ! तुला वाईट वाटूं देऊं नकोस हं ! कारण तुला माहीतच आहे कीं त्यांच्याविषयीं माझ्या मनांत तुझ्याइतकाच आदर वसत आहे. पण तो इतर बाबतींत. सरकारच्या दीडदमडीच्या नोकरीपुढें सध्यां त्यांना त्रिभुवन तुच्छ वाटत आहे. अर्थात् हा कांहीं त्यांचा दोष नाहीं. आपण सुद्धां जर आतांपासून आपल्या पायांत ही रुपेरी बेडी अडकवून घेतली असती, तर आतां आपल्या हृदयांत जागृत झालेली स्वातंत्र्याची ज्योत थोड्या थोड्या प्रमाणांत आपल्या अगदीं नकळत कमी कमी होत जाऊन शेवटीं साफ विझाल्यावांचून खात्रीनें राहिली नसती. यांत त्या माणसाचा दोष नसतो; तर त्या पेशाचा आणि त्या जागेचा दोष असतो. शेणांतील किड्याला ज्याप्रमाणें त्याच्या वसतिस्थानांतच कायमचें रहाण्याची इच्छा व महत्त्वाकांक्षा असते आणि बाहेरच्या स्वच्छ हवेंत येणें म्हणजे त्याला मरणप्राय संकट वाटतें, त्याप्रमाणेंच गुलामगिरींत आनंद व भूषण मानणाऱ्या या लोकांना स्वातंत्र्याच्या चैतन्यमय सृष्टींत विहार करणें म्हणजे प्राणघातक संकटच वाटत असतें. देशांतील तरुणांचीं मनें अशा रीतीनें मारलीं जाऊं नयेत आणि त्यांच्या मनाची खबीरता अबाधित रहावी, म्हणूनच तर देशहितेच्छु पुढाऱ्यांचा हा सारा खटाटोप सुरू आहे."

इतक्यांत दादा आपल्या दुकानांतून परत आले. यांचा पहिल्या प्रकरणांच्या आरंभीं परिचय करून देण्यांत आलेलाच आहे. त्यांचा सर्वांच्या आधीं परिचय करून देणें भागच होतें. कादंबरीच्या कथानकांतील नायकाचे ते वडील बंधु असून

त्यांचा परिचय जर सुरुवातीलाच करून देण्यांत आला नसता तर दादासाहेबांनीं लेखकाला एक अक्षरही लिहूं दिलें नसतें.

दुकानांतून परत येण्यास स्वारीला आज रोजच्यापेक्षां ज्यास्त उशीर झाला होता. त्यामुळें त्यांची तब्यत बरीच गरम झाली होती. तरी बरें कीं सरस्वतीबाई फार दक्ष गृहिणी असल्यामुळें त्यांचा स्वयंपाक वगैरे अगदीं तयार होता. पाय धुवून यजमान संध्येला बसल्याबरोबर त्यांनीं कृष्णानें कॉलेज सोडल्याची त्यांना वर्दी दिली. दादांचें भडकलेलें डोकें आपोआप थोडथोडें शांत होऊं लागलें. म्हणजे कृष्णानें आचरणांत आणलेल्या तत्त्वाबद्दल त्यांना सहानुभूति वाटत होती म्हणून त्यांच्या डोक्यावर त्या बातमीनें इष्ट परिणाम झाला, असा वाचकांनीं आपला गैरसमज करून घेऊं नये. त्याना असें वाटूं लागलें कीं हा बहुतेक अभ्यासाला कंटाळला आणि आतां हा कोठें तरी नोकरीचाकरी करायला लागणार. म्हणजे अर्थातच याच्यापासून आपल्याला कांहीं तरी मदत होणार. त्यांची संध्या वगैरेही त्यामुळें तडकाफडकी उरकली. आंतून जोरच तसा विलक्षण वाटत होता.

इतके दिवस कृष्णाशीं ते बोलत असत म्हणजे अगदीं कारणापुरतें. महिन्याच्या सुरुवातीला भाडेंच मागावयाचें असे त्यामुळें त्याच्याशीं त्यांना बोलणेंच भाग पडे. त्यांचा त्या बाबतींत अगदीं निरुपाय होई. एरवीं मात्र अतिपरिचयादवज्ञा होते म्हणून ते आपल्या धाकट्या भावाशीं फारसा संबंध न ठेवण्याची दक्षता बाळगीत असत. पण आज त्यांना कृष्णाबद्दल अननुभूत प्रेम वाटूं लागलें. त्याच्याशीं आपण दोन शब्द बोलावेच असें त्याचें मन त्यांना एकसारखें सांगूं लागलें. त्यांचा अगदीं नाइलाज झाला. पाकनिष्पत्ति झाली असल्यामुळें ते ताबडतोब पाटस्थ झाले आणि कृष्णाला अगदीं स्पष्ट ऐकूं जाईल एवढ्या मोठ्या आवाजांत ते आपल्या लाडक्या पत्नीशीं बोलूं लागले. बोलत असतांना आपल्या तोंडून एखादाही वायफळ शब्द निघूं नये याबद्दल ते फारच सावध असत.

**दादा०**—" काय ? आज भाजी कसली बनविली आहेस ? "

**सर०**—" काल तो तुक्या आला ना कोंकणांतून ? तो आला कुळीथ घेऊन. त्याचीच उसळ केली आणि पातळही त्यांचेंच कळ्हण काढलें आहे. "

**दादा०**—" वाः ! मग तर काय कृष्णाला आज मोठी थोरली मेजवानीच आहे म्हणावयाची ! कारण त्या बिचाऱ्याला या मुंबईच्या बिऱ्हाडांतून कुळथाचें किंवा

कळ्हणाचें नांव सुद्धां ऐकण्यास मिळण्याची पंचाईत ! कृष्णा, अरे बघ बाबा, तुझी वहिनी तुला कसला आग्रह करीत आहे ती ! ”

कृष्णाला जरा आश्चर्यच वाटलें. कारण असले सुप्रसंग त्याला वर्षांतून दोन चार वेळां लाभायचेही कठीणच !

**कृ०**—“ कसला आग्रह चालविला आहे वहिनीनें ? ”

**सर०**—“ नाहीं हो भावजी ! इकडूनच चालला आहे मारे आग्रह आणि नांव मात्र विनाकारण माझें पुढें करायचें होतें आहे. मेली कुळथांची बाब ती काय आणि त्याचें काय मोठें एवढें प्रस्थ माजविण्यांत येत आहे ! कांहीं एखादें मोठें पक्वान्न असतें तर असो मेलं ! ”

**दादा०**—“ हेंच तें तुम्हांला धोरण नाहीं म्हणून मी नेहमीं म्हणत असतों तें ! अग याला पक्वान्नांचा कसला आग्रह करावयाचा आहे ? तीं त्याला सगळीकडे मिळतातच. असले पदार्थच इकडे कधी खायला मिळायचे नाहींत, म्हणून तर माझा एवढा आग्रह-” कृष्णा आंत गेला.

**कृ०**--“ बरें. पण तो केशवही बाहेर आला आहे. एखाद्या वेळणींत द्या, म्हणजे मी बाहेरच घेऊन जातों. त्यालाही बघतों आवडली तर.”

**सर०**—“ त्याला कशाला हो भावजी ?”

**दादा०**—“ देग त्याला एका वेळणींत घालून ! उसळीची काय मोठीशी कथा आहे ?”

**सर०**—“इश्श ! मला त्या मेल्या उसळीची कथा वाटते म्हणून का मी त्याला कशाला असें विचारलें ? घरीं आलेल्या पाहुण्यांना देण्यासारखी कांहीं ही अपुर्वाईची वस्तु नाहीं, म्हणून मी तसें विचारलें. भावजी काय घरचेच आहेत. ते आपले आपण देऊं तें गोड मानून घेतील. मला काय ? मी देतें बापडी ! ”

असें म्हणून त्यांनीं एक वेळणी भरून कृष्णापुढें ठेवली. त्या तिघांचा झालेला संवाद केशवाला ऐकूं आला होताच. त्या बिचाऱ्याला त्या स्थितींतही कृष्णाच्या बंधुराजांची व त्यांच्या गृहिणीची बोलाचाली पाहून करमणूक वाटली. उसळ खात असतां केशव बोलूं लागला.

**के०**—“ कृष्णा, आज तूं नसतास तर माझी जराशी पंचाईतच झाली असती, नाहीं ? ”

**कृ०**—" अरे वा ! तुला पंचाईत पडली म्हणजे झालेंच ! अरे तूं बाबा जगाचा मित्र आहेस ! जाशील त्याच्याकडे त्याला आपलासा करून टाकून आपला कार्यभाग साधून घेशील. "

**के०**—" परमेश्वरकृपेनें हें थोडेसें खरें असलें तरी मला तुझ्याकडे जसें प्रेमानें व हक्कानें येतां आलें तसें कांहीं दुसरीकडे कोठें जातां आलें नसतें. "

वहिनींची स्वारी उंबरठ्याच्या आंत उभी राहून सारा संवाद ऐकत होतीच. आपण केलेल्या उसळीची तारीफ ऐकण्याच्या आशेनें त्या उभ्या होत्या. परंतु वरील संवाद ऐकून त्यांची निराशा झाली. त्या लगेच आंत गेल्या आणि आपल्या यजमानांना सांगूं लागल्या कीं कृष्णाचा कोणी मैत्रसुद्धां आजपासून इथेंच रहायला आला आहे. यजमानांचा आनंद तर आतां गगनांत मावेनासा झाला. कृष्णा आतां करूं शकणाऱ्या मदतीबरोबर त्याच्या मित्राचीही आपल्याला मदत होणार या काल्पनिक समाधानामुळें आपण काय करीत आहों याचें भान न राहून त्यांनीं घरांत तयार असलेल्या सर्व अन्नाचा फडशा उडविला. सरस्वतीबाईही तशा दूरदर्शीच होत्या. आज एक वेळ आपल्याला पुनः भात करण्याची तसदी पडली तरी याचा वचपा आतां लवकरच भरून निघणार आहे, या आनंदांत त्यांनीं तेंही निमूटपणें सहन केलें. असा प्रसंग दुसऱ्या एकाद्या वेळीं उद्भवला असता तर त्यांनीं आकाश पाताळ एक करून टाकलें असतें. त्यावेळीं त्यांचा पतिव्रताधर्म आडवा आला नसता. परंतु असल्या सुप्रसंगीं त्यांना पतिद्रोह करवेना.

**सर०**—" आज कसें नीट जेवण झालें ? नाहीं तर रोज आपलें पानावर बसावयाचें–खाल्लें खाल्लें–नाहीं नाहीं—"

जेवण आटोपल्यावर बाहेर येऊन दादासाहेबांनीं आपली चंची सोडली. सरस्वतीबाईंनीं तुक्या गड्यानें कुळथांबरोबर आणलेली सुपाऱ्यांची पिशवी आपल्या पतिदैवतापुढें ठेवली. सुपारी कातरतां कातरतां दादासाहेबांनीं पृच्छा केली–

" कृष्णा, हे तुझे स्नेही खातात कां पान ? "

दादांचा हा प्रश्न ऐकून कृष्णाला नवलच वाटलें. कारण आपण किंवा आपल्या कोणी स्नेह्यानें यांच्या देखत सुपारीचें खांड तोंडांत टाकलें तरी त्यांत त्यांना आपला अपमान झाला असें वाटतें हें त्याला माहित होतें.

**कृ०**—" नाहीं. पानबीन नाहीं तो खात कधीं. "

इतर व्यसनांपेक्षां पानसुपारीचें व्यसन सर्व बाबींत ( खर्चाच्या विशेषेंकरून ) किती सोयीचें असतें यावर दादासाहेबांचें व्याख्यान सुरू झालें. हें व्यसन फार जुन्या-काळापासून आपल्यांत रूढ आहे व म्हणून तें आरोग्यदृष्ट्याही ठीक असलें पाहिजे; कारण आपले पूर्वज आपल्या आरोग्याची फार काळजी घेत असत, हाही मुद्दा त्यांनीं मांडला. हें खरें कीं खोटें याच्याशीं आपल्याला कांहीं कर्तव्य नाहीं. दादांना तरी त्या विषयावर मुद्दे मांडण्याची कांहीं आवश्यकता होती असें नाहीं. पण आपण करीत असलेली कोणतीही गोष्ट विशेषतः ती इतर कोणी करीत नसलें तर कशी चांगली आहे तें त्यांना पटवून देण्यासाठीं तिच्या समर्थनार्थ त्यांना मुद्दे सांगण्याची खोड होती. त्यांनीं आपल्या चंचीला मोकळी हवा दिल्यापासून केशवाचें लक्ष तिनें इतकें वेधून टाकलें होतें कीं तिचें स्पर्शसुख आपल्याला लाधेल का अशी त्याला अगदीं उत्कट लालसा लागून राहिली होती. बांधलेल्या स्थितींत असतांना त्या चंचीला जरी एखाद्या महासागरांत फेंकली असती तरी तिच्या पाठीवरील तेलकट थरानें तिच्या पोटात पाण्याचा एक बिंदूही शिरकूं दिला नसता. तिची पाठ म्हणजे जवळ जवळ वॉटरप्रूफच होती म्हणाना ! दादासाहेबांचे वडील निवर्तल्याला आज तेरा चौदा वर्षें झालीं होतीं. ते जिवंत असतांना आपण ती चंची पंधरा वर्षें अव्याहत वापरीत असल्याचें छातीला हात लावून सांगत असत. वडिलोपार्जित इस्टेट कधींही हातची घालवूं नये म्हणून वाडवडील जो नेहेमीं उपदेश करितात, त्याला अनुसरून दादासाहेबांची वागणूक असल्यामुळें तें आपल्या वडिलांचें स्मारक त्यांनीं पंचप्राणासारखें जतन करून ठेवलें होतें. कोणी त्यांना नवीन घेण्याचा उपदेश करूं लागला म्हणजे तें नेहेमी ठराविक उत्तर देत असत कीं ‘ अरे बाबा, नवीन वाटेल तितक्या मिळतील. पण ही पुनः लाभणार नाही. ’

**के०**—“ कृष्णा म्हणतो तें खरें. मला कांहीं ही संवय नाहीं. पण आजच्या दिवस मी खातोंच पान. ”

असें म्हणून केशवानें चंचीला हात घातला. त्याची अशी कल्पना होती कीं कांहीं माणसें ज्याप्रमाणें बहिरंगीं हिडीस परंतु अंतरंगीं ठाकठीक असतात, त्याचप्रमाणें हिच्याही बाबतींत असेल. पण ती सपशेल चुकीची ठरली. तींत मूळ स्वतंत्र असे पांच खण असावेत असें अनुमान काढण्यास भरपूर पुरावा होता. परंतु सत्पुरुषांच्या कोणत्याही विचाराचें जसें पारमार्थिक विचारांत पर्यवसान होतें, त्याप्रमाणें कोणत्याही

खणांत हात घातला तरी तो शेवटल्या खणांत असलेल्या तंबाखूंतच जात असे. अशा त्या पुण्यचंचीची अखंड संगत लाभत असल्यामुळें दादांना वेदांताचाही बराच नाद लागला होता.

" खाणार होतों–पण नकोच. उगीच नाहीं तर संवय लागायची, " असें म्हणून केशवानें कशी तरी वेळ मारून नेली आणि आपलें हंसूं मोठ्या मेटाकुटीनें दाबलें.

**दादा०**—" कायरे कृष्णा, हे तुझे स्नेही काय आजपासून इथेंच रहायला येणार आहेत का ? "

**कृष्णा**—" होय. पण अर्थात् तुम्ही परवानगी दिलीत तर–"

**दादा०**—" माझें रे काय जातें त्यांत ? मलाही अनायासें एक बोलायचा-लायला मनुष्य झाला. नोकरीला कुठें असतात हे ? "

**कृष्णा**—" हा नोकरीला नसतो कुठेंच. माझ्याच बरोबर हा कॉलेजांत होता आणि आज माझ्याच बरोबर यानेंही कॉलेज सोडलें. "

**दादा०**—" मग हें तर मी तुला कधींच सांगितलें होतें ! उगाच तीं भाराभर पुस्तकें वाचून करायचें काय ? पोटच भरावयाचें ना ? आजपर्यंत आयुष्याचीं इतकीं वर्षें अगदीं फुकट घालविलींत. माणसाला साधारण कळूं लागल्याबरोबर त्यानें आपलें मिळवितें व्हावें. म्हणजे आपोआपच तो संसाराला लागून आपल्या मार्गाला लागतो. आतां तरी तुला माझें म्हणणें पटूं लागलें तर ? बरें. नोकरी कुठें पाहिली आहेस ?"

**कृ०**—" नोकरी करण्यासाठीं कांहीं आम्ही कॉलेज सोडलें नाहीं."

**दादा०**—" अरे पण दुसरा एखादा स्वतंत्र उद्योगधंदा करावयाचा म्हटला तर तें भांडवलाशिवाय कसें जमणार ? माझ्या लाइनींतला उद्योग करावयाचा असेल आणि तुम्हाला कुठें भांडवल मिळण्याजोगें असेल तर मी आपला तुम्हाला सुरवातीला रस्ता दाखवून देईन. एकदां तुम्ही तयार झालांत म्हणजे तुमचा तुम्ही संभाळा तो. "

**कृ०**—" आम्हाला नोकरी करावयाची नाहीं. त्याप्रमाणें कसला धंदाही करावयाचा नाहीं. सरकारी शाळा कॉलेजें विद्यार्थ्यांनीं ओस पाडावीं, असा कॉंग्रेसनें ठराव केला व त्याबरहुकूम आम्ही कॉलेज सोडलें आहे. "

बरेच लोक वाचतात म्हणून दादासाहेबही आपल्या दुकानांत पडलेलें एखादें वर्तमानपत्र कधीं कधीं चाळीत असत. आपण इंग्रजी शिकलों नसलों तरी आपल्याला थोडेंफार राजकारण समजतें असा त्यांना विश्वास वाटत असे.

**दादा०**—" आज्ञा पाळायची खरी. पण ती कोणाची आज्ञा पाळायची याचें तारतम्य आपण ठेवलेंच पाहिजे. कांग्रेसची आज्ञा कशासाठीं पाळायची ? तिची आज्ञा म्हणजे कांहीं सरकारी हुकूम नव्हे की त्याची तामिली तुम्ही केलीच पाहिजे ! आणि सरकार असा हुकूम करणारही नाहीं, हें मी सांगतों. कारण शाळा, कॉलेजें सोडून तुम्ही नोकऱ्या करूं लागलां म्हणजे सरकारचेच पैसे तुमच्या पगारासाठीं खर्च व्हायचे. मग सरकार असा हुकूम काढून आपल्या पायावर धोंडा पाडून घेण्यास कसें तयार होईल ? "

दादासाहेबांच्या एवढ्याच बोलण्यावरून केशवाची अगदीं खात्री होऊन चुकली कीं हें प्रकरण त्यांना समजावून द्यावयाचें म्हणजे त्यांच्या समोर गीता वाचण्या-सारखेंच होणार आहे. कृष्णाला सुद्धां हें समजत नव्हतें असें नाहीं. परंतु तो बिचारा आपला त्यांची समजूत घालूं लागला.

**कृ०**—"पण दादासाहेब, आम्हाला कॉंग्रेसचाही हुकूम पाळलाच पाहिजे, नाहीं का ?"

**दादा०**—" असें कधीं झालें आहे ? सरकारी हुकुमाची अंमलबजावणी करण्यास कोणी चुकला तर सरकार चाहेल ती शिक्षा त्याला ठोठावतें व अंमलांतही आणूं शकतें. तसें तुमच्या त्या कांग्रेशीचें कुठें आहे ? "

**कृ०**—" दादासाहेब, सरकारच्या हुकुमांची अंमलबजावणी सक्तीनें केली जाते. परंतु कॉंग्रेसच्या हुकुमाची तामिली आमच्याकडून प्रेम करवीत असतें. प्रेमाची आपुलकी सक्तींत कशी आढळणार ? सक्तीचा हुकूम तोडण्यास भीति आडवी येते, पण प्रेमाची आज्ञा धुडकावण्यास आंतडें आडवें येतें. "

**दादा०**—" भरमसाट बोलत आहेस झालं ! कांग्रेस हें सरकार होऊंच कसें शकेल ? सरकार म्हणजे साहेब ते कुठें तुमच्या कांग्रेशींत आहेत ? साहेबावांचून सरकार म्हणजे प्राणावांचून प्राणी. "

केशव आपलें हंसूं दाबण्याचा सारखा प्रयत्न करीत होता. त्यानें मध्यें तोंड न घाल-ण्याचा अगदीं निश्चय केला होता. पण आतां कृष्णानेंही बोलणें सोडून द्यावें, असें त्याला वाटूं लागलें. म्हणून त्यानें कृष्णाच्या मांडीला हळुच चिमटा घेऊन त्याला तसा इषारा

केला दादासाहेबांनीं हें केशवाचें करणें पाहिलें. त्यांना वाटलें कीं आपलें म्हणणें यांना पटूं लागलें बरें का! पटणारच तें—जगांत इतके दिवस आपण काहीं उगाच घालविले नाहींत!

**दादा०**—" आतां कालिजें सोडलींच आहांत तर कुठें तरी आपली नोकरीचाकरी करूं लागा म्हणजे मार्गाला लागलात."

**कृ०**—" नोकरी करण्याच्या उद्देशानें आम्ही कॉलेज सोडलें नाहीं म्हणून मी मघांशींच सांगितलें नाहीं का तुम्हाला?"

**दादा०**—" मग कशासाठीं सोडलेंत?"

दादा पुनः मूळपदावर आले. केशवाची हंसतां हंसतां अगदीं मुरकुंडी वळली. कांहीं न बोलण्याविषयीं कृष्णाला त्यानें पुनः खुणावलें. कृष्णाचीही खात्री झालीच होती कीं दादासाहेबांची समजूत घालावयाची असेल तर अगोदर लाइफ् अशुअरन्स कंपनींत जाऊन स्वतःचा विमा उतरला पाहिजे.

कृष्णा उत्तर देत नाहीं असें पाहून दादा पुनः बोलूं लागले.

**दादा०**—" बरें. पण समज या तुझ्या मित्रांला मी इथें रहाण्याची परवानगी दिली तर कांहीं भाडें भरण्याची यांची तयारी आहे का? हो; तुम्हा दोघांना हा माझा सडेतोड प्रश्न ऐकून चमत्कारिक वाटलें असेल. पण बुवा, माणसानें आपलें सरळ असावें, या मताचा मी आहें. उगाच भीडभाड काय कामाची? एकदम असा प्रश्न विचारला तर तुम्हाला काय वाटेल म्हणून आतां स्वस्थ बसावयाचें आणि मग नस्त्या भानगडी उपस्थित करीत रहावयाच्या यांत काय तथ्याश?"

**कृ०**—" दादासाहेब, तो बिचारा कुठून बरें भाडें भरूं शकेल? या चळवळींत भाग घेऊन यानें कॉलेज सोडल्यामुळें त्याच्या वडिलांनीं त्याला घरीं रहाण्यास बंदी केली आहे. त्याला तसाच राहूं द्या इथें. मी जेवढ्या जागेंत आतांपर्यंत रहात होतों तेवढ्यातच आम्ही दोघेही राहूं म्हणजे झालं!"

**दादा०**—" यांचे वडील इथें काय करीत असतात?"

**कृ०**—" ते येथील पोस्ट ऑफिसांत क्लार्क आहेत. म्हणजे ते सरकारी नोकर आहेत. याच्या तेथें रहाण्यामुळें आपण सरकारी रोषास पात्र होऊं अशी त्यांना भीति वाटली आणि म्हणून त्यांनीं तसें केलें."

अगोदरच आपली निराशा झालेली पाहून दादांना वाईट वाटत होतें; आणि म्हणून केशवाला थारा न देण्याचें त्यांनीं ठरविलेंच होतें. त्यांत आतां आणखी या माहितीची भर पडली. मग काय विचारतां ?

**दादा०**—" एवढ्या मोठ्या सरकारी अफिसराला यांना आपल्या घरीं ठेवून घेण्यांत जर धोका वाटला तर मी यांना इथें ठेवून घेण्यास कसें तयार व्हावें रे ? यांच्या वडिलांच्या पाठीशीं साहेब उभा असतांना सुद्धां जर त्यांना यांना आपल्या घरीं राहूं देण्याची भीति वाटली तर मला ती कां न वाटावी ? माझी आणि एखाद्या साहेबाची नुसती तोंडओळख सुद्धां नाहीं. "

**कृ०**—" दादासाहेब, याच्या वडिलांना वाटत असलेली भीति निव्वळ काल्पनिक होती. हा त्याच्याकडे राहिला असता तर त्यांत त्यांना कोणत्याही प्रकारचा धोका पोहोंचण्याचा यत्किंचितही संभव नव्हता. पण त्याचें मनच नेभळें बनलें असल्यामुळें त्याना तशी भीति वाटली. तरी पण सरकारची मनोवृत्ति सुद्धां सध्यां जरा हलकीच झाली असल्यामुळें तसें होणें अशक्य असतांही या वेळीं कदाचित् तें शक्य झालें असतें. कारण अशा चळवळ्या मुलांना आपल्या नोकरांनीं थारा देऊं नये, अशी कदाचित् सरकारकडून सक्तीही केली जाण्याचा संभव होता. पण तुम्ही काहीं सरकारी नोकर नाहीं. तेव्हां तुम्हाला याला इथें राहूं देण्यास भिण्याचें कांहींच कारण नाहीं. सरकार कांहीं तुमच्यावर जबरदस्ती करूं शकणार नाहीं. "

**दादा०**—" तूं एवढा शिकलासंवरलेला पण तुझी बुद्धि आपली जेमतेमच ! सरकार माझ्यावर जबरदस्ती कां करूं शकणार नाहीं ? त्यांच्या उपयोगीं पडणाऱ्या नोकरांवर देखील जर तें जबरी करूं शकतें तर तें आमच्यासारख्यांवर कीं ज्यांचा त्याला काडीइतकाही उपयोग नाहीं—सक्ति कां करूं शकणार नाहीं ? जरूर करीलच करील. सरकारचा पाठिंबा असलेल्या माणसाला जी गोष्ट करण्यास भीति वाटते ती करण्याची माझी कांहीं बुवा छाती नाहीं. यांना तर मी इथें राहूं देण्यास तयार नाहींच पण तुलासुद्धां यापुढें मी माझ्या घराचा उंबरठा ओलांडूं देणार नाहीं. तुझ्या त्या आठ आण्यांकडे आतां लक्ष दिलें तर माझ्या घरादाराचेंच वाटोळें होण्याची पाळी माझ्यावर ओढवेल. "

दादांची समजूत घालणें म्हणजे किती कठीण काम होतें, हें आतां वाचकांच्या चांगलेंच लक्षांत आलें असेल. बराच वेळ कृष्णानें इच्छा नसतांही त्यांची समजूत घालण्याचा प्रयत्न केला पण त्यांत कितपत यश आलें तें वाचकांना दिसलेंच आहे.

कृ०--" मी फिरून कॉलेजांत जाण्यास किंवा कुठें तरी नोकरीचाकरी करण्यास तयार झालों नाहीं तर तुम्ही कांहीं मला थारा देण्यास तयार नाहीं ? "

दादा०—" होय बुवा. अशा बिकट परिस्थितींत तुला इथें राहूं देण्याची आपली कांहीं बुवा छाती होत नाहीं. यांच्या वडिलांनीं यांना घरांतून घालविण्याचें कारण तूं मला सांगितलेंस म्हणून बरें झालें. वेळींच मलाही सावध होतां आलें. नाहीं तर मधल्या मध्यें माझी गठडी आंवळली गेली असती."

कृ०—" आम्ही शक्य तितक्या लौकर आपली दुसरीकडे कोठें तरी सोय बघतोंच. पण तोंपर्यंत तरी आम्हाला इथें थांबण्यास हरकत नाहीं ना "

दादा०--" छे-छे–तुम्ही दोघेही आतांच इथून निघून जाणें मला इष्ट आहे."

आणखी कांहीं वेळ त्यांची वाटाघाट होऊन तेवढी रात्र त्यांना तेथें काढण्यास दादासाहेबांनीं अतिशय औदार्यानें परवानगी दिली व दार लावून घेतलें.

कृ०--" केशव, आपल्यावर ओढवणाऱ्या संकट परंपरेची आतांपासूनच सुरुवात झाली, नाहीं ? "

के०--" चालायचेंच. एकदां आपण उडी घेतली आहे खरी. मग आतां डगमगून कसें चालणार ?

कृ०--" अंः ! त्याची काळजीच नको. डगमगण्याचें नांवच कशाला ? याहून एखादा अधिक खडतर प्रसंग ओढवला तरी त्यामुळें भिऊन पुढें टाकलेलें पाऊल मागें घेण्याचा नुसता विचार सुद्धां आपल्या मनाला शिवणें शक्य नाहीं. आतां आधीं उद्यां उठल्याबरोबर आपल्याला आपली कोठें तरी सोय लाविली पाहिजे ! "

के०—" उद्यांचें उद्यां. मला तर बुवा आतां अगदीं केव्हां निजेन असें झालें आहे."

झालें. चारदोन मिनिटांतच केशव अगदीं गाढ झोंपीं गेला. कृष्णा मात्र उद्यां कसें करावें याचा विचार करीत बराच वेळ जागा होता. पण विचारांची मालिका सुरू होतांच त्याच्या मनांत एकमेकांशीं असंबद्ध असे विचार एकामागून एक येऊं लागले. व्याख्यानाची वेळ आठवतांच त्याला मालतीचें स्मरण झाल्याशिवाय राहिलें नाहीं."

या मुलीनें कॉलेज सोडलें तें तत्वाकरितां कीं लौकिकाकरितां ? आपण पण आपल्या देशाकरितां स्वार्थत्याग करूं शकतों, असें लोकांना दाखवून त्यांच्याकडून

वाहवा मिळविणें हाच हेतु तिच्या कॉलेज सोडण्याच्या मूळाशीं असेल काय ? मला नाहीं तसें वाटत. आणि केशवानें त्या लिस्टवर सही केली तेव्हांचा तिचा चेहेरा मला अगदीं पुरतेपणीं आठवतो आहे. आमच्या दोघांच्या विशेषतः माझ्या करण्याचें कौतुक तिच्या डोळ्यांत अगदीं स्पष्ट खेळत होतें. माझा स्वभाव मूळांतच मानी असल्यामुळेंच माझ्या हातून त्या दिवशीं तिचा अपमान झाला, ही गोष्ट आतां तरी तिच्या लक्षात आली असेल का ? पण तिनें निःपक्षपात दृष्टीनें विचार केला असता तर तिची चूक तिच्या लक्षांत त्याच वेळीं आली असती. ' मधु-रस-पान-सौख्य फुकव्याचें,' हें तिचें गुणगुणणें मला आठवलें म्हणजे अजून माझ्या अंगाची लाही लाही होते. त्या दिवशींच तिला असा खवचट टोमणा मारण्याची दुष्ट बुद्धि कां झाली ? त्या दिवसापर्यंत तर तिची वागणूक इतकी चांगली व अदबीची असे कीं मलाच अगदीं गुदमरल्यासारखें होई. मी बोलून चालून आठवड्यांतून एकदां त्यांच्याकडे जेवावयास जाणारा वारकरी ! तिनें माझी पत्रास कशाला ठेवावी ? पण त्या दिवसापर्यंत मी वारकरी व ती मालकीण अशा रीतीनें ती कधींच वागली नाहीं. मग ती इतक्या उदारपणानें वागत असे हें तिचें निव्वळ बाह्यात्कारी दाखविण्याचें ढोंग असून मूळचा तिचा स्वभाव त्या दिवशीं आपोआप प्रगट झाला कीं काय ? इतक्या सात्विक व सुंदर स्वरूपाच्या आड काळेंकभिन्न अंतःकरण असूं शकतें काय ? पण मग तिला, मी कॉलेज सोडलेलें पाहून कौतुक कां वाटलें ? कां मी ज्याला कौतुक समजतों, तो उपहास होता ? मी मूळांतच गरीब आणि त्यांतूनही आज कॉलेज सोडलें म्हणजे कोणाच मला थारा देणार नाहीं ! पण तिनें तरी मग त्या लिस्टवर सही कां केली ? तें कांहीं नाहीं. या सर्व भानगडीचा निकाल लावून घेतलाच पाहिजे. कांहीं तरी जबरदस्त भूल होत आहे, अशी माझी आतां बालंबाल खात्री झाली आहे. तिच्याविषयीं माझें मन कलुषित झालें काय किंवा माझ्याविषयीं तिला तिरस्कार वाटला काय, इतके दिवस मला फारशी किंमत वाटत नव्हती. कारण परस्परांनीं परस्परांशीं फटकून वागण्याचेंच ठरल्यासारखें होतें. पण आतां मला कळून आलें आहे कीं मागच्या कांहींही भानगडी असल्या तरी आम्हा दोघांची जात एक आहे. आम्ही दोघेही स्वतंत्रता देवीचे उपासक आहोंत. तेव्हां एकाच पवित्र देवतेच्या दोन भक्तांमध्यें अशा रीतीची तेढ असणें वाजवी नाहीं. कोणी सांगावें ? कदाचित् हा सगळाच भ्रमाचा भोपळा असेल! तो एकदां फुटला म्हणजे मलाच मी करून घेतलेल्या

गैरसमजुतीबद्दल आणि केलेल्या मूर्खपणाबद्दल खालीं मान घालण्याचा लाजिरवाणा प्रसंग यावयाचा ! पण हरकत नाहीं. अशी पाळी आली तरी चालेल तिच्या बाबतींत मी माझ्या सर्व मानापमानांच्या कल्पनांना फांटा दिला आहे. तिच्या विषयींच्या तिरस्कारानें माझें अंतःकरण रात्रंदिवस जळत असतांना मला एकाएकी तिच्याबद्दल आपलेपणा व आदर कां वाटूं लागावा ? न जाणों ती मला पुनः कोठें दिसली तर झालेल्या प्रकाराबद्दल मी आपण होऊन तिची क्षमा मागेन, असेही मला वाटूं लागलें आहे. नाहीं–शक्य नाहीं तिच्या हातून माझा अपमान झालेला असणेंच शक्य नाहीं. हा सगळा माझाच गैरसमज ! मालती, तूं अजूनही मला उदार मनानें क्षमा करशील का ? अहाहा ! तो पहा तिचा हंसरा चेहेरा मला अद्यापि दिसत आहे. अरेरे ! किती नीचपणा मी केला ? त्या निष्कपट सरळ मनाच्या मुलीवर मी माझे कठोर वाग्बाण सोडले ! बस्. ठरला निश्चय. मी आपण होऊन उद्यां तिच्याकडे जाणार आणि तिची प्रांजलपणें क्षमा मागणार. आपली चूक आपल्याला कळून आल्यावर तसें स्पष्ट कबूल करण्यांत कमीपणा कसला आला आहे ? मला तर वाटतें तें प्रत्येकाचें कर्तव्यच आहे. बाकी एवढें खरें की आज तिनें आमच्याबरोबर कॉलेज सोडण्याचें आपलें कर्तव्य केलें नसतें तर कांहीं मी एवढा चांगुलपणा दाखविण्यास तयार झालों नसतों. काय परमेश्वराची इच्छा आहे कोणाला ठाऊक ? ”

असा विचार करीत करीत तो बऱ्याच वेळानें झोंपीं गेला.

---

# प्रकरण १६ वें.

त्या रात्रीं मालतीलाही बराच वेळ झोंप लागेना. आपण केली ती गोष्ट अविचाराची झाली कीं काय हाच विचार एकसारखा तिच्या मनांत घोळूं लागला आपण केलेली गोष्ट वसंतरावांना मुळींच पसंत नाहीं हें तर तिला कळून चुकलेंच होतें. वसंतरावांचें आणि आपलें भावी नातें तिच्या डोळ्यासमोर उभें रहातांच तिला कसेंसेंच वाटूं लागलें.

“ वसंतरावांचेंच म्हणणें खरें असूं शकेल का ? आमच्या बुद्धीच्या अपरिपक्वतेचा फायदा घेऊन हे पुढारी आम्हाला खड्ड्यांत टाकूं पहात आहेत काय ? पण आमची दिशाभूल करून त्यांना काय फायदा ? यदाकदाचित् त्यांत त्यांचा फायदा

असता तरी सुद्धां त्यांनी असें निंद्य वर्तन केलें नसतें. मग यत्किंचितही फायदा नसतांना तर ते असें करणारच नाहींत. देशासाठीं ज्यांनीं आपल्या संसारावर, घरादारावर, आपल्या सर्वस्वावर तुलसीपत्र ठेविलें, त्यांच्या हातून असें अधमपणाचें कृत्य होणें कसें शक्य आहे ? वसंतरावाचें म्हणणें कीं विद्यार्थ्यांनीं शाळा कॉलेजें ओस पाडून काय होणार ? पण सध्यां राष्ट्रांत माजलेला असतोष जगताच्या चव्हाट्यावर मांडण्याला हा एकच उत्कृष्ट मार्ग नाहीं का ? दुसरा तरी कोणता मार्ग या पुढाऱ्यांनीं लोकांच्या पुढें ठेवावा असें वसंतरावांना वाटतें कोणास ठाऊक ! आपल्या सांगण्या-प्रमाणें वागण्यास, देशाची इभ्रत राखण्यासाठीं कांहीं तरी स्वार्थत्याग कर-ण्यास, देशांतील कांहीं तरुण तरी तयार आहेत, एवढें तरी समाधान त्या पुढाऱ्यांना आम्ही कॉलेजें सोडल्यामुळें होणार नाहीं का ? त्यानीं सांगितलेली एवढी क्षुल्लक गोष्टही करण्यास जर आम्ही कचरलों तर पुढें मागें एखादा अधिक प्रखर कार्यक्रम अंमलांत आणण्याची सुसंधि त्यांना प्राप्त झाल्यास आतां जर आम्ही स्वस्थ बसलों तर आपल्याला कोणीच अनुयायी मिळणार नाहींत, अशा प्रकारच्या निराशेमुळें त्यांना ती वांयाच दवडावी लागणार नाहीं काय ? शाबास त्या कृष्णरावांची आणि जोशांची ! अशी धडाडी जर तरुणांमध्यें नसेल तर ते तरुण तरी कसले ? साहसी वृत्ति ही तर तारुण्याची साक्षात् जीवनकला आहे. ती नाहीं म्हणजे आपल्या तारुण्याच्या बाबतींत जगाची फसवणूक करण्यासारखें आहे. हे मेले अलीकडचे तरुणसुद्धां साहसीवृत्ति दाखवितात. पण ती कोणत्या बाबतींत ?–तर आम्हा तरुण मुलींच्या भोंवतीं गोंडा घोळण्यांत ! हो–तेंही साहसच नव्हे तर काय ? जिची व आपली कांहींही ओळख नाहीं तिच्याशीं कोणत्या ना कोणत्या तरी प्रयत्नानें आपला संबंध ओढवून आणून तिच्यापुढें दांतविचकणी करीत बसणें, हें तरी एक प्रकारचें साहसच आहे ! मुर्दाड मेले ! खरोखर त्या दोघांची ती तेजस्विता पाहून माझें हृदय अगदीं उचंबळून आलें पुढें मागें देशाच्या दुर्दैवानें ही लाट ओसरली– आणि आजकालच्या या तरुण म्हणविणाऱ्या विद्यार्थ्यांच्या अनावर स्वार्थलंपटतेमुळें व भ्याड वृत्तीमुळें ती ओसरण्याचाच फार संभव आहे–तर काय मोठें यांनीं कॉलेज सोडलें आणि काय अगदीं हिचें हृदय उचंबळून आलें, असें म्हणून लोक माझी थट्टाही करतील ! पण सध्यांचा काल तरी असा आहे. लोक मला कांहींही म्हणोत. स्वतः फत्तराप्रमाणें निश्चल राहून, यांत काय आहे आणि त्यांत काय आहे म्हणून कांहीं तरी बडबडणारांच्या शब्दांना मी तरी कां म्हणून किंमत द्यावी ?

कॉलेज सोडलें तर आपलें जन्माचेंही कदाचित् नुकसान होईल हें काय फक्त या व्यवहारज्ञ पंडितांनाच कळतें आणि त्यांना कळत नाहीं ? काय मोठा शहाणपणाचा आव आणतात पहा ! तरी बरें कीं प्रत्येक परीक्षेंत ते कृष्णराव या सगळ्या अहंमन्यांचे दांत पाडीत होते ! राष्ट्रांतील तरुण जोंपर्यंत शरीरानें व विशेषतः मनानें दुर्बल असतात तोंपर्यंत तें परतंत्र राष्ट्र स्वतंत्र होण्याची आशा कधींच करावयास नको. वसंतरावांसारखे आपली स्वतःची तूप पोळी कायम ठेवण्यासाठीं झटणारे तरुण देशाच्या काय उपयोगीं पडणार ! आणि आजच्यासारख्या देशाच्या परिस्थितींत तर निव्वळ स्वार्थासाठीं तळमळणारे तरुण हे तर देशाचे वैरीच होत. मग काय देशाच्या वैऱ्याबरोबर विवाह करून मी देशाची वैरीण होऊं ? छे. हें कधींच शक्य नाहीं. बाकी यामुळें एक गोष्ट मात्र अगदीं स्पष्ट झाली. ती ही कीं वसंतरावांची व माझी जातच एक नाहीं. मूळ स्वभावांतच जमीन अस्मानाची तफावत आहे. माझी व त्या कृष्णरावांची आणि जोशांची एक जात आहे. वसंतरावांनीं कान भारल्यामुळें मी त्या दोघांविषयीं अगदीं निष्कारण गैरसमज करून घेतला. तें कांहीं नाहीं. पुनः त्यांची माझी गांठ पडली तर मी अगदीं सर्व गोष्टींचा साफ साफ उलगडा करून घेणार; आणि जरी माझ्या हातून त्यांचा बुद्धिपुरस्सर अपमान झालेला नसला तरी त्या माझ्या बोलण्यानें त्यांना आपला अपमान झाल्याचा भास झाला म्हणून सुद्धा मी त्यांची अगदीं प्रांजलपणें क्षमा मागणार. त्यांत कमीपणा कसला आला आहे ? उलट हें तर माझें कर्तव्य आहे. आपल्या कर्तव्याला जागणाऱ्या तरुणासमोर लीन होणें यांत कमीपणा वाटण्यासारखें कांहींच नाहीं. हो; आणि खरेंच ! उद्यां उठल्यावरोबर आप्पांनाही मला सांगून टाकलें पाहिजे कीं मी वसंतरावांशीं विवाह करण्यास मुळींच तयार नाहीं म्हणून ? त्यांत त्यांनाही सुख लागणार नाही—मीही सुखी होणार नाहीं. मी एकवेळ सुखी झालें नसतें तरीही हरकत नव्हती; पण त्यांच्याशीं विवाहबद्ध झाल्यानें मला माझें कर्तव्यच करतां येणार नाहीं. कारण देशासाठीं झीज सोसणें हें मला माझें कर्तव्य वाटणार तर आपलें घर भरणें व आपल्या स्वार्थाला काडीचाही धक्का लागूं न देणें हें त्यांना आपलें कर्तव्य वाटणार. कारण एक तर असल्या प्रवृत्तीच्या माणसाच्या अंतःकरणांत देशभक्तीचें वारें कधीं स्फुरावयाचें नाहीं आणि दुसऱ्यांच्या टोंचणीनें कधीं काळीं तें संचारलेंच तर त्यांतल्या त्यांत तो अशी गोष्ट शोधून काढावयाचा कीं लोकांपुढें, देशकार्य करणारा म्हणून तर टेंभा मिरवितां यावा आणि इकडे तर आपल्या घरांत द्रव्यभरणा अव्याहत सुरू

रहावा ! तेव्हां असल्या स्वार्थी तरुणाची पत्नी होणें हें दोघांनाही इष्ट नाहीं. त्यांची स्वार्थी दृष्टि माझ्या देशकार्यांत विघ्नें उपस्थित करणार आणि माझी देशहितेच्छु दृष्टि यांना यांच्या इच्छेप्रमाणें स्वार्थ साधूं देण्यांत एकसारखे अडथळे उत्पन्न करणार ! तेव्हां दोघांनाही अनिष्ट असणारी गोष्ट करण्यापासून काय लाभ? पण आप्पांनीं 'मग तुला लग्न तरी कोणाशीं करावयाचें आहे,' असें विचारलें तर काय उत्तर देणार? पण ते असें विचारतीलच कशावरून ? उगाच त्या गोष्टीचा आतांपासून आपल्या डोक्याला शीण कां करून घ्या ?"

वसंतरावांशीं विवाह करण्यास आपण तयार नाहीं हें आप्पासाहेबांना उजाडल्याबरोबर सांगावयाचें असा तिनें निश्चय केल्याबरोबर तिला एकदम आपल्या छातीवरील कसलें तरी दडपण उतरल्यासारखें वाटलें. तिला स्वतःला देखील तोंपर्यंत आपल्या स्वतःच्या अस्वस्थतेचें कारण माहीत नव्हतें. तिला आतां अगदीं शांत वाटूं लागलें. डोकें शांत झाल्यावर झोंप येण्यास काय उशीर ?

इकडे वसंतही बिचारा या कुशीवरून त्या कुशीवर लोळणें घेत होता. जिला आपण आपली भावी पत्नी म्हणून ठरविली होती तिची आपल्या विचारांशीं अगदीं विसंगत असलेली वृत्ति पाहून त्यांना सहाजिकच वाईट वाटत होतें.

" निव्वळ भावनेनें उसळून जाणाऱ्या या मुलीशीं विवाह करून आपल्याला सुख लागेल काय ? नुसत्या भावनेनेंच जर सर्व कार्यें होत असतीं तर परमेश्वरानें मनुष्याला बुद्धि तरी दिली असती कशाला ? परमेश्वरानें मनुष्याला दिलेल्या सर्व गोष्टींत सर्वांत श्रेष्ठ जर बुद्धि असें मानतात व तें सर्वांशीं सत्यही आहे,–तर तिचा उपयोग न करतां नुसत्या भावनेला बळी पडणें मूढपणाचें लक्षण आहे. अशिक्षित माणसांच्या बाबतींत ही गोष्ट एक वेळ क्षम्य मानली जाईल. पण सुशिक्षितांनीं असा मूर्खपणा करणें म्हणजे ईश्वराचा अक्षम्य अपराध करणें होय. दिलेल्या भांडवलाचा कुळानें योग्य उपयोग केला नाहीं, म्हणजे सावकाराचा ज्याप्रमाणें त्याच्यावर कोप होतो, त्याचप्रमाणें परमेश्वरानें आपणांस दिलेल्या या बुद्धिरूप भांडवलाची आपण जर नीट जोपासना केली नाहीं तर आपल्यावर त्याचा रोष झाल्याशिवाय कसा राहील ? हे पुढारी म्हणजे लेकाचे अगदींच पढतमूर्ख ! भलत्याच रोगाला भलतीच औषधयोजना करतात ! तिकडे पंजाब्यांची झाली कत्तल म्हणून म्हणे आम्ही महाराष्ट्रीयांनीं शाळा कॉलेजें ओस पाडावीं ! पंजाब्यांचीच तेवढी सरकारनें

कां कत्तल केली ? आम्हा महाराष्ट्रीयांची किंवा तिकडे त्या वऱ्हाडी लोकांची नाहीं कुठें केली ती ? लेकाच्यांनीं कांहीं तरी गाढवपणा केला असेल, त्याचें प्रायश्चित्त त्यांना भोगावें लागलें ! त्यांत एवढें आकांड तांडव करण्यासारखें काय आहे ? मूळांतच जर आपल्या लोकांची चूक तर सरकार अंतःकरणाचें कितीही कनवाळू असलें तरी काय रडणार आहे ? म्हणजे काय मजा आहे पहा ! आपल्याच लोकांनीं अगोदर अविचारानें कांहीं तरी मूर्खपणा करावयाचा आणि त्याबद्दल सरकारनें योग्य अद्दल घडविली म्हणजे त्या यथान्याय वागणाऱ्या सरकारला शिव्यांची लाखोली वहावयाची ! आणि इकडे त्यांचा कांहींएक अपराध केलेला नसतांना या पुढाऱ्यांनीं आम्हा तरुण मुलांमुलींना शाळा कॉलेजें सोडण्याचा उपदेश करून आमचा अप्रत्यक्ष रीतीनें बळी घ्यावयाचा—जिवंत असून मेल्यासारखी स्थिति करून टाकावयाची ! काय लेकाचा अगदीं जीव तोड तोडून सांगत होता कीं जनरल डायरनें निरापराध लोकांचे नाहक बळी घेतले म्हणून ! अरे पण त्यानें तसे बळी घेतले त्याला त्याच्या म्हणण्याप्रमाणें कांहीं कारण तरी होतें. पण तुम्ही तर आम्ही तुमच्याच व आमच्याही दृष्टीनें सर्वथैव निरापराधी असतांना आमच्या जन्माचें वाटोळें करण्यास उद्युक्त झालां आहांत. मग त्यापेक्षां सर्वांनीं एकदम जीव द्यावा असा ठराव कां नाहीं पसार करीत ? जिवंतपणीं अहोरात्र मरणाचे भोग भोगीत आयुष्य कंठण्यापेक्षां एकदांच मरून गेलेलें पत्करलें ! याच लेकाच्यांना स्वराज्याची जशी कांहीं तहान लागली आहे आणि आम्ही जसे कांहीं सरकार उद्यां ते घ्या म्हणून पाठीसच लागलें तर 'छे-छे-छे—आम्हांला कशाला हवें आहे स्वराज्य ? आम्हाला तें संभाळतां तरी येणार आहे का ? तुम्ही आमचा सांभाळ करीत आहां तेंच ठीक आहे,' असें म्हणून तें आम्हीं पदरांत पाडून घेण्यास तयार होणार नाहीं ? पिंजऱ्यांत कोंडलेल्या—बुद्धीनें माणसांपेक्षां कितीतरी खालच्या दर्ज्यावर असणाऱ्या एकाद्या पक्षाला सुद्धां जर पिंजऱ्याबाहेर आपल्याला स्वतंत्र रीतीनें विहार करण्याची संधि कधीं मिळेल का अशी उत्कंठा लागलेली असते तर आम्हा बुद्धीच्या भांडारांना स्वातंत्र्य नको असें वाटणें कसें शक्य आहे ? पण म्हणून तो पोपट रात्रंदिवस त्या पिंजऱ्याच्या कठड्यावर आपलें डोकें आपटून किंवा पंख फडफडावून आपला प्राण सोडीत नाहीं. असें रागावून किंवा रुसून आणि फुगून काय कार्य करतां येणार आहे ? एकदां आपल्याला कळून चुकलें कीं हें सरकार अति सामर्थ्यवान व महाबलाढ्य आहे. तें मनांत आणील

तेव्हां आपल्याला चिरडून टाकील. मग त्याच्याच इच्छेप्रमाणें-सवडीसवडीनें-सवलती सवलतीनें-हप्त्याहप्त्यानें तें देईल तेव्हां व देईल तेवढें तेवढें आपल्या पदरांत पाडून घेत जावें. हाच तर बुद्धीचा खरा उपयोग. आपल्या जवळ शारिरिक बळ नाहीं, यांत्रिक बळ नाही, तेव्हां पडतें घेऊन-चुचकारून-आंजारून गोंजारून-आपलें काम साधून घेण्यांतच खरें व्यवहारचातुर्य-खरा शहाणपणा आहे; आणि अशासाठीच आपल्या बुद्धिवैभवाचा भरपूर उपयोग करून घेतला पाहिजे. उगीच डोक्यात राख घालून काय होणार ? बरें-ते पुढारी येऊन आपलें कांही तरी सांगत सुटतात तर सुटतात, पण या लोकांच्या तरी, आपलें त्या पुढाऱ्यांच्या सांगण्याप्रमाणें वागण्यांत परिणामीं अहित आहे हें कसे लक्षांत येत नाहीं ? बिचाऱ्याच्या बुद्धिमांद्याची कींवच करावीशी वाटते. मला इतके दिवस या मालतीताईबद्दल बऱ्याच hopes वाटत होत्या. पण बरें झालें कीं आम्ही विवाहबंधनानें बद्ध होण्याच्या पूर्वींच हा भ्रमाचा भोंपळा फुटला. नाहीं तर ती यातायात कोण करीत बसला असता ? त्या व्याख्यात्याच्या व्याख्यानामुळें मालतीताईचें जरी नुकसान झालें असलें तरी त्यांचा स्वभाव मला लग्नाअगोदरच समजल्यामुळें माझा मात्र फायदा झाला. यांच्याशीं लग्न लावून मी माझें जन्माचें वाटोळें करून घेतलें असतें. हो. म्हणजे मी पडलों बुद्धिप्रधान आणि या अशा भावनाप्रधान ! म्हणजे आटोपलाच संसाराचा कारभार ! त्या लीलाताईचा नवरा तरी बिचारा भाग्यवानच म्हणावयाचा ! बिचारा मरून गेला. सुटला ! नाहीं तर आपल्या पत्नीचा हा अमला मूर्खपणा सांवरतां सांवरतां त्या बिचाऱ्याच्या नाकीं नव आले असते ! बस् झालाच निश्चय कायम. या मालतीताईशीं लग्न तर करावयाचें नाहीच नाहीं. आतां त्यामुळें आप्पासाहेबांना व अण्णासाहेबांना जरासें वाईट वाटेल ! पण त्याला काहीं इलाज नाहीं. या जन्माच्या गाठी आहेत. पुढें मग निस्तरण्याचा प्रयत्न करीत बसण्यापेक्षां आधींपासूनच सावधगिरी बाळगिलेली काय वाईट ? उद्यां उठल्याबरोबर मालतीताईची भेट घेऊन त्यांना अगदीं स्पष्ट सांगून टाकणार कीं तुम्ही पुनः कॉलेजांत जाण्यास तयार होत असाल तरच आपला विवाह कायम होणार आहे असें समजा. नाहीं तर मी त्याला बिलकुल तयार नाहीं. बाकी माझ्यावर त्यांचें गाढ प्रेम असल्यामुळें मी असें म्हटल्यावर त्यांना माझें ऐकल्याशिवाय रहावणारच नाहीं म्हणा ! मी तरी उगाच आपला कांहीं तरी विचार करीत बसलों आहे झालं ! इतकी सोपी मात्रा माझ्या संग्रहीं असतांना त्यांचा बिघडलेला मेंदु ताळ्यावर येण्यास

काय उशीर लागणार आहे! हो. रोग बळावण्यापूर्वीच जालीम उपाययोजना केलेली बरी." या कल्पनेनें उत्पन्न झालेल्या आशेनें त्याला लवकरच अगदीं गाढ झोंप लागली.

इकडे आप्पासाहेबांचीही जवळ जवळ अशीच स्थिति झालेली होती. मालतीवर सक्ती करतां येत नाहीं आणि वसंताची समजूत घालतां येणार नाहीं. अशा रीतीनें त्यांना इकडे आड व तिकडे विहीर असें झालें होतें. न जाणों या क्षुल्लक वाटणाऱ्या गोष्टीचा त्यांचें जमलेलें लग्न फिसकटण्यांत तर पर्यवसान होणार नाहींना! म्हणजे मात्र आपला साराच बेत ढांसळला. अगदीं आपल्या घरच्याच-सारखा दुसरा जांवई शोधीत कुठें फिरावयाचें? तें तसें नाहींच कामाचें. आपल्याला तर बुवा मालती आपल्यापासून कायमची दूर राहिली तर जीव अगदीं वर आल्यासारखें होऊन जाईल; कांहींही करून तिचें मन वळविलेंच पाहिजे. बाकी हें तुझें करणें मला बिलकुल पसंत नाहीं आणि तुला फिरून कॉलेजांत जाऊं लाग-लेंच पाहिजे असें मी तिला निःक्षून सांगितल्यावर मला नाहीं वाटत कीं ती आप-लाच हेका चालू ठेवील म्हणून! शिवाय वसंतावर तिचें प्रेम असल्यामुळें तोही तुझ्याशीं तूं आमच्या सांगण्याप्रमाणें वागली नाहींस तर लग्न करण्यास तयार नाहीं, असा तिला धाक घातल्यावर तर पहायलाच नको! अगदीं रामबाण मात्रा! बाकी झालें हेंही एका दृष्टीनें काहीं वाईट नाहीं. म्हणजे तिचें वसंतावर किती निश्चल प्रेम आहे हें ती आपलें तत्त्व सोडून प्रेमाखातर त्याच्या मताप्रमाणें वागली म्हणजे त्याला नीट कळून येईल. प्रेमासाठीं प्रत्यक्ष तत्त्वावरही पाणी सोडण्यास तयार होणें म्हणजे तें प्रेम किती तीव्र असलें पाहिजे? उद्यां उठल्याबरोबर पहिलें हेंच काम. मालती पोर अगदीं गरीब आहे म्हणा! मी जरासा आपल्या चेहऱ्यावर गांभीर्याचा आव आणला म्हणजे ती भेदरूनच जाईल. बाकी तिला भेदरलेली पाहिल्यानंतर माझें गंभीरपणाचें सोंग मला तरी कायम ठेवतां येईल कीं नाहीं कोणास ठाऊक! पाहूं या आतां कसें काय जमतें तें!"

लीलाताईला घरीं आल्यानंतर विरोध करण्यालाच कोणी नव्हतें. तिचे वडील ती म्हणेल ती गोष्ट कबूल करीत असत. तिच्याबद्दल त्यांची प्रत्येक बाबतींत अगदीं पूर्ण खात्री असल्यामुळें, ते ती जी कांहीं गोष्ट करी तिला आपली पूर्ण पसंती दर्शवीत. असें असून सुद्धां तिच्या डोक्यांत कोणतेच विचार येत नव्हते असें मात्र नाहीं. तिला मालतीनें कॉलेज सोडलें व ही गोष्ट वसंतरावांना म्हणजे तिच्या भावी

पतिराजांना मुळींच पसंत नाहीं हें कळून आलें असल्यामुळें त्याबद्दल तिला जरा काळजी वाटूं लागली होती. मालतीसंबंधानें तिला अगदीं खात्री वाटत होती. निव्वळ तत्त्वनिष्ठे-मुळेंच तिनें आपलें शिक्षण तहकूब केलें. पण वसंतरावांप्रमाणेंच तिच्या आप्पांनाही हें तिचें करणें जर आवडलें नाहीं व त्या दोघांनीं तिचें मन बदलण्याचा प्रयत्न केला तर ही भाबडेपणानें त्यांच्या सागण्याप्रमाणें वागण्यास तयार होईल कीं काय ? माणसानें गरीब असावें पण भाबडें किंवा परप्रत्ययनेय बुद्धीचें असूं नये. एकदां आपलें म्हणून एक तत्त्व ठरविलें कीं तें कायम असावें. मग तें आपण आचरीत असता अमक्याला काय वाटेल आणि तमक्याला काय वाटेल अशा विचारानें भांबावून त्यापासून ढळून उपयोगाचें नाहीं. त्या कृष्णरावांचें बिचाऱ्यांचे तर आतां किती नुकसान होणार आहे ? पण त्यांनीं त्याची कांहीं तरी पर्वा केली आहे का ? तेजस्वी तो तेजस्वीच. दारिद्र्याची राखाडी वर सांचलेली असली तरी त्यामुळें अंतःकरणांतील जळती ज्योत कांहीं विझत नाहीं. फायद्याकरितां आपला जीव घालविणारांना नुकसान झाल्याची भीति ! बेदरकार माणसाला काय त्याचें ? तो असेंच म्हणणार कीं आजपर्यंत माझे काय कमी हाल झाले आहेत कीं पुढें हाल होणार आहेत म्हणून मी डर बाळगावी ? अशीं कोणतीं सुखें मी आजपर्यंत उपभोगिलीं आहेत कीं तीं आतां मला अंतरणार म्हणून मी हळहळावें ? अशा माणसाचें मूर्तिमंत उदाहरण डोळ्या-समोर असतांना मालती आपल्या आप्पांना किंवा वसंतरावांना वाईट वाटेल म्हणून त्यांच्या सांगण्याप्रमाणें वागण्यास तयार होईल का ? प्रेमाचा ती तत्वावर वरचष्मा होऊं देईल का ? उद्या ती भेटल्यावर तिला सांगून तर पहावें ! पण ती कितीही गरीब किंवा भोळसर दिसली तरी तिच्या अंगीं तडफ आहे, हें आज संध्याकाळीं प्रत्यक्षच दिसून आलें म्हणा ! पण न जाणों, कोणी नेम सांगावा ? " असा विचार सुरू असतांना तिला केव्हां झोंप लागली तें समजलें सुद्धां नाहीं.

---

# प्रकरण १७ वें.

कृष्णाची खात्री होती कीं दादासाहेबांचें मत आतां कांहीं केलें तरी फिरणें शक्य नाहीं. तेव्हां सकाळीं उठल्याबरोबर दादांना फिरून आपल्या तेथें रहाण्यासंबंधानें कांहीं विचारण्याच्या भानगडींत तो पडला नाहीं. तेव्हां विनाकारण वेळ फुकट दवडण्यापेक्षां आपली दुसरीकडे कोठें सोय लागते का पहावी, म्हणून तो व केशव बाहेर पडले. त्यांचे मुंबईत स्नेही म्हणविणारे बरेच ओळखीचे लोक होते. पण आतां यांच्यासाठीं प्रत्यक्ष झीज सोसण्याची पाळी येतांच जो तो नामानिराळा होऊं लागला. केशवाला तोंपर्यंत आपल्याबद्दल लोकांना वाटत असलेल्या सहानुभूतीबद्दल अगदीं खात्री वाटत होती. पण आज प्रत्यक्ष अनुभवानें त्याच्या चांगलेंच प्रत्ययाला आलें कीं जगांत खरीं नाणीं अगदीं विरळा. नकली नाणींच फार ! आतां हें लाजिरवाणें तोंड घेऊन पुनः बाबांकडे जावयाचें काय ? आणि आपण एकटे गेलों तर कृष्णाची काय व्यवस्था ?

**के०**—" कृष्णा, मला आतांपर्यंत या आपल्याला मित्र म्हणविणाऱ्या लोकांसंबंधीं अगदीं खात्री वाटत होती. पण आज अनुभव अगदींच निराळा आला. इतके दिवस मित्रत्वाचें ढोंग उभारणाऱ्यांनीं आपल्याला चार आठ दिवसापुरता देखील थारा देण्यास तयार होऊं नये, हें आश्चर्य नव्हे का ? "

**कृ०**—" तुझ्यासारख्या निष्कपट व सरळ वर्तणुकीच्या माणसाला यांत आश्चर्य वाटावें यांत कांहीं नवल नाहीं. मला मुळीं पूर्वीपासूनच खात्री होती कीं यांपैकीं एकही मनुष्य माणुसकीला जागून आपल्याला थारा देण्यास तयार होणार नाहीं म्हणून ! आपले अमुक अमुक मित्र असा पुष्कळदां माणसाला भ्रम होत असतो. म्हणून त्यांपैकीं खरे कोण व वरकरणी भासविणारे ढोंगी कोण हें प्रत्येकानें नीट पाहिलें पाहिजे. तुझ्या पोरकटपणामुळें तुझ्याशीं हंसून खेळून असणारा प्रत्येक मनुष्य तुला मित्र वाटतो. पण मी या ढोंग्यांना पुरा ओळखून होतों. पण म्हटलें तुझेंही एकदां समाधान होऊं दे आणि कळून येऊं दे कीं जग हें किती अस्सल ढोंग्यांनीं भरगच्च भरलेलें आहे ! "

**के०**—" मग आपलें काम यांच्या हातून होणार नाहीं ही तुला स्वतःला अगदीं खात्री वाटत असतां या ढोंग्यांकडे हेलपाटे घालण्याचे श्रम तरी कशाला

घेतलेस व मलाही घेववलेस ? यांत झालें काय की आपला कार्यभाग तर साधला नाहींच पण या बेट्यांना मात्र अगदीं फुकटचा मोठेपणा मिळाला. आतां ते ज्याला त्याला सांगत सुटतील कीं मारे देशकार्य करण्याकरितां यांनीं कॉलेज सोडलें आणि आपल्या घरांतून यांची उचलबांगडी होतांच आमच्या इथें भिकाऱ्यांसारखें चार आठ दिवस आमची सोय करूं शकाल कांहो तुम्ही, असें म्हणत आमचा उंबरठा झिजवावयाला आले ! छे बुवा. यामुळें मला तर अगदीं मेल्याहून मेल्यासारखें झालें आहे. मला जर याबद्दल तुझ्यासारखी खात्री वाटत असती तर मी या खटाटोपांत पडलों नसतों."

कृ०—"हीच तुझी विचारसरणी चुकते ती आपल्या घरांतून आपल्याला काढून लावल्यामुळें आपल्याला यांचे उंबरठे झिजविण्याची पाळी आली यांत जसा आपला गरजूपणा दिसून आला त्याप्रमाणेंच आपले मित्र म्हणवीत असतां एवढी साधी गोष्टही करण्यास त्यांनीं कबूल होऊं नये यांत त्यांचा नादानपणाही नाहीं का दिसून आला ? त्यांनीं आपल्याला गरजू किंवा भिकारी म्हणून हिणविलें तर आपण त्यांना नादान म्हणून हिणवूं यांतही एक प्रकारें आपला फायदाच झाला आहे. कसा तो पहा. उद्यां समज आपण आपल्या उपजीविकेकरितां कांहीं दिवसांपुरतें अगदीं नाइलाज म्हणून एखादे हलकें काम करूं लागलों म्हणजे करण्याचीच पाळी आली तर त्या वेळीं हेच म्हणाले असते, 'काय लेकाचे विक्षिप्त आहेत पहा ! आम्ही इतके मित्र या मुंबईत जिवंत असतांना आपलें पोट जाळण्याकरितां हे इतकें हलकें काम करीत आहेत ! आम्हाला विचारलें असतें तर कांहीं दिवस यांची गरज भागविण्याला आम्ही असमर्थ होतों कीं काय ? पण अभिमान ना ? आमच्याकडे येऊन तोंड वेंगाडण्याची यांना लाज वाटली. आणि असला हलका धंदा करतांना तें मोठें भूषण वाटत आहे !' तशी संधि यांना मिळूं नये म्हणूनच मला हा सगळा व्याप करावा लागला."

के०—"पण ज्यांच्या संबंधानें तुला इतकी खात्री वाटत होती, त्यांच्या आक्षेपांसंबंधानें तरी तुला पर्वा करण्याचें कारण काय ? जाऊं दे. आतां झालेली गोष्ट कांहीं परत येत नाहीं. पण आतां आपण आपली सोय तरी कोठें आणि कशी लावायची ?"

कृ०—"हाच तर मोठा बिकट प्रश्न आहे. कांहीं तरी केल्याशिवाय तर गत्यंतर नाहीं आणि करावयाचें काय हें तर सुचत नाहीं. माझ्या किंवा तुझ्या हातांत एखादी आंगठी असती तरी आपलें काम भागलें असतें. पण आपल्याजवळ सुतळीचा तोडा

मिळण्याचीच पंचाईत मग आंगठीची गोष्ट कशाला? जाऊं दे झालें. जें नाहीं त्याबद्दल विचार करण्यांत तरी काय हंशील? सध्यां तर आतां आपल्या घरीं जाऊं या."

**के०**—"शाबास! म्हणजे तुझ्या दादासाहेबांनीं आपल्याला घरांत पाऊल टाकण्याचीही बंदी केली आहे, हें तूं विसरलास वाटतें?"

**कृ०**—"हं:! ज्यामुळें आपल्याला इतकी पायपीट करावी लागली तें मी कसें विसरेन? तेथें रहाण्याच्या उद्देशानें किंवा आशेनें आपल्याला तिकडे जावयाचेंच नाहीं. तेथें जाऊन माझीं पुस्तकें तेवढीं काढून घेऊन तेथून बाहेर यावयाचें."

**के०**—"म्हणजे आपण असे भटक्या मारीत फिरणार आणि तें आणखी पुस्तकांचें लोढणें कशाला गळ्यांत अडकवून घ्यावयाचें? नुसतें फिरण्यापेक्षां ते वजन हातांत घेतल्यानें चालतांना जरा जोम येणार आहे वाटतें? बाकी तुझेंही एका अर्थीं बरोबर आहे. आपलेच हात आणि आपलेच पाय. तेव्हा पायांना मेहेनत पडत असतांना हातांना रिकामें ठेवण्याचा पक्षपात आपण कसा करावा? पण या निःपक्षपातीपणांत—"

**कृ०**—"अरे पण माझा पुढें काय बेत आहे हें तर पुरतेपणीं ऐकून घेशील? तें लोढणे कांहीं आपल्याला एकसारखे संभाळून ठेवावें लागणार नाहीं. उलट कांहीं वेळ तें संभाळल्यानें पायांचा बराचसा त्रास वांचणार आहे."

**के०**—"हां. मग ठीक आहे. पायांचा त्रास चुकविण्याला जर त्या वजनाचाच उपयोग होणार असेल तर मी तुला सुद्धां माझ्या खांद्यावरून कांहीं वेळ नेण्यास तयार आहें."

**कृ०**—"पण माझ्याबद्दल तुला पैशांचा मोबदला कोण देणार? मला फुकट सुद्धां कोणी घ्यायला तयार नाहीं हें तूं आतांपर्यंत पाहिलेंसच."

**के०**—"म्हणजे? आपलीं पुस्तकें तूं विकणार कीं काय?"

**कृ०**—"होय. त्यावांचून आतां गत्यंतर नाहीं. तीं आपल्याला कितीही प्रिय असलीं तरी तीं विकून येतील ते पैसे घेतलेच पाहिजेत."

**के०**—"अरे पण तीं विकून तरी असे कितीसे पैसे मिळणार आहेत?"

**कृ०**—"सध्यां आपल्याजवळ कांहींच नाहीं, त्यापेक्षां जे थोडेसे मिळतील ते ज्यास्तच आहेत ना! अगदीं दहापांच रुपये मिळाले तरी पुष्कळ झालें."

के०—" म्हणजे काय फार तर आपल्या दोघांची आठ दिवसांची पोटगी ! आणि ते संपल्यानंतर काय सापासारखें वायु भक्षण करून रहावयाचें कीं काय ? "

कृ०—" आपल्याला मुळीं आपल्या पुढाऱ्यांचा पुढील कार्यक्रम काय तो नक्की झाल्यावर ते सांगतील तिकडेच जावयाचें आहे. तोंपर्यंत कशी तरी गुजराण करावयाची म्हणजे झालें. आणि नुसत्या त्या पैशांवरही अवलंबून राहून आपलें भागणार नाहीं. कारण पुढाऱ्यांना महिना पंधरा दिवस काय तो कार्यक्रम आंखतां आला नाहीं तर ? आपण असेंच करावयाचें. माझीं पुस्तकें विकून जे कांहीं पैसे हातांत पडतील तेवढ्याचीं उद्यां सकाळीं उठल्याबरोबर वर्तमानपत्रें खरेदी करावयाचीं व तीं विकून जितके पैसे आपल्याला मिळतील तेवढ्यांतच आपलें कसें तरी भागवायचें ! यांत कोणाची काय चोरी आहे ? आपणाला ज्यांच्यापासून थोड्याफार मदतीची आशा व अपेक्षा होती त्यांनीं ती आपणांस देण्याचा इन्कार केला. आतां कांहीं तरी करून हें पोट जाळलें तर पाहिजेच ना ? "

के०—" पण आपल्यासारख्या कॉलेज स्टूडंट्सनीं वर्तमानपत्रें विकीत रस्त्यावरून हिंडणें अगदींच कमीपणाचें नाहीं का ? "

कृ०—" कमीपणाचें आहे यांत शंकाच नाहीं. पण आपल्याला हा धंदा कांहीं जन्मभर करावयाचा नाहीं. सध्यां आपण फार अडचणीच्या परिस्थितींत आहोंत. हा आपला आपत्काल आहे. पण अशा स्थितींतही कोणी आपल्याला, आपल्या उपकाराच्या ओझ्याखालीं आपल्याला दडपून टाकण्याच्या हेतूनें मदत करण्यास तयार झाला तर ती सुद्धां स्वीकारण्यास मी तयार होणार नाहीं. आज आपण ज्यांच्याकडे गेलों होतों, त्यांपैकीं कोणी उद्यां आपल्याला रस्त्यांत वर्तमानपत्रें विकीत असतांना पाहून, तसलें हलकें काम करण्यापासून आपली मुक्तता करण्याकरितां आपल्या घरीं घेऊन जाण्याचें सोंग करूं लागला तरीही त्याच्याबरोबर जाण्यास मी तयार होणार नाहीं. आपल्याला या स्थितींत मदत करण्यास तयार झालेल्या मनुष्याला जर तसें करणें हें त्याचें कर्तव्य असें वाटत असेल तरच मी त्यानें प्रेमानें देऊं केलेली मदत स्वीकारण्यास आपला हात पुढें करीन. दुसऱ्यांचे उपकार म्हणून तूपपोळी खाण्यापेक्षां वर्तमानपत्रें विकूनच काय पण हमालीसारखें काम पत्करूनही—उजळ माथ्यानें मिळविलेली मीठभाकर मला अधिक मोलाची व अधिक श्रेयस्कर वाटेल. आजपर्यंत अत्यंत थोर म्हणून मानल्या जाणाऱ्या कित्येक महात्म्यांना आपल्याला कल्प-

नाही करवणार नाहीं इतकीं निकृष्ट कामें कांहीं कांहीं वेळीं करावीं लागलीं आहेत! म्हणजे हलकीं कामें करण्यास तयार झालेले तेवढे सर्व महात्मे असें माझें म्हणणें नाहीं. पण एवढ्या थोर लोकांनाही विपन्नावस्थेंत जर अगदीं हलकीं कामें करावीं लागलीं आहेत, तर आपण काय? आपण यःकश्चित् माणसें! आपल्यावर कांहीं दिवस असलें हलकें काम करण्यास प्रसंग आला तर त्याबद्दल हळहळण्यासारखें किंवा मरण-प्राय संकट वाटण्याचें कांहींच कारण नाहीं."

**के०**—"तुझें म्हणणें अगदीं खरें आहे आजवर आपले मित्र म्हणविणाऱ्या कपटी लोकांची परीक्षा लागलीच! मग आतां आणखी अगदीं अनोळखी ठिकाणीं जाऊन तरी काय होणार आहे? त्यापेक्षां तूं काढलेली योजनाच ठीक आहे."

मनाची एकदां तयारी झाल्यावर मग काय? कोणतीही गोष्ट एकदां आपल्या सदसद्विवेकबुद्धीनें 'सत्य' म्हणून ग्रहण केली म्हणजे ती तडीस लावतांना कोणतीही संकटें उत्पन्न झालीं तरी त्यांस न डगमगतां तसेंच नेटानें पुढें चालावयाचें हेंच तर मनाच्या खंबीरतेचें व धीरोदात्तपणाचें मुख्य लक्षण आहे. कृष्णाला त्यादि-वशीं त्याचे मित्र म्हणविणाऱ्या लोकांचीं जीं बोलणीं ऐकावीं लागलीं त्यांचें त्याला स्मरण झालें व संतापही आला. निव्वळ आम्ही सरकारी संस्थांतून शिक्षण घेण्याचें आमच्या राष्ट्रांतील थोर पुरुषांच्या सांगण्याप्रमाणें तहकूब केलें म्हणजे हा आम्ही कांहीं भयंकर व अक्षम्य अपराध केला, असें या लोकांना वाटतें कीं काय? काय एकेकाच्या कल्पना असतात पहा! काल संध्याकाळीं आम्ही जे होतों ते या पंधरा सोळा तासांत अजिबात बदलून गेलों आहोंत असेंच यांना वाटतें! काय एकेक मारे आम्हाला अक्कल शिकविण्याचा आव आणीत होते! काय म्हणे 'पहा बुवा. केशवाचें एक असो. त्याला घरीं आई, वडील वगैरे माणसें तरी आहेत. उद्यां त्याला घरीं जाण्याची इच्छा झाली तर कांहीं सोय तरी आहे पण तुझे काय हाल होतील याचा तूं कांहीं तरी विचार केला आहेस का? आज इतकीं वर्षें निव्वळ उच्च शिक्षण मिळविण्याच्या महत्त्वाकांक्षेमुळें तूं हालांत दिवस काढलेस. आतां एवढी हातीं-तोंडीं आलेली परीक्षा पदरांत पाडून घेऊन मोकळा हो. म्हणजे इतके दिवस सोस-लेल्या कष्टांचें चीज तरी झालें. उद्यां ही उठलेली लाट ओसरून गेल्यावर तुझा तुलाच पश्चात्ताप होईल. पण पश्चात् तापच तो! त्याचा त्या वेळीं काय उपयोग? त्या वेळीं पाण्याच्या अश्रूंऐवजीं रक्ताचे अश्रू गाळले तरी झालेलें नुकसान थोडेंच भरून निघणार आहे? कां यंदां failure येणार अशी भीति वाटत आहे मनांत

म्हणून झांकली मूठ सव्वालाखाची ठेवण्याकरितां या वाहत्या गंगेंत हात धुवून घेण्याचा मोह आंवरला नाहीं ? फुकटचा मोठेपणाही पदरीं आला आणि पुढें पदरीं येणारें अपयशही टळलें ! बाकी असें असणें बहुतेक शक्य नाहीं म्हणा. कारण आजवरचा तुझा रिझल्ट कांहीं असें आम्हाला खात्रीपूर्वक सांगूं शकत नाहीं. पण खरेंच कायरे ? हें वेड तुझ्या डोक्यांत कोठून शिरलें ? त्या मालतीबाईंनीं व लीलाताईंनीं तुझ्या अगोदर सही केली असती तर त्यांच्या मागोमाग त्यांना आपल्याबद्दल सहानुभूति वाटावी म्हणून तूं गेलास असें तरी आम्हाला म्हणतां आलें असतें. पण तूं तर अगदीं आघाडीच मारलीस ! अरे, आम्हाला सुद्धां पहिल्या प्रथम अशी उकळी आली होती. पण आम्ही नाहीं का ती विचारानें दाबली ? अगो-दर प्रत्येकानें आपलें हित पहावयास नको का ? प्रत्येक व्यक्ति म्हणजे समाजाचा एक घटक असल्यामुळें प्रत्येकानें आपले हित साधलें म्हणजे सर्व समाजाचें आपोआपच हित साधलें नाहीं का ? तेव्हां हा असला अविचार करूं नको. अशा रीतीनें वाहत्या प्रवाहाबरोबर वहावत जाणें, हें कांहीं तुझ्यासारख्या बुद्धिवान माणसाला शोभत नाहीं. तूं आपलें आमचें ऐक. वागलास या पुढाऱ्यांच्या सागण्याप्रमाणें पण मदत मागण्याची पाळी येतांच तुला धांव घ्यावी लागली आमच्याकडेच. हेंच प्रत्यक्ष प्रत्यंतर पहा म्हणजे तुला आपोआपच कळून येईल कीं पुढाऱ्यांच्या सांगण्यापेक्षां आमच्या सांगण्याप्रमाणें वागण्यांतच तुझें अधिक हित आहे. काय लेकाचे अहंमन्य आहेत पहा ! म्हणे इतके दिवस हालांत काढलेस त्याप्रमाणें एकदां एवढी परीक्षा पदरांत पाडून घे म्हणजे सुटलास ! बाकी हे लेकाचे आपल्या पोराला बोहो-ल्यावर टाकून शिवाजी महाराजांच्या आज्ञेप्रमाणें कोंडाणा किल्ला सर करण्यास सिंहा-प्रमाणें धांवून जाणाऱ्या नरश्रेष्ठ तानाजीचीसुद्धां मूर्खांतच गणना करावयाचे ! हो— आतां इतकी सगळी लग्नाची तयारी झालेली—हजारों ठिकाणचे हजारों लोक गोळा झालेले—तेवढें लग्न उरकून घेऊन मग कोंडाण्यावर चढाई करायला त्या लेकाला काय कोण नको म्हणत होतें ? म्हणे शिवाजीची आज्ञा ! तेवढा लग्नसमारंभ उरकून घेऊन मग तो गेला असता तर तोंपर्यंत कोंडाण्याला काय पृथ्वीनें आपल्या पोटांत थारा दिला असता कीं त्या शिवाजीची अगदीं तारीख फुकट चालली होती ? 'तेथें पाहिजे जातीचें' हेंच खरें. एवढी परीक्षा पास झालों म्हणजे मी graduate होईन हें जसें कांहीं यांनाच कळतें आणि मला कळत नाहीं ! कॉलेज सोडण्यांत म्हणे तुझा फायदा नाहीं ! पण तसें करण्यांत माझा फायदा आहे, असें मी कधीं तुम्हांला सांगायला आलों

होतों ? बाकी प्रत्येक गोष्टींत, आपला फायदा होतो कीं नाहीं एवढेंच बघण्याकडे ज्यांची सारी अक्कल खर्ची पडायची, त्यांना दुसरें काय दिसणार आहे ? मूळ विचारसरणींतच जेथें जमीन अस्मानाची तफावत आहे, तेथे समजूत तरी कशी घालणार आणि ती पडणार तरी कशी ? आणि आपण तरी त्यांची समजूत घालण्याच्या खटाटोपांत पडा कशाला ? आपल्याला करावयाचें तें आपण केलेंच आहे. त्यांत आपलें कायमचें नुकसान होणार, ही मनाची खात्री असून केलें आहे. मग आतां लोकांची पर्वा करण्याचें मला कारण काय ? आतां एक पाऊलही मागें हटण्यास आपण तयार नाहीं. वर्तमानपत्रें विकणेंच काय पण कांहीं दिवस हमाली करावी लागली तरी बेहेत्तर ! पुढें टाकलेलें पाऊल मागें नाहींच घेणार ! ”

घरीं येऊन कृष्णानें आपलीं पुस्तकें घेतलीं व आपल्या वहिनींचे इतके दिवस आपल्याला संभाळून घेतल्याबद्दल आभार मानून घरांतून बाहेर पडला.

इकडे आप्पासाहेबांच्या घरीं सकाळीं उठल्याबरोबर जो तो आपले विचार केव्हां प्रगट करावयास मिळतात याची वाटच पहात होता. पण चहा घेईपर्यंत कोणीच कोणाशीं बोललें नाहीं. वसंताला कांहीं कामामुळें बाहेर जावें लागलें. तेव्हां अर्थातच मालतीला आपले विचार आप्पासाहेबांजवळ उघड करून दाखविण्यास आयतीच सवड मिळाली. आप्पासाहेबांनीं आपलें मत काय तें कळूं न देतां मालतीच्या मनाचा निश्चय कितपत ठाम आहे हें अजमावून पहाण्याचें ठरविलें.

**आप्पा०**—“ मग काय मालती, कॉलेज सोडण्याचा तुझा निश्चय अगदीं पक्का झाला का ? ”

**मालती**—“ होय आप्पा. त्यांत आतां फरक होणें शक्य नाहीं. ”

**आप्पा०**—“ पण या तुझ्या निश्चयामुळें वसंताला काय वाटेल, याचा तूं नीट विचार केला आहेस का ? ”

**मालती**—“ आणि मी माझ्या निश्चयापासून ढळलें तर राष्ट्रांतील थोर पुढाऱ्यांना काय वाटेल याचा विचार सुद्धां तुमच्या मनाला शिवत नाहीं ना आप्पा ? ”

**आप्पा०**—“ राष्ट्रांतील पुढाऱ्यांना काय वाटणार आहे त्यांत ? ते कांहीं तुझ्या एकटीवर अवलंबून नाहींत. त्यांना दुसरी रिक्रूटभरती मिळाली तरी चालेल. ”

**मालती**—“ पण ज्या विद्यार्थीवर्गावर ते अवलंबून आहेत त्याचीच मी एक घटक असल्यामुळें त्यांच्या सांगण्याप्रमाणें मी वागणें हें माझें कर्तव्यच आहे. ”

**आप्पा०**--" त्या वर्गाची तूं घटक असलीस तरी इतकी लहान घटक आहेस कीं त्यांच्या सांगण्याप्रमाणें तूं वागलीस तरी त्यांच्या हेतूची सफलता तेवढीच आणि न वागलीस तरी विफलताही तेवढीच ! "

**मालती**--" पण मला मुळीं त्यांचा फायदा किंवा तोटा याचा विचार करण्याचें कारणच नाहीं. मला माझें कर्तव्य करावयाचें आहे. राष्ट्रांतील स्वातंत्र्येच्छु थोर पुढाऱ्यांच्या सांगण्याप्रमाणें न वागणें म्हणजे देशद्रोहच मी मानतें, आणि तो करण्यास मी तयार नाहीं. मी एकटीच त्यांच्या सांगण्याप्रमाणें वागलें नाहीं तर यांत त्यांच्या कार्याचें काय मोठेसें नुकसान होणार आहे, असें तुम्ही विचारतां. असाच प्रश्न जर एखाद्या शिपायाला विचारला तर तो असेंच उत्तर देणार कीं 'माझा माझ्या देशाला कितीसा उपयोग होणार आहे, हा माझा प्रश्न नाहीं. मला माझ्या देशासाठीं मरावयाचें आहे आणि मला मेलेंच पाहिजे.' आपला कांहीं विशिष्ट कार्याला फारसा उपयोग होण्यासारखा नाहीं मग आपण आपला स्वतःचा फायदा तरी कां सोडा असा नादानपणाचा पोक्त विचार प्रत्येक जण करूं लागला म्हणजे कोणतेंच कार्य तडीस जाण्याची कधींच आशा करावयास नको."

**आप्पा०**--" हें कदाचित् खरें असें धरून चाललें तरी ज्यांच्यावर तुझें प्रेम आहे त्या व्यक्तींना तुझ्या अशा कृतीनें जर वाईट वाटत असेल तर ती करण्यापासून परावृत्त होणें हेंही तुझें कर्तव्यच नाहीं का ? "

**मालती०**--" माझी कृति पाहून मी आपल्या कर्तव्यास जागलें म्हणून माझें कौतुक करणें हेंच त्या व्यक्तींचें कर्तव्य आहे. ते जर आपल्या कर्तव्याला विन्मुख झाले तर तो त्यांचाच अपराध आहे. मी माझ्या कर्तव्यपालनांत कोणाला काय वाटेल याचा विचार करीत बसत नाहीं."

**अप्पा०**--" मी कोणाविषयीं बोललों हें तुझ्या नीटसें लक्षांत आलें नाहींसें वाटतें. वसंताचें तुझ्यावर व तुझें वसंतावर प्रेम आहे कीं नाहीं ?"

**मालती०**--" होय. आतांपर्यंत मी त्यांच्यावर अगदीं अंतःकरणपूर्वक प्रेम करीत आल्यें आहें. "

**आप्पा०**--" मग त्यांनीं जर आपल्या सांगण्याप्रमाणें तूं न वागलीस तर तुझ्याशीं विवाह करण्यास आपण तयार नाहीं, असा हट्ट धरला तर काय करावयाचें ?"

**मालती**—“ ते असा हट्ट धरून बसतील किंवा नाहीं हें मी नक्की सांगूं शकत नाहीं. पण मी मात्र त्यांच्याशीं विवाह करण्यास तयार नाहीं. ”

**आप्पा०**—“ म्हणजे काय मालती ? काय म्हणत आहेस तूं हें ? ”

**मालती**—“ मी हें कांहीं तरी बोलावयाचें म्हणून बोललें नाहीं. अगदीं माझ्या मनाचा झालेला निर्धारच मी तुम्हांला सांगितला आहे. काल सारी रात्र याच गोष्टीसंबंधानें विचार करण्यांत मी घालविली. हा विवाह आम्हां दोघांनाही अहितपरिणामी झाल्याशिवाय रहाणार नाहीं. ”

**आप्पा०**—“ म्हणजे इतके दिवस तूं त्यांच्यावर प्रेम दाखवीत होतीस, तें सारें ढोंगच होतें म्हणावयाचें ? ”

**मालती**—“ तुमच्या पायांना साक्ष ठेवून मी सांगतें कीं तें बिलकुल ढोंग नव्हतें-तें सर्वांशीं सत्य होतें. पण माझ्या राष्ट्रप्रेमापुढें मला इतर कोणत्याही खासगी प्रेमाला कमी प्रतीचें लेखणें भाग आहे. माझ्या राष्ट्राच्या सांगण्याप्रमाणें मी वागलें असतां ज्यांना आवडत नाहीं त्यांच्याशीं विवाह करण्यास मी केव्हांही तयार होणार नाहीं. मी माझी काया, वाचा आणि माझें मन यापुढें देशकार्यालाच अर्पण करणार. मग त्यांत कोणालाही कांहींही वाटो-मला त्याची पर्वा नाहीं. ”

**आप्पा**—“ तर मग वसंताला तसें एकदां स्पष्ट सांगून तरी टाक. तुझ्याविषयीं वाटत असलेला त्याचा आदरसुद्धां मला वाटतें अशा तुझ्या वागण्यानें कमी होत जाईल. ”

**मालती**—“ मी करीत आहें तें बरोबर आहे, इतकेंच नव्हे तर प्रत्येकानें असेंच केलें पाहिजे अशी जोंपर्यंत माझी सदसद्विवेकबुद्धि मला ग्वाही देत आहे तोंपर्यंत एकट्या वसंतरावांचाच काय पण सर्व जगाचा जरी माझ्याबद्दलचा आदर नाहींसा झाला तरी मला त्याची तिळमात्रही पर्वा वाटणार नाहीं. मला आतां या विषयाचा अगदीं कंटाळा आला आहे. थोडक्यांत आणि अखेरचें मी एवढेंच सांगतें कीं मी कॉलेज सोडलें आहे त्याच्या मूळाशीं राष्ट्राच्या आज्ञेचें पालन हा पवित्र हेतु आहे. सर्वांनीं तसेंच केलें पाहिजे असें माझें मत आहे, आणि कोणाला कांहींही वाटलें तरी या माझ्या निश्चयापासून न ढळण्याचा माझ्या मनाचा अगदीं संकल्प झालेला आहे. वसंतरावांबद्दलही मी पुनः तुम्हाला सांगतें कीं राष्ट्राची आज्ञा पालन करण्यास ते तयार नसल्यामुळें, त्यांच्याशीं विवाह करण्यास मी साफ तयार नाहीं, ” असें म्हणून ती चटकन उठली आणि लीलाताईकडे निघून गेली.

---

# प्रकरण १८ वें.

मालती आली त्या वेळीं लीला तिच्याकडे जावयास निघण्याच्याच बेतांत होती. पण तीच आल्यामुळें लीलाताईची फेरी वांचली. मालतीचें आणि आप्पासाहेबांचें झालेलें बोलणें तिला समजल्यावर लीलाताईनें मालतीला शाबासकीच दिली.

**लीला०**—" काल रात्रीं मला किती वेळ तरी झोंपच लागेना. मला माझ्या-बद्दलचा कांहींच विचार करावयाचा नव्हता. कारण मी जें करीन तें बरोबरच असलें पाहिजे ही माझ्या भाऊंची खात्री आहे. मी कॉलेज सोडलें हें समजतांच ते माझ्यावर रागावले तर नाहींतच पण त्यांनीं उलट माझें अभिनंदनच केलें. राष्ट्राच्या शब्दाबरोबर आपला स्वतःचा मागला पुढला कांहीं विचार न करतां देशकार्य करण्यास धांवून जाणाऱ्या उसळत्या रक्ताच्या तरुणांचीच स्वातंत्र्येच्छु परतंत्र राष्ट्राला जरूरी असते असें ते म्हणाले. मी कॉलेज सोडलें नसतें तरच ते उलट माझ्यावर रागावले असते. पण मला एकसारखी तुझ्याबद्दलची काळजी वाटत होती. वसंतराव या तुझ्या करण्याच्या विरुद्ध आहेत हें मला मारवाडी विद्यालयाच्या हॉलमध्यें तूं त्या लिस्टवर सही करण्याकरितां उठून गेलीस तेव्हांच समजलें होतें. तुझ्या आप्तांनाही हें तुझें करणें फारसें पसंत पडेल असें मला वाटेना. तेव्हां एका बाजूला राष्ट्र आणि दुसऱ्या बाजूला वडील व भावी यजमान! तेव्हां या दुहेरी पेंचातून तूं कशी काय मोकळी सुटणार ही मला सारखी धास्ती वाटत होती; आणि त्यांतून तुझा भोळा आणि गरीब स्वभाव! आप्पासाहेबांनीं डोळे वटारले म्हणजे तुझ्या डोळ्यांत अश्रु उभे रहावयाचे आणि वसंतरावांनीं जरा फुरगुटल्याचा आविर्भाव आणला म्हणजे तुझ्या हृदयाला कंप सुटावयाचा!"

**मालती**—" अग मी नेहेमीं वागण्यांत साधीभोळी दिसलें तरी वाटेल त्या बाबतींत कांहीं तशी नाहीं मी! साध्या क्षुल्लक गोष्टीसाठी कोणाचेंही मन दुखविणें माझ्या जिवावर येतें हें खरें आहे. पण तत्त्वाचा प्रश्न आल्यावर मी कोणतेही माया-पाश तोडण्यास मागेंपुढें पहाणार नाहीं. माझ्या स्वतःबद्दलचा प्रश्न असता तर मी या खेपेसही मला प्रिय वाटत असणाऱ्या माणसांच्या मुर्वतीखातर नमतें घेतलें असतें. पण हा राष्ट्राचा प्रश्न आहे. इथें खासगी नातीं विचारांत आणून कसें भागेल?

राष्ट्राच्या आज्ञेचें पालन करणें हेंच तत्व मी एकदां अंगिकारल्यावर त्याच्या आड येणाऱ्या खासगी नात्यांची पर्वा मला कशी ठेवतां येणार ? ”

**लीला०**--“ माणसाची तत्वनिष्ठा अशीच ठाम असली पाहिजे. भोळसरपणाला किंवा गरिबीला तरी मार्यादा पाहिजेच. नाहीं तर आपल्या गरिबीचा फायदा घेऊन जो तो आपला आपल्या सांगण्याप्रमाणें करायला लावायचा ! तुझ्याबद्दल मला वाटत असणारी धास्ती आतां अगदीं दूर झाली. कारण मला आतां अगदीं पक्कें कळून चुकलें कीं हें कांहीं कच्चें काम नाहीं. बरें. पण तुझा निश्चय वसंतरावाच्या व आप्पासाहेबाच्या माऱ्यापुढें कायम टिकेल कीं नाहीं अशी मला भीति वाटत होती म्हणून तुला माझा राग तर नाहीं ना आला ?”

**मालती**—“ छे. छे. त्यांत राग येण्यासारखें काय आहे ? माझा नेहेमींचा गरीब व भोळा स्वभाव माहीत असल्यामुळें तुला अशा प्रकारची धास्ती वाटावी यांत अस्वाभाविक असें कांहींच नाहीं. तुझ्या भाऊंनाही मी कॉलेज सोडल्याचें तूं सांगितलें असशीलच. ”

**लीला०**—“ हो तर, वा ! तें मी सांगण्यास कशी विसरेन ? पण वसंतरावांना हें तुझें करणें पसंत नाहीं व ते तुझे भावी पतिराज आहेत हें त्यांना समजतांच त्यांनाही माझ्यासारखीच भीति वाटूं लागली; व त्यांनीं मला आज सकाळीं तुझी भेट घेऊन ‘ राष्ट्रकार्याच्या आड येणारीं माणसें कोणीही असलीं तरी त्यांच्या भिडेखातर तूं त्यापासून परावृत्त होऊं नकोस ’ असा उपदेश करण्यास तीन तीनदां सांगितलें. पण मला तुझें खरोखरच अगदीं कौतुक वाटत आहे. ”

**मालती**—“ मला खरें म्हणशील तर त्यांत मी विशेष कांहीं केलें असें मुळींच वाटत नाहीं. काल रात्रींपासून मला खरी काळजी निराळ्याच माणसाबद्दल वाटत आहे. ”

**लीला०**—“ मी सांगूं का त्या माणसाचें नांव ? ”

**मालती**--“ तें तुला सांगतां कसें येणार ? ”

**लीला०**--“ तीच तर खुबी आहे. तुला त्या कृष्णरावांबद्दल काळजी वाटत असली पाहिजे. ”

**मालती**--“ होय. तूं अगदीं बरोबर ओळखलेंस. त्या बिचाऱ्यांची काय स्थिति झाली असेल कोणास ठाऊक ? त्यांना अन्न मिळण्याची सुद्धां मुष्कील झाली

असेल ! त्यांनीं कॉलेज सोडलें म्हणून लोकांनीं त्यांची नाहीं नाहीं ती निर्भत्सना केली असेल ! ”

**लीला०**—“ ते पक्के खंबीर आहेत लोकांना उत्तर देण्याला ! काय असेल तें असो. मला त्यांच्याबद्दल इतकी खात्री वाटते कीं त्यांच्यावर कोणताही प्रसंग ओढवला तरी ते कांहीं डगमगणार नाहींत. देशांतील सर्व तरुणवर्गानें जर त्यांच्याच-सारखी धडाडी दाखविली तर स्वराज्यासाठीं आपल्या राज्यकर्त्यांच्या पुढें झोळी पसरण्याची पाळी आपल्या राष्ट्रावर खास येणार नाही. निव्वळ कॉलेज सोडण्यानें स्वराज्य मिळणार नाहीं हें मलाही माहीत आहे. पण आपण आपल्या देशासाठीं कांहीं तरी करण्यास तयार आहोंत, एवढें तरी त्यामुळें दिसून येतें कीं नाहीं ? मग एवढें पुरें आहे. आपल्या मनाची जात त्यांनीं दाखविली म्हणजे बस् झालें. एकदां मन तयार झाल्यावर देशासाठीं कोणतेंही काम करण्याची त्या माणसाला कांहींच दिक्कत वाटेनाशी होते. ज्याचें मन जिवंत तोच जिवंत. आतां या कृष्णरावांचीच गोष्ट घे. इतके दिवस हालांत काढून, परीक्षा इतकी हाताशीं आली असतांना ती पदरांत पाडून घेण्याचा मोह त्यांनीं आपल्या बुद्धीस पडूं दिला नाहीं ! त्यानीं आपल्या स्वार्थाकडे दृष्टि ठेवून या कामांत भाग घेतला नसता तरी आपणही त्यांना दोष देऊं शकलों नसतों. कारण शिक्षणासाठीं त्यांना आजपर्यंत खरोखरच कल्पनातीत कष्ट पडलेले आहेत. आपल्याप्रमाणें ख्याली-खुशालींत राहून कांही त्यांना आतांपर्यंत मिळविलेल्या शिक्षणाचा लाभ झालेला नाहीं. त्यांना तें हाडांचीं काडें आणि दांतांच्या कण्या करूनच संपादन करावें लागलें आहे. असें असतांनासुद्धां राष्ट्रानें हांक मारली असतां इतर नेभळट वृत्तीच्या शिळपटांप्रमाणें त्यांनीं कांहीं तिला पाठ दाखविली नाहीं. तर एखाद्या बहाद्दर शिपायाप्रमाणें आपण पहिली ‘ ओ ’ दिली. खरोखर ते मला केव्हां भेटतील, असें मला झालें आहे. मी त्यांचें अगदीं मनःपूर्वक अभिनंदन करणार आहें. ”

**मालती**—“ तूं त्यांचें अभिनंदन करण्यास उत्सुक झाली आहेस यांत कांहीं विशेष नाहीं. तुझ्या मनांत त्यांच्या संबंधानें प्रथमपासूनच आदरभाव वसत आहे व तो कोणत्याही कारणानें आतांपर्यंत दूषित झालेला नाहीं; पण मला पूर्वीं त्यांच्याबद्दल थोडासा आदर वाटत होता. तो त्यांनीं आपला कांहीं तरी गैरसमज करून घेऊन मला, वसंतरावांना व आप्पांना दुरुत्तरांनीं ताडन केल्यामुळें बराच—जवळजवळ अजिबात

लोपला. नंतर त्या जोशांच्या पोरकटपणामुळें तर त्यांतील अंशही शिल्लक राहिला नाहीं; आणि वसंतरावांच्या सांगण्यानें कान भारले गेल्यामुळें तर त्यांच्याबद्दल माझ्या मनांत तिरस्कारच उत्पन्न झाला. पण कालपासून मात्र माझें हृदय त्यांच्याविषयीं उत्पन्न झालेल्या आदरानें भरून गेलें आहे. त्यांच्याबद्दल मला वाटत असलेला सर्व राग गिळून टाकून त्यांनीं केलेल्या स्वार्थत्यागाबद्दल व दाखविलेल्या तत्त्वनिष्ठेबद्दल मी सुद्धां त्यांचें अभिनंदन करण्यास अतिशय उत्सुक झालें आहें."

**लीला०**—"मी तुला आतां हेंच विचारणार होतें. ज्या मनुष्यानें आपला व आपल्या घरच्या मंडळीचा विनाकारण अपमान केला असें कांहीं वेळ कां होईना पण तुला वाटत होतें, त्या मनुष्याची खरी परीक्षा तुला आतां करतां आली. त्यावेळीं तुला वाटलें असेल कीं आपल्या कल्पनेप्रमाणें आपल्या स्वतःच्या झालेल्या अपमानामुळें खवळून जाऊन तो तुम्हाला नाहीं नाहीं तें बोलला. पण आतां तर तुझी खात्री झाली ना कीं तो जातिवंतच तेजस्वी व अभिमानी पुरुष आहे म्हणून? निव्वळ आपला स्वतःचाच अपमान झाला म्हणजे त्यांचें पित्त खवळतें–म्हणजे त्यांचा तेजस्वीपणा निव्वळ स्वतःचा अपमान सहन न होण्याइतकाच मर्यादित आहे–असें नाहीं तर उलट स्वतःच्या अपमानापेक्षां देशाच्या अपमानाचीच त्यांना अधिक चीड आहे आणि ती चीड जगाच्या नजरेंत भरण्यासाठीं ते नुसती तोंडाची वाफ दवडणारे ढोंगी नसून प्रत्यक्ष कृतीनें जगाला सिद्ध करून दाखविण्याइतके कर्तव्य-तत्पर आहेत."

**मालती**—"त्यावेळींच शांतपणें विचार केल्यानंतर मला त्यांच्या करण्याचें कौतुक वाटूं लागलें होतें आणि मला वाटतें मी तुला तसें सांगितलेंही होतें. पण नंतर वसंतरावांचे आणि माझें जेव्हां अधिकाधिक बोलणें चालणें सुरू झालें व आप्पांच्या सांगण्यावरून त्यांचें व माझें भावी नातेंही जोडलें गेलें तेव्हां ते मला जें कांहीं सांगत तें तें निदान तेवढ्यापुरतें तरी खरें वाटूं लागे. त्याबद्दल मला आतां फार वाईट वाटत आहे. पण झाल्या गोष्टीला उपाय काय? मी तर त्यांची ते भेटतील तेव्हां अगदीं प्रांजलपणें क्षमा मागण्यास तयार आहें. मला क्षमा करण्याइतका उदारपणा ते दाखवितील काय?"

लीलेला मालतीच्या मनाचा पुरा ठाव काढावयाचा होता म्हणून ती मुद्दामच म्हणाली,

" अग पण त्यांनीं तेवढा उदारपणा दाखविला नाहीं तर त्यांत तुझें तरी काय बिघडणार आहे मोठेंसें ? त्यांचा आणि तुझा कधीं संबंध थोडाच येणार आहे ? आणि आलाच तरी त्यांची कांहीं तुला कधीं गरज लागणार नाहीं. उलट तुझीच त्यांना लागली तर लागेल."

**मालती—**" तूं असें म्हणावेंस याबद्दल मला आश्चर्यच वाटत नसून वाईटही वाटत आहे. त्यांनीं मला क्षमा केली नाहीं तर माझें लौकिक दृष्ट्या कांहीं नुकसान होणार आहे, अशांतला मुळींच भाग नाहीं हें मलाही माहीत आहे. पण जो मनुष्य एकदां तेजस्वी, मानी व थोर अंतःकरणाचा हें आपल्याला कळून आलें त्याच्या मनांत आपल्याविषयीं निष्कारण झालेला गैरसमज तसाच कायम रहावा हें मला माझ्या दृष्टीनें प्रशस्त वाटत नाहीं. त्यांचा तो समज जरी चुकीचा असला तरी त्याला जर कारण मी आहें तर तो दूर करण्याचा प्रयत्न करणें व त्यांत आपल्याला यश मिळण्याची इच्छा व आशा बाळगणें, हे मनुष्यस्वभावाच्या विरुद्ध आहे का ? वसंतरावासारख्या बोलघेवड्या माणसाची क्षमा मागण्याचा प्रसंग आला असता तर मात्र मी त्यांत खास कमीपणा मानला असता व त्यांनीं आपण होऊन मला क्षमा करण्याचें औदार्य दाखविलें असतें तरी सुद्धां मी ती स्वीकारली नसती. तुम्ही मला क्षमा करावी, असा मी तुमचा अपराधच काय केला आहे असा रोखठोक सवाल मी त्यांना केला असता. पण कृष्णरावांबद्दलचें माझें मन अगदीं निराळें आहे. मला त्यांच्या कृतीबद्दल कौतुक वाटत आहे. त्याच्याविषयीं मला अगदीं पहिल्यानें वाटत असलेला आदर त्यांनीं देशाकरितां केलेल्या स्वार्थत्यागामुळें दुणावला आहे. तेव्हां त्यांनीं मला क्षमा केली नाहीं तर मला खरोखरच फार वाईट वाटेल."

**लीला०—**" शाबास मालती ! तुझ्यासारखी मैत्रीण मला लाभली याबद्दल मी खरोखच आपल्याला धन्य समजतें. तो प्रश्न मी तुला निव्वळ गंमतीनें विचारला होता. तुझ्याकडून मला माझ्या अपेक्षेप्रमाणेंच उत्तर मिळालें. जिवाला जिवाची ओळख पटल्यावर त्यांची अशीच स्थिति होत असते. इतकें कशाला ? मी तुला अगदीं खात्रीनें सांगतें कीं कृष्णराव सध्यां कोणत्याही प्रसंगांत असले तरी त्यांच्या मनांत तुझ्यासारखेच विचार चालले असतील. त्यांची क्षमा मागावी म्हणून त्यांना भेटण्यास तूं जितकी उत्सुक झाली आहेस तितकेच तेही तुझी क्षमा मागण्यासाठीं उतावीळ झाले असतील. इतकेंच नव्हे तर तुम्हां तिघांचा—विशेषतः तुझा अपमान केल्याबद्दल त्यांचें मन त्यांना आतां

असें खाऊं लागलें असेल कीं तुझी व त्यांची भेट होईपर्यंत त्यांना चैन सुद्धां पडणें जड जाईल. त्यांची जशी तुला ओळख पटली तशीच तुझीही त्यांना पटली असली पाहिजे. अंतःकरणाची ओळख पटल्यानंतर त्यांच्यांत मानापमानांची किंवा कोणत्याही बाबतींतील उच्चनीचपणाची भावनाच शिल्लक रहात नाहीं."

इतकें त्यांचें बोलणें होत आहे तों लीलाताईचे वडील बाहेरून परत आले. त्यांस लीलाताईनें मालतीच्या घरीं घडलेली सर्व हकीकत सांगितली. त्यांनींही तिनें दाखविलेल्या धीटपणावद्दल तिचें कौतुक केलें. नंतर कांहीं वेळ बोलणेंचालणें होऊन 'संध्याकाळीं फिरावयास जाण्याला मी तुझ्याकडे येईन व आपण दोघी मिळूनच जाऊं,' असें लीलाताईला सांगून मालती आपल्या घरीं निघून गेली.

"राष्ट्राची आज्ञा पालन करण्यास वसंतराव तयार नसल्यामुळें मी त्यांच्याशीं विवाह करण्यास तयार नाहीं," असें निक्षून सांगून मालती झपाट्यानें निघून गेल्यामुळें आप्पासाहेबाची मनःस्थिति अतिशय चमत्कारिक होऊन गेली. त्यांना तोंपर्यंत वाटत होतें कीं तिनें प्रियकर म्हणून मान्य केलेल्या माणसाला अमुक गोष्ट खपत नाहीं असें तिला कळून आल्यावर ती ती गोष्ट करण्यापासून परावृत्त झाल्याशिवाय रहाणार नाहीं—तिला परावृत्त व्हावेंच लागेल. पण त्यांची ती अपेक्षा खोटी ठरली. देशाच्या आज्ञेचें पालन करावयाचें असा दृढनिश्चय केलेल्या माणसाची प्रवृत्ति कशी बनत असते हें त्यांच्या चांगलेंच प्रत्ययाला आलें. राष्ट्रानें अमुक एक गोष्ट कर म्हणून सांगितल्यावर ती करीत असतां आपल्या वडिलांना किंवा इतर कोणाही असणाऱ्या अगर होणाऱ्या संबधी माणसाला ती रुचत नाहीं ही सबब अशा माणसाला त्याच्या कर्तव्यापासून च्युत करूं शकत नाहीं, ही त्यांची आतां खात्री होऊन चुकली. मालतीचा हा निश्चय इतका ठाम झालेला आहे कीं तो बदलण्याची आतां यत्किंचितही आशा नाहीं आणि वसंताला हिचें हें करणें मुळींच मान्य नाहीं, या दोन्ही गोष्टी त्यांना अगदीं स्पष्ट दिसत होत्या. मग अशा परिस्थितींत त्या दोघांचे परस्परांशीं एकदां या बावतींत स्पष्ट काय तें होऊन गेलेलें बरें, असा त्यांनीं पोक्त विचार केला. कारण मालती आणि वसंत यांचा विवाह होणें तर शक्य नाहींच पण त्यांतूनही आपल्या भीडमुर्वतीखातर तो घडून आलाच तर तो इष्टपरिणामी होणें तर त्याहूनही शक्य नाहीं असें त्यांना वाटलें. वसंत आतां आल्याबरोबर त्याला सर्व सांगून टाकावयाचें म्हणजे ती आल्यावर तिच्याशीं काय व कसें बोलावयाचें याचा

विचार करण्यास त्याला अवसर सांपडेल, असा त्यांनीं बेत केला. ते मनांतल्या मनांत म्हणूं लागले, ' नाहीं तरी मालतीनें मला हें गुप्त म्हणून थोडेंच सांगितलें आहे ? ती तरी वसंताला त्याच्या तोंडावर स्पष्टपणें हेंच सांगणार आहे कीं नाहीं ? एकदां काय व्हायचें तें होऊन गेल्यावर तोही मोकळा झाला व मी आणि मालतीही मोकळीं झालों. त्यांनीं एकमेकांपुढें आपले काय विचार असतील ते प्रगट करावे व एकदां काय तो कायमचा निकाल लावून टाकावा यासाठीं आतां मलाच त्यांची गांठ घालून दिली पाहिजे. नाहीं तर आम्ही वडील कसले आणि आमचा उपयोग तरी काय ? विवाहासारखीं शुभ कार्यें घडवून आणण्यास हल्लींच्या काळीं आमच्यासारख्या म्हाताऱ्या माणसांचा कांहीं म्हणण्यासारखा उपयोग होत नाहीं. कारण त्या वेळीं वधूवरेंच परस्परांचा उपयोग करून घेत असतात; पण ह्या विवाह ठरविण्याच्या बाबतींत मी थोडासा भाग घेतला होता. तेव्हां तो मोडण्याच्या अशुभ प्रसंगींही मलाच पुढाकार घेतला पाहिजे. त्यावेळीं ज्याप्रमाणें या दोघांनींच अखेर निकाल दिला होता, त्याप्रमाणें यावेळींही अखेर निकाल त्यांच्यावरच अवलंबून राहणार. पण त्यावेळीं ज्याप्रमाणें निकाल जवळ जवळ ठरलेलाच होता त्याप्रमाणेंच याही वेळीं निकाल काय लागणार हें कळण्याला कांहीं ज्योतिषशास्त्राचा आधार घेण्याची जरूरी नाहीं."

असा त्यांचा विचार चालला आहे तों वसंत बाहेरून परत आला. ते त्यांच्याशीं बोलण्यास सुरवात करणार इतक्यांत मालतीही परत आली. तिला वाटलें कीं आपण मघांशीं आप्पांना जें सांगितलें तें त्यांनीं वसंतरावांना सांगूनही टाकलें असेल. तेव्हां आतां पुनः पुनः त्याच गोष्टीचा खल करण्यांत कांहींच हंशील नाहीं, असा विचार करून ती आपल्या खोलींत निघून गेली. तेव्हां वसंतानेंच आप्पासाहेबांशीं बोलण्यास सुरुवात केली.

**वसंत**--" आप्पा, मला आज तुमच्याशीं तुमच्या व माझ्याही दृष्टीनें फारच महत्त्वाच्या गोष्टीबद्दल बोलावें लागणार आहे. स्पष्टपणें बोलण्याचा आतां संकोच केला तर पुढें दोघांनाही जड जाईल. "

**आप्पा**—" तितकीच महत्त्वाची गोष्ट तुला सांगण्याचा माझ्यावरही प्रसंग आलेला आहे. "

आप्पासाहेबांच्या बोलण्याचा अर्थ वसंतानें फार निराळा केला. कारण मालतीचें व त्यांचें काय बोलणें झालें हें त्याला माहीत नव्हतें. त्याला वाटलें कीं आपण आतां लव-

करच परदेश गमन करणार असल्यामुळें आपल्याला जपून रहाण्याविषयीं वगैरे सूचना करण्याचा यांचा विचार असेल. म्हणून तो म्हणाला–" आप्पा, मी काय व कशा-संबंधानें बोललों हें तुमच्या लक्षांत आलें नाहींसें दिसतें. "

**आप्पा०**—" माझ्या अगदीं नीट लक्षांत आलें आहे. "

**वसंतः**—" तर मग त्यासंबंधानें तुमचें काय म्हणणें आहे ? "

**आप्पा०**—" मी माझा विचार काय तो जवळ जवळ ठरवूनच टाकला आहे. पण त्या बाबतींत मी स्वतः कांहींच न बोलण्याचें ठरविलें आहे. तुम्हीच दोघांनीं काय तो आपसांत निकाल लावून घ्यावा अशी माझी इच्छा आहे. "

**वसंतः**—" मी आमच्या ठरलेल्या विवाहासंबंधीं तुमच्याशीं बोलणार होतों. "

**आप्पा०**—" मीही तुमच्या ठरलेल्या विवाहाबद्दलच बोललों आहें. पण त्याबाबतींत तूं माझ्याशीं बोलण्यापेक्षां मालतीशींच काय बोलायचें तें बोल. "

**वसंतः**—" मालतीताई कालचा आपला निश्चय सोडण्यास तयार नाहींत, अशी कल्पना करूनच मी या गोष्टीचा विचार केला आहे. तो कळल्यानंतर तुम्हाला व कदाचित त्यांनाही वाईट वाटण्याचा किंवा माझा रागही येण्याचा संभव आहे. "

**आप्पा०**—" तुझी कल्पना अगदीं बरोबर आहे. ती आपल्या निश्चयापासून कोणत्याही कारणानें ढळण्यास तयार नाहीं; इतकेंच नव्हे तर तिच्याप्रमाणेंच देशांतील सर्व विद्यार्थीवर्गानें तोच मार्ग पत्करला पाहिजे असें तिचें मत आहे. तसें करण्यास जे तयार होणार नाहींत ते आजच्या देशाच्या परिस्थितींत देशद्रोहीच होत असें तिचें म्हणणें आहे. "

**वसंत**—" तर मग आप्पा, मी बॅरिस्टर होण्यासाठीं विलायतेस जाणार आहें हेंही त्यांना बहुतकरून पसंत नसेलच ! कारण येथील विद्यार्थ्यांनीं आपल्या विद्यार्जनावर तिलांजलि देऊन गांवोगांव भटक्या मारीत फिरणें हें ज्यांना आपल्या देशाच्या हिताचें असें वाटत आहे, त्यांना एखादा विद्यार्थी विद्यार्जनाच्या स्तुत्य लालसेनें परदेशांत विशेषतः आपल्या राज्यकर्त्यांच्या देशांत गेलेला कसा बघवणार व कसा सहन होणार ? कॉलेजावर पाणी सोडून उनाडक्या करीत फिरणें हीच ज्यांची देशभक्तीची व्याख्या त्यांना हें माझें करणें म्हणजे स्वराज्य शंभर वर्षें लांबणीवर टाकणारेंच वाटणार ! खरोखर यावेळीं जर मला कोणी देशाचा सर्वाधिकारी करील तर देशांतील गरीब बापड्या व सर्वैथैव निरपराधी तरुणांचे नाहक खून पाडणाऱ्या या

सगळ्या दे. भ. ना जन्मभर अंधारकोठडीची हवा दाखवीन. तुम्हांला जर स्वराज्याची एवढी तहानच लागली असेल तर आपलीं डोकीं बडवीत बसा कीं सरकारच्या उंबरठ्यावर ! तुमचा आमच्या पाठीमागें हा नसता ससेमिरा कशाला ? सुशिक्षित तरुणांपैकीं सगळेच कांहीं आमच्यासारखे ठाम बुद्धीचे असतात असें नाहीं. त्यांतही या मालतीताईसारखे कांहीं बावळट लोक निघतातच. पुढारी सांगूं लागले कीं यावेळीं देशांतील सर्व तरुणांनीं शाळा-कॉलेजें ओस पाडणें यांत राष्ट्राचें हित आहे. त्याबरोबर यांनाही वाटूं लागलें कीं आपण आतां कॉलेज सोडलें नाहीं तर झालें—अगदीं संपलें—हिंदुस्थानला मग अगदीं हजारों वर्षें स्वतंत्र होण्याची आशाही करावयास नको. हीं सुशिक्षित म्हणविणारी माणसें इतकीं भोळीं कशीं असतात, हेंच मला कळत नाहीं. लोक काय वाटेल तें सागतील. त्यांच्या नुसत्या बोलण्यानें का हुरळून जावयाचें ? आपण आपला मागला पुढला विचार नको का करायला ? या वेळीं म्हणे जे कॉलेज सोडणार नाहींत त्यांना आम्ही देशद्रोही समजतों ! म्हणजे याचा असा अर्थ कीं काय कीं या वेळीं ज्यांनीं कॉलेज सोडलें ते सर्व मॅझिनी आहेत ?"

**आप्पा०**—"तें आपलें काय तें तूं तिच्याशींच बोल ना ! मी कशाला तिच्या वतीनें उत्तरें देत बसूं ? तिलाच मी इकडे बोलावून आणतों आणि मग चालूं द्या तुमचें."

असें म्हणून आप्पासाहेब मालतीच्या खोलींत गेले व 'आपण वसंताला या बाबतीत कांहींही सांगितलेलें नाहीं व सांगण्यास तयार नाहीं तेव्हां तूंच आपली तुला काय सांगावयाचें तें सांग,' असें तिला सांगितलें. तिची त्याला तयारी होतीच. ती लगेच दिवाणखान्यांत आली. ती आलेली आपल्याला समजलें नाहीं असें वसंत ढोंग करीत होता. पण तें किती वेळ छपणार ?

---

# प्रकरण १९ वें.

आपलें काय म्हणणें आहे तें तडकाफडकी म्हणून टाकावयाचें असा दोघांनींही आपल्या मनाचा निश्चय केला होता. तरी प्रत्यक्ष गांठ पडल्यावर दोघांच्याही तोंडून शब्दच बाहेर पडेना. मालतीनें आपली नजर टेबलावर खिळवून टाकली होती आणि

वसंत कुठें तरी आपली दृष्टि स्थिर करण्याचा प्रयत्न करीत असतां हळुच तिच्याकडे मधूनमधून चोरून बवत होता. शेवटीं त्यानें बोलण्याचा निश्चय केला.

" मालतीताई, तुम्ही काल भावनेला बळी पडून व त्या व्याख्यात्याच्या व्याख्यानानें हुरळून जाऊन कॉलेज सोडलें. कालच्या वातावरणानें तुमचें डोकें धुंदावल्यामुळें काल माझें म्हणणें तुम्हाला पटणें शक्य नव्हतें. आज तरी तुम्हाला तें पटूं लागलें आहे का ? कीं अजूनही तुमचें करणेंच तुम्हाला बरोबर वाटत आहे ? "

**मालती**—" कालच्या वातावरणानें माझें डोकें धुंद झालें असल्यामुळें मला तुमचें म्हणणें पटत नव्हतें, ही तुमची कल्पना चुकीची आहे. माझें डोकें कालही शांत होतें व आजही शांतच आहे. काल माझ्या मनांत उसळलेली भावना क्षणिक नसून ती चिरकाल टिकणारी आहे. मी केलें तें बरोबर आहे असें मला काल वाटत होतें तसेंच तें आजही वाटत आहे. "

**वसंत**—" कॉलेज सोडणें ही फारशी महत्त्वाची बाब नसली तरी त्यामुळें तुमची मनोवृत्ति कोणत्या जातीची आहे, हें त्यामुळें चांगलेंच सिद्ध होत आहे. राष्ट्रांतील पुढाऱ्यांच्या सांगण्याप्रमाणें वागण्यास तुम्ही तयार आहांत, हें तर या तुमच्या करण्यानें अगदीं स्पष्ट होत आहे. "

**मालती**—" होय. हें अगदीं खरें आहे. माझ्या देशांतील थोर पुढाऱ्यांच्या आज्ञेचें माझ्याकडून यापुढें कधींही उल्लंघन होणार नाहीं. "

**वसंत**—" तुम्हाला राष्ट्रांतील दे. भ. ची आज्ञा म्हणजे वेदाज्ञा वाटते. पण मला ती आज्ञा म्हणजे कांहींच वाटत नाहीं. माथेफिरू लोकांचें बोलणें म्हणजे इकडे तिकडे वहाणारा वारा असेंच मी समजतों. तेव्हां अशी परिस्थिति असल्यामुळें, म्हणजे आपल्या दोघांच्या मनोवृत्तीत काहींच साम्य नसल्यामुळें, मालतीताई, आपल्या उभयतांच्या इतक्या उत्कट प्रेमाचा शेवट माझ्या मर्जीविरुद्ध मला करावा लागत आहे, हें तुम्हाला सांगण्यास मला अतिशय वाईट वाटत आहे."

**मालती**—" आपल्या प्रेमाचा शेवट आपल्याला जसा व्हावयास हवा होता तसा करतां येत नाहीं याबद्दल मला तुमच्यासारखें वाईट तर वाटत नाहींच. पण याबद्दल तुम्हाला वाईट वाटत असलेलें पाहून मला उलट आनंदच होतो. "

**वसंत**—" माझ्यावर तुमचें इतकें प्रेम असतांना ज्यामुळें मला वाईट वाटतें त्यामुळेंच तुम्हाला आनंद वाटावा, याचें मला आश्चर्य वाटतें. "

**मालती**—" त्यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहींच नाहीं. तुम्हाला दुसऱ्या एखाद्या गोष्टीबद्दल वाईट वाटलें असतें तर त्यांत मला आनंद वाटलाच असता असें नाहीं. पण तुम्हाला या बाबतींत वाईट वाटत आहे याचा अर्थच हा—निदान मला तरी असा वाटतो कीं मी आचरीत असलेला मार्ग हाच बरोबर असून तुमचा मार्ग चुकीचा आहे, असें तुमचें मन तुम्हाला खात असलें पाहिजे. तुमचें म्हणणें बरोबर असें तुम्हाला वाटत असतें तर तुम्हाला वाईट वाटण्याचें कारणच नव्हतें. मला नाहीं कुठें वाईट वाटत तें ? माझें करणें तुम्हाला पटलें आहे, हें यामुळें सिद्ध झालें असल्यामुळें मला आनंद झाला इतकेंच. नाहीं तर तुम्हाला वाईट वाटलेलें पाहून मला आनंद होण्याचें कारण काय ? "

**वसंत**—" ही तुम्ही केलेली कल्पना चुकीची आहे. मला तुमचें करणें बरोबर आहे असें आतां वाटत नाहीं व पुढेंही कधीं वाटणार नाहीं. माझें तुमच्यावर अतोनात प्रेम असल्यामुळें तें तोडण्याचा प्रसंग आलेला पाहून मला वाईट वाटतें. माझें मन मला खात असल्यामुळें मला वाईट वाटलें नाहीं. बरें. पण मी तुम्हाला एखादा सरळ प्रश्न विचारला तर त्याचें तुमच्याकडून सरळ उत्तर मिळण्याची मी अपेक्षा करूं का ? तुमचीं मतें कालपासून जराशीं विलक्षण बनलेलीं आहेत म्हणून विचारतों. "

**मालती**—" वसंतराव, तुम्ही मला कांहीं सरळ प्रश्न विचारला तर मी तुम्हाला सरळ उत्तर देणार नाहीं अशी तुम्हाला भीति वाटावी याला कांहीं आधार आहे काय ? दोन माणसांची भिन्न भिन्न मतें असलीं तरी आपण माणसेंच आहोंत एवढ्या बाबतींत त्यांचें एकमत असल्यावर, आपल्या प्रश्नाला माणुसकीला सोडून उत्तर मिळेल अशी अमानुष कल्पना तुमच्या डोक्यांत कां यावी ? "

**वसंत**—" मला असें वाटतें याला तुमचीं व माझीं मतें भिन्न आहेत हें एकच कारण होतें असें नाहीं. कारण भिन्न भिन्न मताभिमानी माणसांतही शब्दांची देवघेव माणुसकीला धरून सुरू असते, हें मलाही माहीत आहे. पण हें झालें बुद्धिप्रधान माणसांच्या संबंधानें. आपणां दोघांत हा मुख्य फरक आहे कीं तुम्हीं भावनाप्रधान आहांत तर मी बुद्धिप्रधान आहें. तुम्हीही माझ्याचप्रमाणें बुद्धिप्रधान असतां तर मला तशी शंका आली नसती. पण तुम्ही पडल्यात भावनाप्रधान ! आणि भावना-प्रधान माणसांचें नेहेमींच असें असतें कीं त्यांच्या डोक्यांत एकदां एखाद्या माणसाबद्दल एखाद्या बाबीबद्दल वाईट भावनेनें ठाणें दिलें म्हणजे त्याला त्या माण-

साऱ्या सर्वेच गोष्टी वाईट दिसूं लागतात. बुद्धिप्रधान माणसाला हें तारतम्य असतें. तो एकाच गोष्टीवरून त्या माणसाच्या सर्वच गोष्टीच्या चुकीच्या म्हणून मानीत नाहीं. भावनाप्रधान माणसांना हें तारतम्य नसतें याच सत्याचा माझ्या शंकेला आधार होता."

**मालती**—"असेंच असेल तर तो आधार पोकळ होता असें मला मोठ्या खेदानें म्हणावें लागतें. भावनाप्रधान माणसाला तारतम्यबुद्धी नसते हा तुमचा आरोप अगदींच खोटा आहे. हें तुमचें म्हणणें खरें असें धरून चाललें तर त्याचा असा अर्थ होईल कीं भावनाप्रधान माणसाला बुद्धीची ओळखही नसते. पण यांत सत्याचा अंशही नाहीं. कांहीं कांहीं वेळीं जें कार्य बुद्धि करूं शकत नाहीं तें भावना करूं शकते हें खरें आहे. बुद्धि आणि भावना परस्परांपासून कितीही भिन्न असल्या तरी त्यांचें एकत्र वास्तव्य असूंच शकत नाहीं असें कांहीं नाहीं. कोणावर बुद्धीची छाप ज्यास्त पडत असेल तर कोणावर भावना आपली हुकमत ज्यास्त प्रमाणांत चालवीत असेल. निव्वळ बुद्धि किंवा निव्वळ भावना या दोनही लंगड्या शक्ति आहेत. त्यांनीं एकमेकींशी सहकार केल्याशिवाय कोणतेंही महत्कार्य सिद्धीस जाण्याची आशाच करावयास नको. पण त्यांतही निव्वळ बुद्धीच्याच जोरावर विसंबून राहून अंतः-करणांतील भावना तशाच दडपून मारून टाकण्याची किंवा मुळीं उद्भवूंच न देण्याची संवय केलेल्यांना कदाचित् स्वार्थाची जोपासना नीट करतां येईल पण अशा माणसाचा दुसऱ्यांना कांहीं उपयोग होईल असें मला वाटत नाहीं. आपण आपल्या बुद्धीचा लोककल्याणाकडेच उपयोग करीत असतों असें त्यानें केवढेंही अवडंबर माजविलें तरी भावनेच्या अभावामुळें तें निव्वळ ढोंग असतें हें जगाला कळून येण्याला फारसा कालावधि लागत नाहीं. नुसत्या भावनेनेंच हेलकावे खाणारा मनुष्यही कदाचित् तोल सुटून खोल दरींत पडण्याचा संभव असतो. तरी पण निव्वळ बुद्धिप्रधान माणसापेक्षां निव्वळ भावनाप्रधान माणसाला मी अधिक महत्त्व देतें. कारण त्याच्या हातून लोकांच्याकरितां कांहीं तरी घडण्याचा बराचसा संभव तरी असतो. पण खरोखरच एकादें महत्कार्य घडवून आणावयाचें असल्यास तें घडवून आणण्याचा खटाटोप आरंभिणाराच्या अंगीं बुद्धि आणि भावना या दोन्ही शक्ति योग्य प्रमाणांत वास करीत असाव्या लागतात. नाहीं तर तें कार्य यशस्वी होण्याची आशाच बाळगावयास नको !"

**वसंत**—"मला हें तुमचें म्हणणें पटत नाहीं. भावना आणि बुद्धि एके ठिकाणीं नांदणें कसें शक्य आहे ? कारण मुबलक बुद्धिवैभव असतांना भावनेच्या मदतीची

अपेक्षाच रहात नाहीं, हें मी स्वानुभवानें सांगूं शकतों. याला तुम्ही कदाचित् आत्म-श्लाघा म्हणाल ! पण माझ्या म्हणण्याला आधार काय असा तुम्ही प्रश्न करणारच, तेव्हां म्हटलें प्रश्न विचारण्याचा तुमचा त्रास तरी आपण वांचवावा. अंतःकरणांत उसळलेली भावना दाबून टाकण्याची बुद्धिवान माणसाच्या अंगांत ताकद असते. ज्याला आपल्या भावना मारून टाकतां येत नाहींत त्यानें आपल्या बुद्धीचें दिवाळें निघाल्याचाच कबुलीजबाब लिहून दिला पाहिजे."

**मालती**—"प्रश्न विचारण्याचा माझा त्रास तुम्ही वाचविलात, याबद्दल मी तुमची फार आभारी आहें. एखादा बेअक्कल पण श्रीमंत मनुष्य ज्याप्रमाणें 'मला अकलेची कांहींच किंमत वाटत नाहीं. माणसाला अक्कल हवी असें म्हणतात, तें कशाला ? पैसा मिळवून सुखी होण्यासाठींच ना ? मग तो तर माझ्याजवळ हवा तेवढा आहे,' असें आपल्या मनाचें समाधान मानून घेतो, त्याप्रमाणेंच हें तुमचें समाधान मला वाटतें. बरें, हें तरी सर्वथैव सत्य असतें तर एक असो. आपल्या विशाल बुद्धिमत्तेचें एवढें अवडंबर माजविणारे तुम्ही, पण तुमच्या हृदयांतही कांहीं कांहीं वेळीं भावना उद्दीपित होतातच. सत्याची कांहीं चाड असेल तर मला नाहीं वाटत माझा हा तुमच्यावरील आक्षेप खोटा आहे, असें तुम्हाला म्हणतां येईल. म्हणजे तुम्हाला तुमच्या फायद्याच्या म्हणून वाटणाऱ्या भावना तरी तुमच्या हृदयांत उद्भवतात व त्यांना तुम्ही योग्य मान देतां म्हणावयाचें !"

**वसंत**—"तुमच्या बोलण्याचा अर्थ आला माझ्या लक्षांत. पण तुम्ही हें विसरतां कीं माझ्या हृदयांत उत्पन्न होणारी भावना जर माझ्या बुद्धीला पटणारी असेल तरच तिचा अंमल मी माझ्यावर चालूं देतों, एरवीं नाहीं."

**मालती**—"हो तर वा ! हें कां मला माहीत नाहीं ? मी तें अगदीं पूर्ण जाणून आहें. तुमच्या बुद्धिरूप शस्त्राची धार तशीच तीक्ष्ण आहे."

**वसंत**—"म्हणजे काय ?"

**मालती**—"म्हणजे असें कीं तीक्ष्ण हत्याराच्या धारेला ज्याप्रमाणें रुंदी खपत नाहीं, त्याप्रमाणेंच तुमच्या बुद्धिरूप शस्त्राच्या धारेला स्वार्थापलीकडची दृष्टि सहन होत नाहीं. तुमच्या स्वार्थाला मदत करणाऱ्या, निदान त्याच्या आड न येणाऱ्या अशा जेवढ्या भावना तुमच्या अंतःकरणांत उद्भवतात, तेवढ्यांनाच तुम्ही थारा देतां. त्या भावनांची व्यापकता जर तुमच्या स्वतःच्या स्वार्थाची मर्यादा

ओलांडण्याइतकी होऊं पाहील तर तुमची बुद्धि त्यांना लगाम घालण्याला नेहेमीं सज्ज असते, असेंच कीं नाहीं ?"

**वसंत**—"हा तुमचा समज साफ चुकीचा आहे. मी मागेंही कधीं तरी तुम्हाला सांगितलें होतें तेंच आज पुनः सांगतों, कीं तुम्ही माझी जितकी स्वार्थी दृष्टि आहे असें समजतां, तितकी ती नाहीं. जगाच्या डोळ्यांत धूळ फेंकून, जगांत आपल्याला मानमान्यता मिळावी म्हणून स्वार्थत्यागाचें ढोंग उभारणाऱ्या कोणाही तरुणापेक्षां माझी कार्यक्षमता रेंसभरही कमी नाहीं. फुकटचा मोठेपणा पदरीं पाडून घेण्याकरितां ढोंग करण्यास मी तयार नाहीं, हें मात्र खरें आहे."

**मालती**—"म्हणजे ज्या तरुणांनीं आज देशाकरितां स्वखुषीनें आपलें जन्माचें नुकसान करून घेतलें आहे त्यांना तुम्ही ढोंगी आणि जगाच्या डोळ्यांत धूळ फेंकणारे म्हणतां काय ?"

**वसंत**—"बेलाशक म्हणतों. त्यांत त्यांनीं कसलें जन्माचें नुकसान करून घेतलें आहे ? लोक आपली थोडीफार प्रशंसा करतील या आशेनें मारे हे बेटे आज देशभक्त बनले आहेत ! पुनः हेच सगळे शिक्षणसंस्थांना 'गुलामखाने–गुलामखाने' म्हणून शिव्या देणारे बोलघेवडे लोक थोड्याच दिवसांत त्याच शिक्षणसंस्थांतून शिक्षण घेत असलेले जगाच्या दृष्टीस पडल्याशिवाय खास रहाणार नाहींत."

**मालती**—"कावीळ झालेल्या माणसाला सर्व जग पिवळेंच दिसूं लागतें. आपल्या दुबळ्या मनोवृत्तीवरून तुम्ही जगाची परीक्षा करीत आहां. ते लोक मात्र ढोंगी आणि फसवे आणि तुम्ही कांहीं न करणारे म्हणून sincere आणि सच्चे नाहीं का ? आपणच आपल्या मनाचें समाधान मानून घेण्याला काय हरकत आहे म्हणा ! ते आपल्या शिक्षणसंस्थांत पुनः प्रवेश करतील असें मला वाटत नाहीं. परंतु कांहीं अशक्य वाटत असलेल्या गोष्टीही कधीं कधीं शक्य होत असतात. तेव्हां कांहीं जणांच्या बाबतींत तुम्ही म्हणतां तेंच खरें ठरलें तरी त्यांनीं आपल्या आयुष्यांतील कांहीं दिवस तरी देशाच्या कामीं खर्च केले, हा त्यांनीं थोडासा तरी स्वार्थत्यागच केला असेंच तुम्हांला म्हणावें लागेल."

**वसंत**—"बिलकुल नाहीं. कॉलेज सोडून गांवभर भटक्या मारीत फिरावयाचें, याला मी स्वार्थत्याग मुळींच समजत नाहीं."

**मालती**—" कॉलेजांत शिक्षण घेत असलेला एखादा विद्यार्थी खरो-खरच भटक्या मारीत असला तर त्याच्या भटकण्याला ' सहल करणें किंवा फिरणें ' असें सभ्य नांव द्यावयाचें; आणि कॉलेज सोडलेला कोणी कांहीं कामाकरितां जरी कुठें जात असला तरी त्याच्या त्या जाण्याला मात्र ' भटक्या मारीत फिरणें ' असें निंद्य नांव द्यावयाचें हा तुमच्यासारख्या कांहीं न करणाऱ्या शिष्ट लोकांचा साधारण शिरस्ताच आहे. आज जो मुलगा कॉलेजांत शिक्षण घेत असतांना अगदीं सर्वगुणसंपन्न म्हणून नांवाजला जात असतो, त्यानेंच उद्यां कॉलेज सोडलें म्हणजे तुम्हीच त्याला vagabond म्हणूं लागतां नाहीं का ? "

**वसंत**—" मग यांत आमची काय चूक आहे ? राजरोस मार्ग सोडून आड-मार्गाचा अवलंब करणाराला vagabond नाही तर दुसरें काय म्हणावयाचें ? "

**मालती**—" राजरोस मार्ग कोणता व आडमार्ग कोणता हें तरी तुह्मीच ठर-वणार कीं नाही ? नशीवच देशाचें म्हणावयाचे की हे तुमचे लागूलचालनाचे राजरोस राजमार्ग आवडेनासे होऊन देशांतील कांहीं तरुणांना तरी स्वातंत्र्यसंस्थापनेचे आडमार्ग आवडूं लागले आहेत आता त्या बिचाऱ्याच्या माथीं तुमच्यासारख्या बुद्धिसिंगांकडून उनाडटप्पूपणाचा दोष मारला जाणार हें तर ठरलेलेच आहे. पण ते तुमच्या म्हणण्याची पर्वा करीत असतील तर ना ? हाथी चलत है अपने चालसे कुतर भुकत वाकु भुकवा देव ! शिवाजी महाराजाना व त्यांच्या आज्ञेप्रमाणें वाग-णाऱ्या हिरडस मावळ्याना देखील अवरंगजेबाच्या दरबारीं त्याची हांजी हांजी करून लाळ घोटणारे दीडदमडीबहाद्दर उनाडटप्पूच म्हणत असत ! "

**वसंत**—" वा रे वा ! काय म्हणे शिवाजी आणि मावळे ! या तुमच्या दे. भ. तला शिवाजी कोण ? "

**मालती**—" आणि तुमच्या नाकात वेसण अडकवून आपल्या मर्जीप्रमाणें तुम्हाला वळविणारा तुमचा अवरंगजेब कोण ? या माझ्या प्रश्नाचें उत्तर तुम्हांला सांपडलें कीं तुम्हीं मला केलेल्या प्रश्नाचें उत्तरही तुम्हांला आपोआपच सांपडेल. "

**वसंत**—" जाऊं द्या. हा वाद कितीही खेळला तरी तो संपण्याची कांहीं आशा करावयास नको ! "

**मालती**—" बरोबरच आहे. एखादी गोष्ट पटल्यानंतरसुद्धां ती न पटल्याचा बहाणा करणें हें तर बुद्धिप्रधान माणसांचें मुख्य लक्षण ! "

**वसंत**—" तर मग मी आतां थोड्याच दिवसांनीं बॅरिस्टर होण्यासाठीं विलायतेस जाणार हेंही तुम्हाला आवडत नसेल तर ? "

**मालती**—" माझ्या आतांपर्यंतच्या बोलण्यावरून तुम्हाला तें कळून आलेंच असेल. परकीयांच्या शिक्षणसंस्थांवर बहिष्कार घालण्याचा कार्यक्रम देशानें मुक्रर केला असतां त्याप्रमाणें न वागणें हाच जिला गुन्हा वाटतो, तिला आपल्या घराबाहेर जाऊन परकीयांच्या अगदीं घरांत जाऊन बसणें कसें पसंत पडणार ? "

**वसंत**—" तुम्हाला ज्यांच्यापासून आपलें हित साधून घ्यावयाचें आहे त्यांच्याशीं फटकून वागल्यानें आपला कार्यभाग साधेल असें तुम्हाला वाटतें, पण मला तसें वाटत नाहीं. इतिहास पुराणांतूनही माझ्या म्हणण्याप्रमाणें वागून लोकहितेच्छूंनीं आपलें कार्य पार पाडल्याचीं कित्येक उदाहरणें दाखवितां येतील. देवगुरु बृहस्पति यांनीं तर देवांच्याच सांगण्यावरून आपला पुत्र कच यास दैत्यगुरु शुक्राचार्य यांजपासून त्यांनीं महत्प्रयासानें प्राप्त करून घेतलेली संजीवनि विद्या संपादन करून घेण्यासाठीं त्यांच्या घरीं पाठविलें होतें. तुम्ही त्या काळीं असतां तर मला वाटतें तुम्ही बृहस्पतींची आणि देवांची मूर्खांतच गणना केली असतीत ! "

**मालती**—" तुम्ही उपमा तर फार छान शोधून काढलीत. ज्या गुरूंकडे कच विद्यासंपादन करावयास गेला होता ते एकाक्ष होते, आणि ज्या सद्गुरूंच्या घरीं तुम्ही जाणार आहांत तेही दिसण्यांत दोन डोळ्यांचे असले तरी खरें पाहिलें असतां एकाक्षच आहेत. कारण त्यांच्या दोन्ही डोळ्यांची दृष्टि एका स्वार्थावरच खिळलेली असते. परंतु एका काळीं आणि एका परिस्थितींत जी गोष्ट व्यक्तीचें किंवा समाजाचें हित करूं शकते तीच गोष्ट अन्यकाळीं व भिन्न परिस्थितींत हितावह असतेच असा कांहीं सिद्धान्त नाहीं. कचाला संजीवनि विद्या संपादन करण्यासाठीं शुक्राचार्यांकडे पाठविण्यांत आपल्या पक्षाचें हित आहे असें देव व बृहस्पति यांना वाटत होतें. कारण त्यांची कचाविषयीं खात्री होती कीं हा कोणत्याही मोहाच्या पाशांत न गुरफटतां निव्वळ आपल्या ध्येयाकडे दृष्टि ठेवून तें साध्य केल्याशिवाय रहाणार नाहीं. शुक्राचार्यांच्या उदारबुद्धीवरही त्यांचा विश्वास होता. सारांश कचाला संजीवनि विद्या संपादनार्थ शुक्राचार्यांकडे पाठविणें त्यांना योग्य वाटत होतें. परंतु आजचे बृहस्पति किंवा इतर देव यांस तसें वाटत नाहीं. तो कच सुद्धां त्यावेळीं आपल्यापेक्षां अधिक जाणत्या अशा बृहस्पतींच्या व देवांच्या सांगण्यावरूनच आपल्या शत्रूंच्या गुरुगृहीं गेला होता. त्यांनीं नको म्हणून सांगितलें असतांना ' या थेरड्यांना काय अकला आहेत, आपलें

हित किंवा अहित यांच्यापेक्षां मला ज्यास्त चांगलें समजतें , ' अशा घमेंडीनें किंवा अप्रबुद्धपणामुळें तो दैत्यगुरुंकडे गेला नव्हता हें तुम्ही विसरलां असें दिसतें. "

**वसंतः—**" तें तुम्ही कांहीं म्हणालां तरी मी सध्यां करीत आहें, तेंच माझ्या व माझ्या देशाच्याही हिताचें आहे असें माझें मन मला निक्षून सांगत आहे. तिकडून मी परत आल्यावर मी आतां म्हणत आहें तेंच खरें हें तुम्हालाही पटल्या-शिवाय रहणार नाहीं. आतां कॉलेजला रामराम ठोकून फकीर बनलेले कांहीं देशकार्य करणार आहेत किंवा ते आतां नुसते स्वस्थ बसले आहेत हेंच देशकार्य आहे, ही तुमची समजूत सपशेल चुकीची आहे. मी बॅरिस्टर होऊन परत आल्यावर मी करीत असलेलें देशकार्य पाहून तुमचे डोळे दिपून गेल्याशिवाय रहाणार नाहींत. "

**मालती—**" तुमचें देशकार्य खरोखरच इतकें प्रखर व तेजस्वी होईल तर माझे डोळे दिपूनच काय पण फुटून जरी गेलें तरी त्यांत मला आनंदच होईल. पण तसें होईल असा विश्वास मात्र मला वाटत नाहीं. "

**वसंत—**" तर मग तुम्हांला माझें करणें पसंत नाहीं व तुम्ही आपला आग्रह सोडण्यास तयार नाहीं ? "

**मालती—**" होय. तुमचें करणें मला अगदीं नापसंत असून माझा आग्रह मी सोडण्यास तयार नाहीं. तो कायमच रहाणार. तो मला कायम ठेवलाच पाहिजे."

**वसंत—**" तर मग मला तुम्हांला आतां एक फार महत्वाची गोष्ट सांगून टाकली पाहिजे."

**मालती—**" मलाही तुम्हांला तितकीच महत्वाची गोष्ट सांगून टाकावयाची आहे व तेवढ्यासाठींच मी इथें आल्यें आहें. आपलीं दोघांचीं मतें अगदीं परस्परविरुद्ध आहेत. तुम्हांला देशांतील थोर पुढाऱ्यांपेक्षां आपल्या देशाचें हित कशांत आहे हें आपल्यालाच अधिक चांगलें समजतें असें वाटत आहे तर त्यांच्याच सांगण्याप्रमाणें वागण्यात आपल्या देशाचें कल्याण आहे अशी माझी समजूत आहे. देशांतील तरुण पिढी या वेळीं आपल्या कर्तव्याला जागली नाहीं तर कदाचित् सध्यां आम्ही आचरीत असलेल्या मार्गाच्या इष्टतेचा प्रत्यक्ष पुरावा जगाच्या निदर्शनास येणार नाहीं. परंतु सुदैवानें जर राष्ट्रांतील तरुण आपल्या रक्ताचा जिवंतपणा दाखविण्यास तयार होतील तर ज्यानीं आज आमची बुद्धिमंदांत गणना केली आहे त्यांस खालीं मान घालण्याचा प्रसंग आल्याशिवाय खास रहाणार नाहीं. "

**वसंत**--" कोणाचा मार्ग अधिक श्रेयस्कर हें ठरविण्याचा अधिकार कालाचा आहे. आपला नाहीं. "

**मालती**--" ते ठरविण्याचा अधिकार कालाचा असला तरी इतक्या भिन्न प्रकृतीच्या व मनोवृत्तीच्या व्यक्तींनीं विवाहबद्ध होऊन दोघांनींही एकमेकांच्या मार्गांत विघ्नें उपस्थित करण्याचा प्रसंग आपणावर ओढवून घ्यावा कीं काय हा आपलाच प्रश्न आहे. तुम्ही देशहितासाठीं म्हणूनच आमच्या पक्षाला येऊन मिळत नाहीं हें तुमचें निव्वळ ढोंग आहे आपलें स्वतःचें कोणत्याही प्रकारें नुकसान होऊं नये. आपला तळिगम गार रहावा, एवढा एकच स्वार्थी उद्देश त्याच्या मूळाशीं आहे. आपल्या स्वतःच्या स्वार्थाची ज्याला राष्ट्राच्या इभ्रतीपेक्षां ज्यास्त किंमत वाटते, असल्या स्वार्थलंपट, भेकड माणसाशी विवाहबंधनानें बद्ध होण्यास मी साफ तयार नाहीं माझ्या तोंडून एखाददुसरा कठोर शब्द निघून गेला असेल तर मला क्षमा करा. तुमच्या अंगीं पुष्कळ सद्गुण आहेत व त्यांबद्दल माझ्या मनांत वसत असलेला आदर कायम आहे व तो तसाच कायम राहील. पण मला इतर सर्व सद्गुणांपेक्षां स्वातंत्र्यप्रीति या सद्गुणाची किंमत अधिक वाटते स्वतःला कोणत्याही प्रकारें तोशीस पडूं न देतां जे स्वातंत्र्याच्या नुसत्या गप्पा मारीत असतात ते निव्वळ ढोंग आहे. देशाविषयीं आपल्याला प्रेम आहे असा अभिमान बाळगणारांनी तें सिद्ध करण्याकरिता कांहीं तरी स्वार्थत्याग करून दाखविलाच पाहिजे. त्याग हा प्रीतीचा आत्मा आहे. ज्यावर आपलें प्रेम असतें त्यासाठी सर्वस्वदान करण्याची तयारी पाहिजे; तरच तें खरें प्रेम यत्किंचितही स्वार्थत्याग न करिता देशप्रीतीचा घमेंड मारणें म्हणजे ' प्रेम ' या शब्दाचा विपर्यास करण्यासारखें आहे. "

**वसंत**--" तुम्ही मला कितीही उपदेश करण्याचा आव आणलात तरी माझ्या मनांत बदल करणे तुम्हाला शक्य होणार नाहीं. आपल्या विवाहाच्या बाबतीत मलाही तुमच्यासारखेंच वाटत आहे. माझें तुमच्यावर खरोखरच निरतिशय प्रेम होतें. पण तुम्हाला ज्याप्रमाणें तुमच्या मार्गांत आड येणारा पति नको आहे त्याप्रमाणेंच मलाही माझ्या मार्गांत विघ्नें उपस्थित करणारी पत्नी नको आहे. तुमच्या मताप्रमाणें आपला विवाह झाला असतां तें दोघानाही अप्रशस्त होईल असें माझेंही मत आहे. तेव्हां दोघांनाही आपापला राष्ट्रहिताचा मार्ग चोखाळतां यावा म्हणून आपण विवाह न करणेंच इष्ट आहे. आतां याहून अधिक बोलण्याची माझी इच्छा नाहीं. "

**मालती**-" ठीक आहे. "

असें म्हणून ती आपल्या खोलींत जाण्यास निघालीच. पण तिची पाठ वळतांच वसंतानें तिला पुनः हांक मारली. पण तिनें मागें वळूनही पाहिलें नाहीं. वसंत जें बोलला तें अगदीं विचारपूर्वक निश्चय करूनच बोलला होता व मालती बोलली तेंही त्याचप्रमाणें बोलली होती. दोघेही बोलून तर गेली. पण बोलून झाल्यावर त्यांचें त्यांनाच वाईट वाटूं लागलें. म्हणजे आपल्या हातून चूक झाली असें त्यांस वाटत होतें म्हणून नव्हे. पण त्यांचें एकमेकांवर खरोखरच प्रेम होतें. इतके दिवस प्रेमरज्जूंनी बद्ध असलेलीं अंतःकरणें अशा आकस्मिक रीतीनें एकमेकांपासून कायमची दूर होण्याचा प्रसंग आल्यामुळें दोघांचीही अगदीं करुणास्पद स्थिति होणें अपरिहार्य होतें. त्यांतल्यात्यांत दोघांनाही समाधानाची जागा ही होती कीं त्यांनीं एकमेकांचा कोणताही अपराध केल्यामुळें किंवा कोणी तिसऱ्यानेच मध्यें लावालावी केल्यामुळें हा प्रसंग उद्भवला नव्हता. दोघांनींही आपापल्या तत्त्वाकरितां परस्परांचा त्याग केला होता. कोणाचे तत्त्व खरें होतें, हा प्रश्न अलाहिदा पण दोघांनींही परस्परांपासून राष्ट्रकल्याणासाठीं मोकळें रहावें असें त्यांना वाटत होतें.

वसंताला विलायतेस जाण्याला आतां फारसा अवधि राहिला नसल्यामुळें अण्णासाहेबांना–त्याच्या वडिलांना–त्याच दिवशीं भेटण्यास निघण्याचें त्यानें ठरविलें. त्यानें आपल्या मनाचें कशाही प्रकारें समाधान करून घेतलें तरी तें मन स्वस्थ रहाणें शक्यच नव्हतें. मालतीलाही वसंतराव आपल्या नजरेआड होतील तर आपल्याला आपल्या दुःखाचा विसर पडणें अधिक सोपें जाईल असे वाटत होतें.

---

# प्रकरण २० वें.

सकाळीं कबूल केल्याप्रमाणें मालती लीलाताईकडे फिरावयास जाण्यासाठीं निघाली. तिच्या घरीं गेल्यावर वसंताचें व तिचें झालेलें सर्व बोलणें तिनें लीलाताईला सांगितलें.

**मालती**—"मी तुझ्याजवळून आतांपर्यंत कोणतीच गोष्ट लपवून ठेवलेली नाहीं. मग एवढीच तरी कशाला ठेवूं? मी वसंतरावांना अगदीं मन खंबीर करून आपला झालेला निश्चय सांगितला. सांगतांना मला विशेष कांहीं वाटलें नाहीं पण नंतर मात्र किती वेळ तरी मला अतिशय वाईट वाटत होतें."

**लीला०**--" अग, खरें निरपेक्ष प्रेम असलें म्हणजे तें तोडतांना तोडणाऱ्याच्या मनाला असेंच कष्टदायक होत असतें. तुझी मला पूर्ण ओळख आहे. वसंतरावांवर तुझें किती प्रेम होतें हेंही मला माहित होतें. आणि तुझा स्वभाव फार भोळा व गरीब असल्यामुळें तुला अशा प्रसंगीं कसें वागावें हें सुचणार नाहीं आणि सुचलेंच तर त्याप्रमाणें वागण्यास तूं धजणार नाहींस अशी मला भीति वाटत होती, तीही याच कारणामुळें. पण यांतच तुझ्या देशप्रीतीचें खरें रहस्य आहे. ज्या माणसावर तूं जिवापाड प्रेम करीत होतीस तोच तुझ्या देशहिताच्या आड येण्याचा संभव दिसल्याबरोबर तूं मनाचा निग्रह करून झटक्यासरशीं त्याला झिडकारून टाकलेंस ! खरोखर तुझ्यासारखी तेजस्वी मैत्रीण मला लाभली म्हणून मी स्वतःला किती धन्य समजतें आहें म्हणून सांगूं ? खरें सांगावयाचें म्हणजे तूं वसंतरावांना असें स्पष्ट सांगणार, असें आज सकाळीं मला निक्षून सांगितलें होतेंस. तरीही तुझें वसंतरावांवर किती प्रेम आहे याची मला जाणीव असल्यामुळें तुला त्यांना आपला कायम झालेला निश्चय स्पष्टपणें सांगण्याची हिंमत होईल कीं नाहीं, ही शंका माझ्या मनाला आतांपर्यंत वाटत होती. माझ्या या शंकेखोर स्वभावाबद्दल तुला माझा राग येत असेल, नाहीं ग ? "

**मालती०**—" मुळींच नाहीं. तसें मी त्यांना स्पष्ट न सांगणें ही माझ्या अहिताची गोष्ट आहे, ही तुझी खात्री असल्यामुळेंच ती करण्यास मी चुकणार तर नाहीं ना अशी तुझ्या मनाला सारखी हुरहुर लागली होती. यांत तुझें माझ्यावरील प्रेमच उत्कटतेनें दिसून येत आहे. आपल्याला अत्यंत प्रिय असणारें मनुष्य ज्याप्रमाणें एखाद्या साध्या दुखण्यानें आजारी असलें तरी त्यांत तो दगावणार तर नाहीं ना अशी आपल्याला भीति वाटत असते, त्याप्रमाणेंच तुझें या वेळीं झालें. आपल्याला तशी भीति वाटत असते याचें कारण आपल्याला त्या माणसाविषयीं वाटत असलेलें प्रेमच नसतें कां ? तुला माझ्याबद्दल इतकें प्रेम वाटतें व माझें कल्याण व्हावें म्हणून तूं इतकी काळजी दाखवितेस याबद्दल मी तुझे आभारच मानतें. "

**लीला**—" मालती, किती ग चांगली आहेस तूं ?"

**मालती**—" लीलाताई, तुझी स्थिति मात्र मला आतां पहावत नाहीं. माझा नुसता प्रेमभंगच झाला आहे पण तुझ्या बाबतींत तर प्रेमनाश झाला आहे. प्रणयाच्या नुसत्या भंगानें मला इतकें दुःख वाटत आहे, मग तुझी स्थिति काय होत असेल ? माझा वसंतरावांशीं होणारा विवाह मी मोडून टाकला असला तरी मला फिरून कुठें

तरी व केव्हां तरी प्रेमाचें स्थान मिळण्याचा संभव आहे. पण तूं-तूं मात्र आजन्म-" हें बोलत असतां मालतीला हुंदका आला आणि ती लीलाताईच्या गळ्याला अगदीं घट्ट बिलगली.

**लीला**—" मालती, अशी कष्टी होऊं नकोस. मला जर पुनः संसारांत पडण्याची इच्छाच झाली, तर तें मला अशक्य का आहे ?"

**मालती**—" अशक्यच नाहीं तर काय ? तूं तसें केलेंस तर लोक तुला नांवें ठेवण्याल चुकतील असें का तुला वाटतें ? अजून समाजाची बुद्धि इतकी उदार कोठें झाली आहे ?"

**लीला**—" खरोखरच झालेली नाहीं. मी पुनर्विवाह केला तर लोक मला नांवें ठेवण्यास चुकणार नाहींत, ही माझी खात्री आहे. समाज मला दोषी ठरवील हेंही मला माहीत आहे. पण जो समाज एककल्ली बनलेला आहे, ज्या समाजानें सारासार-विचाराची व आपली फारकत करून घेतली आहे, त्यानें बरें किंवा वाईट म्हटल्याची मी काय म्हणुन किंमत ठेवावी ? या समाजाला पुरुषवर्गानें एकाच वेळीं अनेक स्त्रिया केलेल्या चालतात. चार पांच बायका मेल्यानंतरही एखादा पुरुष पुनः विवाह करण्यास तयार तरी त्यांत त्याला कांहीं आक्षेपार्ह वाटत नाही. पण एखाद्या स्त्रीचा पति तिच्या अगदीं लहानपणीं जरी निवर्तला असला तरी तिला पुनः विवाह करण्याची चोरी ! ज्या बाबतीत समाज निःपक्षपाती असेल, तेवढ्याच बाबतींत त्यानें बरें वाईट म्हणण्याची मी पर्वा बाळगीन. ज्या गोष्टींत त्याच्याकडून पक्षपात केला जातो, त्यांबद्दल तो काय म्हणेल याचा मी विचारसुद्धां करणार नाहीं."

**मालती**—" तर मग तूं पुनर्विवाह करून फिरून सुखी होण्याचा प्रयत्न करशील का ?"

**लीला**--" माझ्या बोलण्याचा तूं भलताच अर्थ केलास ! मी आपलें माझें मत तुला सांगितलें. पुरुषांना जोंपर्यंत समाजानें वाटेल तितकीं लग्नें करण्याचा मक्ता दिला आहे, तोंपर्यंत विधवांनीं पुनर्विवाह करण्यास मुळींच हरकत नाहीं, एवढेंच माझें म्हणणें. मी आपलें मन अगदीं खंबीर बनविलें आहे. ज्यांना आपलें मन आपल्या ताब्यांत रहात नाहीं किंवा रहाणार नाहीं अशी भीति वाटत असेल, त्यांच्या संबंधानें मी बोलल्यें. पण मला तशी भीति मुळींच वाटत नाहीं."

**मालती**—" भीति वाटत नसली तरी एकलकोंडें आयुष्य कंठण्याचा त्रास किंवा त्यामुळें वाटत असलेलें दुःख आत्मसंयमनानें दूर होणें शक्य आहे का ?"

**लीला०**—" हाच तर मुख्य मुद्दा आहे माझ्यावर देवानें जी परिस्थिति आणली आहे त्यांत जर मला त्रास किंवा दुःख वाटत असतें तर मला आत्मसंयमन करणेंही जड गेलें असतें आणि माझें मन उच्छृंखल होईल कीं काय नकळे अशी मला भीतीही पडली असती. पण माझा परमेश्वरावर ठाम विश्वास असल्यामुळें मला प्राप्त झालेली परिस्थिति माझ्या मागील जन्मींच्या पातकांचें फळ होय, अशी मी माझ्या मनाची ठाम समजूत करून घेतली आहे. तेव्हां केल्या चुकीचें प्रायश्चित्त भोगीत असता वाईट वाटण्याचें कारण काय ? आता ज्याचा पुनर्जन्मावरच विश्वास नसेल किंवा विश्वास असूनही विवाहसौख्याचा मोह ज्यांना आवरत नसेल त्यांनीं खुशाल विवाह करून आपला संसार थाटावा "

**मालतीः**—" तर मग विवाहसौख्य अनुभवायचेंच नाहीं, असा तूं ठाम निश्चयच केला आहेस ? "

**लीला०**—" होय. तसा माझा अगदीं पूर्ण निश्चय आतां तरी आहे. पण न जाणों दुर्दैवानें मला जर माझें मन आवरणेंच अशक्य झाले तर मात्र लोक काय म्हणतील म्हणून न भितां बेधडक पुनर्विवाह लावून मी मोकळी होईन. पण तशी वेळच येणार नाहीं, ही माझी खात्री आहे. बरें. आतां उगीच बोलण्यानें बोलणे वाढतें. मग फिरून परत येण्याला विनाकारण उशीर होईल."

मालतीलाही तिचें म्हणणें पटलें. त्या दोघी लगेच बाहेर पडल्या.

इकडे कृष्णा व केशव दादासाहेबांच्या घरून बाहेर पडल्यावर एका आडगिऱ्हाइकी पुस्तकें विकत घेणाराकडे गेले. आजपर्यंत जीवापलीकडे जतन करून ठेविलेलीं पुस्तकें विकण्याचा प्रसग आपल्यावर आल्याबद्दल कृष्णाच्या मनाला फार वाईट वाटत होतें. पण करणार काय ? पुस्तकें अगदीं उत्तम स्थितींत असूनही तो दुकानदार त्यांबद्दल रुपयास चार आण्यांच्या वर एक दिडकी देण्यास तयार होईना. पण त्या वेळीं तो देईल ती किंमत घेण्याशिवाय मार्गच नव्हता. जवळ जवळ दहा रुपये त्यांना मिळाले. लगेच ते आपल्या एका मित्राकडे गेले व ' आम्हाला आपल्या गॅलरींत रात्रीं निजण्यापुरती तरी जागा देशील का, ' असें त्याला विचारलें पण त्या मित्रानें आपल्या वडिलांचा स्वभाव फारच तऱ्हेवाईक असल्याचें सांगून त्या दोघांना वाटाण्यांच्या अक्षता लावल्या. बारीक सारीक गोष्टींत सुद्धां दुर्दैव कशा लीला करीत आहे, हें पाहून त्या दोघांना कौतुक वाटलें. कारण असल्या फालतु संकटांनीं भेदरून

जाण्याइतके ते भेकड किंवा नेभळे नव्हते. त्यांच्याजवळ इतर कांहीं नसलें तरी धडाडी पूर्णतेनें होती. दुपारचा वेळ कसा तरी इकडे तिकडे घालवून संध्याकाळीं जरा विश्रांति घेऊन मनाला प्रसन्नता वाटली तर पहावी म्हणून ते मलबार हिलवर एका झाडाखालीं बाकावर येऊन बसले. या अफाट मुंबई शहरात आपल्याला कोठेंही कोणी थारा देऊं नये, याचें त्या दोघानाही आश्चर्य वाटत होतें. कोणाला सांगितलें असतां हें खरें देखील वाटलें नसतें.

कर्मधर्मसंयोग असा कीं फिरता फिरता मालती व लीलाताई त्याच बाकासमोर आल्या. त्या वेळीं ते दोघेही अगदीं दमून गेल्यामुळें बाकाच्या पाठीवर मान टेकून डोळे मिटून स्वस्थ पडले होते. त्यांच्याकडे पाहिल्यावर ते कसल्या तरी संकटांत सांपडलेले असावेत असा कोणालाहि सहज तर्क करतां आला असता. त्याच्या त्या म्लान चेहे-ऱ्याकडे पाहून त्या दोघींनाही अतिशय वाईट वाटलें. इतक्यांत केशवानें आपले डोळे उघडले. त्या दोघी आपल्याकडे पहात आहेत असें दिसतांच त्यानें कृष्णाला उठविलें. कृष्णा लगेच उठून उभा राहिला व केशवानेंही त्याचेंच अनुकरण केलें. कृष्णानें त्या दोघींना अगदीं नम्रपणें त्या रिकाम्या झालेल्या बांकावर बसण्याची विनंति केली; व त्याही त्याच्या विनंतीस मान देऊन त्यावर अधिष्ठित झाल्या व त्यांच्या सांगण्यावरून तेही पुनः त्यावर बसले. एकमेकांविषयीं उत्पन्न झालेल्या आदराचाच हा परिणाम होता. एरवींच्या परिस्थितीत त्या दोघानींही त्या दोघींना बसण्यास सांगितले नसतें व त्यांनींही उडवाउडवी केली असती. बसल्याबरोबर कृष्णानें बोलण्यास सुरवात केली.

**कृष्णा**—"मालतीताई, तुमची अनायासें भेट झाली याबद्दल मला फार आनंद होतो आहे. मी तुमचा भयंकर अपराध केलेला आहे व त्याची तुम्ही उदार अंतःकरणानें क्षमा कराल अशी मला आशा आहे."

**मालती**—"तुम्ही माझा अपराध केला? असें कां बरें म्हणतां? मीच तुमचा अपराध केलेला आहे व म्हणून मीच तुमच्याजवळ क्षमेची याचना करणार आहें."

**कृष्णा**—"असें टोंचून बोलून माझ्या मनाला तुम्ही दुखवूं नका. तुम्ही काल N. C. O. लिस्टमध्यें आपलें नांव दाखल केलेंत, तेव्हांपासून मी पूर्वीच्या सर्व गोष्टी विसरून गेलों आहें."

**मालती०**—"आणि तुम्ही काल सर्वांच्यापुढें आघाडी मारलीत, त्यामुळें तुमच्या बाबतींत माझा झालेला किंवा खरें सांगावयाचें म्हणजे करण्यांत आलेला

गैरसमज पार दूर झाला; आणि म्हणून तुमची केव्हां एकदां क्षमा मागेन असें मला होऊन गेलें होतें. तुम्हाला मी हें कांहीं तरी ढोंग करीत आहें असें वाटत असावेंसें दिसतें. पण या लीलाताईलाच पाहिजे तर विचारून पहा कीं मी तिच्याजवळ अगदीं हेंच बोलल्यें होतें कीं नाहीं तें."

**कृष्णा**—" तुमच्या या उदार बुद्धीचें कौतुक करावें तेवढे थोडेंच होणार आहे. मी काल आपलें नांव दाखल केलें यांत विशेष कांहीं केलें असें मुळींच नाहीं. मी आपलें कर्तव्यच बजावलें. त्यांत माझा गौरव करण्यासारखें काय आहे ?"

**मालती**—" आज परिस्थितीच अशी चमत्कारिक उत्पन्न झालेली आहे कीं कर्तव्यपालनाबद्दलच अभिनंदन करण्याची पाळी आली आहे. सर्वच आपलें कर्तव्य बजावण्यास तत्पर असते तर अशी पाळी कोणावरच आली नव्हती. पण बहुतेक सर्व कर्तव्यविन्मुख झाले असल्यामुळें एखाददुसरा जो आपल्या कर्तव्याला जागतो, त्याची तारीफ करावयास नको का ?"

**केशव**—" पण तुम्ही आपलें कर्तव्य बजावलेत याबद्दल तुम्हालाही धन्यवाद देणें हेंही तुमच्या म्हणण्याप्रमाणें आमचें कर्तव्यच ठरतें."

**लीला**—" होय; आणि म्हणूनच इतका वेळ मी कांहीं बोललें नाहीं. पण खरें सांगावयाचें म्हणजे आमचा हा कांहींच स्वार्थत्याग नाहीं. कारण आम्हीं कॉलेज सोडलें यांत आमचें काय मोठेंसें नुकसान आम्ही करून घेतलें आहे ? पण तुमच्या दोघांचा विषेशतः कृष्णरावांचा तर फारच मोठा स्वार्थत्याग आहे, यांत कांहीं शंका नाहीं ! इतके दिवस अनेक हाल अपेष्टा सोसून त्यांनीं आपल्या शिक्षणाची येथवर मजल मारली. आणखी थोड्याच दिवसांत त्यांची दारिद्र्याची अडचण दूर झाली असती. पण त्याचा कांहीं विचार मनांत न आणतां देशाच्या आज्ञेचें त्यांनीं बिनचूक पालन केलें. तेव्हां हा खरा स्वार्थत्याग !"

**मालती**—" आणि म्हणूनच माझ्या मनांत त्यांच्याविषयीं पूर्वीपासून वसत असलेला आदर वृद्धिंगत झाला आणि अशा मनुष्याचें आपल्या एका बोलण्यानें मन दुखावलें होतें, याबद्दल मला राहून राहून वाईट वाटत होतें."

**कृ०**—" आणि देशाकरितां आपल्या स्वार्थाचा त्याग करणाऱ्या व चांगल्या सुशिक्षित तरुणीनें एका तरुणाचा तो निव्वळ गरीब म्हणून त्याचा अपमान करावा, याचें मला आश्चर्य वाटत होतें. अर्थात् विचारांतीं माझें मलाच वाटूं लागलें

कीं देशाच्या हांकेला ओ देणाऱ्या तेजस्वी तरुणीच्या हातून असलें निंद्य कृत्य घडणेंच शक्य नाहीं. माझीच कांहीं तरी गैरसमजूत झाली असली पाहिजे."

**मालती**—"मला तेजस्वी म्हणून मला तुम्ही वाजवीपेक्षां अधिक थोरवी देत आहांत. पण तुम्ही आपलीच गैरसमजूत झाली असली पाहिजे, असें जें म्हणालांत तें मात्र अगदीं खरें आहे."

**कृष्णा**—"तर मी आपल्याकडे त्या दिवशीं जेवावयास बसलों असतांना आंबरसाची वाटी तोंडाला लावल्याबरोबर "मधु-रस-पान सौख्य फुकट्याचें" हें पद गुणगुणून तुम्ही माझें अंतःकरण विदीर्ण केलेंत तें तुम्ही आपल्या श्रीमंतीच्या ताठ्यामुळेंच केलेंत, ही मी करून घेतलेली समजूत खरोखरच चुकीची होती तर?"

**मालती**—"होय. अगदीं साफ चुकीची होती. मला माझ्या श्रीमंतीचा यत्किंचितही ताठा नाहीं किंवा अमुक एक मनुष्य निव्वळ गरीब म्हणून त्याचा पाण-उतारा करावा, असें आजांपर्यंत माझ्या कधीं स्वप्नांतही आलेलें नाहीं."

**कृष्णा**—"तर मग अगदीं नेमक्या वेळीं तें पद तुमच्या तोंडून न कळत निघून गेलें. पण त्याचा माझ्या मनावर किती विलक्षण परिणाम झाला? त्यांतूनही तो झाला नसता. पण तुम्ही तें गुणगुणल्याबरोबर वसंतराव जे हंसले, त्या हंसण्यानें तर माझ्या अंगाचा तिळपापड उडाला."

**मालती**—"नाहीं—माझ्या तोंडून तें पद त्यावेळीं निष्कारण निघून गेलें नसून अगदीं सकारणच निघून गेलें होतें. पण तें कारण मात्र तुम्हाला वाटलें त्या प्रकारचें नसून अगदींच निराळें होतें."

**कृष्णा**—"मेहेरबानी करून तें मला सांगतां काय?"

**मालती**—"त्यांत मेहेरबानी कसली आली आहे? मी आतां तेंच सांगणार होतें. पण त्या अगोदर मला हेंही सांगून टाकलें पाहिजे कीं त्यावेळीं वसंतराव जे हंसले ते कांहीं तुमचा उपहास करावा म्हणून हंसले नाहींत. त्यावेळीं मी ज्या कारणामुळें हंसलें, त्याच कारणामुळें त्यांनाही हंसूं आलें. पुढें मग मात्र त्यांच्या बोलण्याचालण्यावरून व विचारसरणीवरून ते श्रीमंतांचे पक्के पक्षपाती आहेत, असें मला कळून आलें, ती गोष्ट वेगळी! कोणाविषयींच कोणाचा निष्कारण गैरसमज होऊं नये अशी माझी इच्छा आहे. आतां नेमक्या त्याच वेळीं मला ती ओळ कशी आठवली तें सांगतें. तुम्ही आमच्याकडे जेवावयास आलां होतां त्याच्या आदल्याच दिवशीं मी, वसंत-

राव व आप्पासाहेब एका क्लबचें कशाच्या तरी मदतीसाठीं असलेलें ' विद्याहरण ' नाटक पहाण्यास गेलों होतों. अगोदरच क्लबचें नाटक–त्यांतूनही संगीत ! मग काय विचारतां ? नाटकाऐवजीं फार्सच झाला तो ! त्यांत कोणी तरी एक तो फुकट्या म्हणून आहे, त्यानें " मधुरसपान सौख्य फुकट्याचें " हें पद म्हणावयास सुरुवात करतांच लोकांनीं थिएटर ' नो मोअर ' नें नुसतें हालवून सोडलें कर्मधर्मसंयोगानें त्याच्या दुसऱ्या दिवशींच ही सर्व हकीकत घडली. मला तें पद त्या वेळीं कां आठवलें, हें वसतरावांना व आप्पांना माहीत होतें; आणि म्हणूनच त्यांना आदल्या दिवसाच्या प्रसंगाची आठवण होऊन हंसें आंवरेना ! पण तुम्हाला तें आपल्यालाच उद्देशून ही बोलली असें वाटलें; आणि तें सहाजिकही होतें."

**कृष्णा**—" हं ! काय एकेक अर्थाचे अनर्थ होतात पहा ! झाल्या प्रकारा-बद्दल आतां माझी मलाच लाज वाटूं लागली आहे. तुमच्याकडे यत्किंचितही चूक नसून तुम्हीच माझी क्षमा मागणार होतां, असें मघाशीं तुम्ही म्हणालात व त्याप्रमाणें मागितलीतही ! यामुळे तर मला अगदीं मेल्याहून मेल्यासारखें झालें आहे. "

**केशव**—" आणि मी माझ्या पोरकटपणामुळें तर इतका मूर्खपणा करून ठेवला आहे कीं तो निस्तरण्यासाठीं शंभर शहाणपणाच्या गोष्टी केल्या तरी त्याही अपुऱ्याच होतील. "

**लीला**—" बरें चला. झालें तें होऊन गेलें. आतां तरी तुमचीं सर्वांचीं मनें अगदीं साफ झालीं ना ? "

**मालती**—" माझें मन तर अगोदरपासूनच साफ होतें. तेव्हा मला तुझ्या या प्रश्नाला उत्तर देण्याची जरूरीच नाहीं. "

**कृष्णा**—" मला कालपर्यंत हें समजलें असतें तर माझ्या चमत्कारिक मनोरचनेमुळें तें कदाचित् मला खरेंही वाटलें नसतें. पण आतां माझ्या मनांत झालेल्या गोष्टी-बद्दल कांहींही किंतु राहिलेला नाहीं."

**के०**—" कृष्णाच्या उत्तरांत माझ्याही उत्तराचा अंतर्भाव झालेला आहे. माझें त्याच्यावर निरतिशय प्रेम असल्यामुळें त्याच्याबद्दलचा सूड यांच्यावर उगविण्याच्या हेतूनेंच माझ्या हातून तो मूर्खपणा घडला होता. तेव्हां मालतीबाई उदार मनानें मला क्षमा करण्यास तयार असतील तर त्या क्षमेचा स्वीकार करण्यास मी आनंदानें तयार आहे."

केशवाचें हें बोलणें ऐकून त्या तिघांनाही हसूं लोटलें. कांहीं वेळानें लीलाताई म्हणाली " बरें, कृष्णराव, तुम्ही दोघेही सध्यां काहीं तरी संकटांत सांपडल्यासारखे झालां आहांत, हा माझा तर्क खरा आहे ना ?"

**कृ०**—" असा तर्क करण्याला तुम्हाला कारण काय झालें ?"

**लीला**—"आम्ही इथें आलों त्यावेळच्या तुमच्या चिंतातुर मुद्रा ! मनुष्य कितीही हिमतीचा असला तरी तो स्वस्थपणें एकटा पडलेला असतांना चिंता त्याच्या चेहेऱ्यावर आपला कबजा बसविल्याखेरीज रहात नाहीं—त्या वेळच्या तुमच्या त्या विचारमग्न मुद्रा पाहून या स्वकर्तव्यपरायण अशा मित्रद्वयावर कांहीं तरी संकट आलें असलें पाहिजे, अशा विचारानें माझें चित्त अगदीं व्याकुळ झालें. मालतीचा चेहेराही मला हेंच सांगत होता. कृपा करा आणि हें खरें आहे काय हें खरें सांगा. आतां तरी आपणा चौघांचीही एकच जात आहे, याविषयीं तुमची खात्री झाली आहे ना ?"

**कृष्णा**—" होय. याबद्दल माझ्या दिलाची आतां बालंबाल खात्री होऊन चुकली आहे. लीलाताई, तुमचा तर्क अगदीं बरोबर आहे पहिली गोष्ट म्हणजे आम्ही असहकारितेच्या तत्त्वाचा अंगिकार केल्याचें कळताच आम्हाला दोघांनाही आमच्या वडील माणसांनी घराबाहेर काढलें. मला तर फारसे मित्रच नाहींत म्हणा ! पण या केशवाला आपले मित्र असे वाटणारे कित्येक गृहस्थ होते. पण ते आपले मित्र नव्हेत हें याला आजच कळून आलें आहे. मित्र म्हणून म्हणविणारानी आमच्यासाठीं चारआठ दिवसही घस्त सोसण्यास तयार होऊं नये, याबद्दल आम्हाला आश्चर्य तर वाटलेंच पण इतक्या दिवसांच्या त्यांच्या ढोंगीपणाचा संतापही आला. आम्ही पुढाऱ्यांच्या सांगण्याप्रमाणें कांहीं दिवस मुंबईत काढून पुढें ते सांगतील तेथें प्रत्यक्ष कार्य करण्यास जावयाचें ठरविलें होतें. आम्हाला खरी अडचण पडली आहे ती रात्रीची. आम्ही दोघेही दिवसाचा वेळ वाटेल तसा घालवूं. पण रात्रीची व्यवस्था काय ? "

**लीला**—" आणि खाण्यापिण्याच्या व्यवस्थेचें कसें काय ? "

**कृष्णा**—" तें तुम्हाला सांगण्याचें मी मुद्दाम टाळीत होतों. कारण तें ऐकल्यावर तुम्हाला कदाचित् वाईट वाटेल. कदाचित् रागही येईल. पण आतां तुम्ही विचारलेंच तेव्हां मला तें आतां सांगणें भागच आहे. मी आजच दुपारीं माझी

होतीं नव्हतीं ती सर्व पुस्तकें आडगिन्हाइकी विकलीं. पोटाची खळगी भरण्यासाठीं माझीं पुस्तकें विकतांना माझ्या जिवाला किती कष्ट झाले असतील याची तुम्हीच कल्पना करा. आतां बाकीच्या लोकांना हें कळलें म्हणजे याला नाहीं तरी पुस्तकांचा कंटाळा आला होता, त्यांचे पैसे उभे करून यानें त्यांचा आपल्या चैनींत व्यय केला असें म्हणतील ! म्हणत ना बिचारे ? मी त्याला काय करणार ? परमेश्वरानें माझ्यावर बिकट प्रसंग आणला आहे खरा. तेव्हां तो प्रेरणा देईल त्याप्रमाणें वागून मला त्यांतून पार पडलें पाहिजे. उद्यां सकाळीं या पैशांचीं वर्तमानपत्रें विकत घेऊन तीं आम्ही विकण्याचें ठरविलें आहे. ”

ही हकीकत ऐकून दोघींच्याही डोळ्यांत अश्रु उभे राहिले. लोक किती नादान असतात पहा ! अशा देशनिष्ठ तरुणांवर असला घाणेरडा प्रसंग त्यांनीं येऊं द्यावा ! बा समाजा, धन्य आहे तुझ्या अकलेची आणि तुझ्या दातृत्वाची !

**लीला**--“ कृष्णराव, तुमची सध्यांची स्थिति पाहून आम्हाला अत्यंत वाईट वाटत आहे, आणि अशा वेळीं आपल्याकरितां शक्य असेल तें करणें हें आमचें कर्तव्य आहे असें आम्हाला वाटतें. तेव्हां तुम्ही आम्हाला आमचें कर्तव्य करण्याला हरकत करणार नाहीं अशी मी आशा करूं कां ? ”

**कृ०**—“ आपल्या या चांगुलपणाबद्दल आम्ही आपले फार आभारी आहोंत. आमचे मित्र म्हणविणारांनीं आम्हाला फसविलें पण तुमचा आणि आमचा विशेषसा परिचय देखील नसतांना आपण, आम्हाला मदत करणें हें आपलें कर्तव्य मानतां ! खरोखर या निरपेक्ष व निःस्वार्थ चांगुलपणाबद्दल आपणाला धन्यवाद तेवढे थोडेच होणार आहेत ! ”

**लीला**—“ मग काय ? एवढी आमची इच्छा तुम्ही मान्य करणार ना ? ”

**कृ०**—“ फार दिलगिरी वाटते, लीलाताई ! या वेळीं कोणाचीही मदत स्वीकारावयाची नाहीं असें आम्हीं ठरविलें आहे. आतां या पुढें आमचा सारा जन्म कष्टांतच जाणार आहे हें आम्हला माहीत आहे; आणि त्याला आमची तयारीही आहे. तेव्हां सारा जन्म दुःस्थितीच्या ज्वालांनीं होरपळून घेण्याइतकी ज्यांच्या मनाची तयारी झालेली आहे, त्यांना संकटाच्या सुरुवातीला जरासा उद्वेग आला, तरी ते त्याला भिऊन आपल्या निश्चयापासून डळमळतील, अशी शंका देखील तुम्ही मनांत आणूं नका. आम्हाला तरी संकटें सोसण्याची हळुं हळुं संवय केलीच पाहिजे ना ?”

**लीला**—" आतां आपल्या मनांत कसलाच किंतु राहिला नाहीं, असें तुम्ही मघाशीं म्हणालांत. पण आतांचे तुमचे शब्द ऐकल्यावर, तें तुम्ही वरकरणी म्हणाला होतात, असें म्हणणें मला भाग पडत आहे."

**कृ०**—" नाहीं. तें मी अगदीं मनापासूनच बोललों होतों आणि आतां बोलत आहे हेंही मनापासूनच बोलत आहें."

**लीला**—" तुम्ही म्हणतां हें जर खरें असेल तर केवळ कर्तव्य म्हणून आम्ही तुम्हाला मदत करण्यास तयार असतांना, तिचा स्वीकार करण्यास तुम्ही कां तयार होत नाहीं ? का आमची मदत स्वीकारणें यांत तुम्हाला कमीपणा वाटतो ?"

**कृ०**—" छे-छे-ती शंकाही मनांत आणूं नका. आतां आपल्यांत कमीपणाचा वगैरे प्रश्नच शिल्लक राहिलेला नाहीं. तुम्हा दोघींबद्दलही आमच्या मनांत आपलेपणा उत्पन्न झाला आहे. मग आतां कमीपणाचा प्रश्नच कुठें संभवतो ?"

**लीला**—" तर मग आमची मदत तुम्ही स्वीकारण्यास तयार आहां ना, असा मी तुम्हाला प्रश्न केला हीच माझी चूक झाली. या वेळीं आम्ही करूं ती मदत तुम्ही स्वीकारलीच पाहिजे असें माझें तुम्हाला सांगणें आहे. नाहीं तर तुम्ही बोलत आहांत हें सारें ढोंग आहे, असेंच आम्ही बेलाशक म्हणूं! तुम्ही आतां आमच्याबरोबर माझ्या घरीं आलेंच पाहिजे. मी माझ्या वडिलांची आणि तुमची ओळख करून देतें. तुम्हां दोघांनाही कांहीं ते प्रत्यक्ष ओळखीत नाहींत. पण या कार्यांत तुम्ही पहिल्यांदा उडी घेतल्याचें जेव्हां मी त्यांना सांगितलें तेव्हां त्यांनीं तुमचें किती कौतुक केलें, याची तुम्हाला कल्पनासुद्धां करतां येणार नाहीं. तुमच्याबद्दल त्यांना काय वाटत आहे याची, तुमची व त्यांची प्रत्यक्ष भेट झाल्यावरच तुम्हाला कल्पना येईल ! या वेळीं तुम्ही माझ्या या विनंतिवजा आज्ञेला मान दिला नाहीं तर मी हा आपला अपमान समजेन. नाहींना येत तुम्ही माझ्या घरीं ?"

कृष्णानें हळूंच केशवाकडे पाहिलें. केशव लीलाताईच्या घरीं जाण्यास तयार होतासें दिसलें.

**कृ०**—" तुम्ही आमचा अगदीं नाइलाजच केलात. आम्ही तुमच्याकडे न येणें हा जर तुम्हाला अपमान वाटत असेल, तर तुमच्याकडे येणें हें आम्हालाही आपलें कर्तव्यच वाटत आहे."

चौघेंही लीलाताईच्या घरीं जाण्यास निघालीं.

# प्रकरण २१ वें.

वसंत नाशकास आला तेव्हां अण्णासाहेब अंथरुणावरच पडलेले होते. त्यांना आज दोन चार दिवस बारीक ताप येऊं लागला होता. वसंताला आलेला पहातांच त्यांना जरा बरें वाटले.

**वसंत**—" अण्णा, तुम्हाला न आवडणारी अशी एक गोष्ट सांगण्याची पाळी आज माझ्यावर आली आहे किंवा ती मी आपण होऊन आपणावर ओढवून घेतली आहे असे म्हटलें तरी चालेल."

**अण्णा**—" म्हणजे आल्याबरोबर ही कुठली मानगड काढलीस ?"

**वसंत**—" आल्याबरोबरच मी हा विषय काढला, यामुळें तुम्हाला आश्चर्य वाटणें सहाजिकच आहे पण त्याचें महत्वच विशेष असल्यामुळें व तो माझ्या डोक्यांत एकसारखा घोळत राहिला असल्यामुळें, तो केव्हां एकदा माझ्या मनातून नाहींसा होईल असें मला झालें आहे. ती सर्व हकीकत सांगावयाची म्हणजे फारच वेळ लागेल. तेव्हा अगदीं साराशरूपानें ती मी तुम्हाला सागतों. जालियनवाला—बागेंत सरकारनें काहीं पंजाबी लोकांस शिक्षा केली. सरकारच्या दृष्टीनें ते अपराधी होते. अपराधी माणसांस शिक्षा केल्याबद्दल रागावण्याचें कोणाला काय कारण ? पण गांधींच्या डोक्यांत एक वेडाची लहर आली, व त्या भरात त्यांनीं अनत्याचारी असहकारितेची चळवळ देशांत सुरू केली त्या चळवळीच्या अन्वयें विद्यार्थ्यांनीं आपल्या शिक्षण-संस्थांवर बहिष्कार घालावा असा त्यास उपदेश करण्यांत आला. तदनुसार मालती-ताईनीं आपलें कॉलेज सोडलें. माझ्या बुद्धीला हा उपदेश पटला नाहीं. अर्थातच मी माझा विलायतेस जाण्याचा निश्चय बदलण्याला तयार झालो नाही. मालतीबाईचें वागणें मला चुकीचें वाटलें व माझा विचार त्यांना नापसंत वाटला. दोघांच्या मनोवृत्तीच भिन्न, अशी आम्हा उभयतांचा व आप्पासाहेबांची खात्री झाली. तेव्हां अशा परिस्थितींत मालतीताईचा व माझा विवाह होण्यापेक्षां तो न होणेंच श्रेयस्कर असें आमचें तिघांचेंही एकमत झालें. आणि त्याप्रमाणें हा विवाह ठरलाच नव्हता असें समजावयाचें असें आम्ही तिघांनींही ठरविलें व हें तुम्हांला कळविण्यासाठीं मी मुद्दाम इकडे निघून आलों."

**अण्णा**—" तुम्ही तिघेंही अगदीं गाढव आहांत. तूं इतका शिकलेला पण पढतमूर्ख ! ती सुशिक्षित पण कांहीं झालें तरी स्त्रीच ! आणि त्या आप्पाला

लागला आहे म्हातारचळ ! कॉलेजाचा आणि विवाहाचा अर्थाअर्थी संबंध काय ? ती कॉलेजांत गेली काय किंवा घरीं राहिली काय ? तुला काय करायचें आहे ? तिला अभ्यासच होत नाहींसा झाला असता तर तूं काय केलें असतेंस ? तसेंच समजून आपण आपल्या मनाची समजूत करून घ्यावी म्हणजे झालें ! ”

**वसंत**—“ तसें मानून समाधान करून घेणें मला शक्य नाहीं अण्णा ! आपण कॉलेज सोडलें म्हणजे कांहीं एक विशेष कृत्य आपल्या देशाच्या हिताकरितां आपण केलें आहे अशी तिची समजूत झाली आहे आणि मी विलायतेस जाणें म्हणजे अशा परिस्थितींत देशद्रोहच आहे, असें तिचें म्हणणें आहे ! आणि तिनें केला तो मूर्खपणा असून माझेंच वागणें शहाणपणाचे आहे, असें माझे मत आहे. तेव्हां एकमेकाविषयीं एकमेकांच्या इतक्या विरुद्ध भावना असताना विवाहविधीनें परस्परांनीं परस्परांना बांधून घेणें म्हणजे आपल्याच हातानें आपल्या पायावर धोंडा पाडून घेण्यासारखें अविचाराचें होणार नाहीं का ? ”

**अण्णा**—“ बरोबर आहे तुझें म्हणणें. आधीं आतां आघोळ, जेवण तर आटोपून घे. मग करूं आपण सावकाशपणें या गोष्टीचा विचार. ”

वसंत खालीं आला. हा विवाह मोडल्याचें ऐकून अण्णासाहेबांना फार वाईट वाटत होतें. मालतीची त्यांना पूर्ण माहिती होती व हीच आपल्या मुलाला योग्य आहे, असे त्याना वाटत होतें. काहीं तरी करून पुनः हा विवाहाचा योग जुळवून आणावयाचाच, असा त्यांनीं निश्चय केला. एक विचार त्याना सुचला आणि त्याबरोबर वसंत केव्हां एकदा वर येतो, असें त्यांना होऊन गेलें.

वसंत वर आल्याबरोबर त्यानीं आपला डाव टाकण्यास सुरुवात केली.

**अण्णा**—“ अरे, हें बघ त्या देशांतल्या पुढाऱ्यांचें म्हणणें नसलें तुला पसंत तर नसूं दे परतें. पण आतां मी हा असा अंथरुणावर पडलेला. माझे डोळे केव्हां मिटतील याचा कांहीं नेम नाहीं ! तेव्हां कांहीं दिवस तरी तूं आपलें विलायतेस जाणें लांबवावेंस, अशी माझी इच्छा आहे. ”

वसंताच्या लगेच डोक्यांत आलें कीं अण्णांची आपल्या विलायतेस जाण्याच्या आडकाठीसाठीं ही क्लृप्ति आहे. पण तेवढ्यापुरतें ‘बरें’ म्हणून त्यानें कशी तरी वेळ मारून नेली. दुसऱ्या दिवशीं उठल्याबरोबर त्यानें मुंबईच्या एका उत्तम डॉक्टरला तारेनें बोलाविलें. अण्णासाहेबांना हें माहीत नव्हतें. डॉक्टरनीं त्यांना नीट तपासलें व

वसंतरावास म्हटलें, "तुम्ही इतका खर्च कशाला केलात, मला कळत नाहीं. मलाही प्रवासाची दगदग करावी लागली. ताप अगदींच किरकोळ स्वरूपाचा आहे. धास्तीचें कांहींच कारण नाहीं. चार आठ दिवसांतच आपोआप बरें वाटूं लागेल. मला तर कांहीं औषध देण्याची सुद्धां जरुरी दिसत नाहीं. पण आतां एवढा त्रास केलाच आहे, तर देतों औषध लिहून!"

असें म्हणून त्यांनीं एका कागदावर प्रिस्क्रिशन लिहून दिलें व वसंतानें पुढें केलेल्या शंभराच्या दोन नोटा तोंड बरेंच आंबट करून कशा तरी खिशांत घातल्या व आपली वाट सुधारली.

अण्णासाहेब वसंतावर फारच रागावले.

**अण्णा**—"हे नसते उपद्व्याप तुला कोणी करायला सांगितले होते?"

**वसंत**—"हे नसते उपद्व्याप कसे बरें अण्णा? तुमचा आजार अगदींच साधा आहे असें या डॉक्टरनीं सांगितल्यामुळें माझी केवढी मोठी काळजी दूर झाली? नाहीं तर तुम्ही आजारी असतांना मला विलायतेला जाववलें तरी असतें का?"

**अण्णा**—"आणि आतां तरी तुझी काळजी दूर झाली असें तूं कशावरून समजतोस? डॉक्टर म्हणजे काहीं ब्रह्मदेव नाही कीं तो म्हणेल तसेंच होईल! त्याला माझा आजारच कळला नाहीं. मला तर माझी या दुखण्यांतून कांहीं धडगत दिसत नाहीं."

**वसंत**—"क्षमा करा मला अण्णा. मी तुम्हाला आतां अगदीं मला जें वाटतें तें स्पष्टच सांगतों. कोणती तरी सबब माझ्या वाटेंत आणून मला विलायतेस जाण्याची संधि मिळूं नये, अशी आपली इच्छा होती, अशी मला शंका होती, आणि म्हणूनच मी त्या डॉक्टरना तुम्हाला कळूं न देतां तारेनें बोलावलें. कारण मला खात्रीच वाटत होती का तुम्हाला माझा बेत अगोदर कळला असता, तर तुम्ही मला तो अंमलात आणूच दिला नसतात. मात्र मी हें अगदीं शपथेवर सांगतों कीं त्या डॉक्टरनीं तुमचा आजार काळजी करण्यासारखा आहे असें सांगितलें असतें तर मात्र मी आपला परदेशीं जाण्याचा बेत निःसंशय तहकूब केला असता."

**अण्णा**—"तुला असा संशय कसा आला, याचेंच मला आश्चर्य वाटतें. तुझ्या विलायतेस जाण्यांत अडथळा उपस्थित करून माझा कोणता फायदा होणार होता?"

**वसंत**—" हें तुम्ही आपल्या फायद्यासाठीं केलें, असें माझें मुळींच म्हणणें नाहीं; इतकेंच नव्हे तर तुम्ही आपल्या स्वतःच्या फायद्यासाठीं कधींच कांहीं करीत नाहीं, असा मला पूर्ण विश्वास आहे. तुम्ही हें सर्व माझ्याच फायद्यासाठीं–म्हणजे तुमच्या दृष्टीनें–केलें हें खरें. मालतीताई मला पत्नी मिळावी अशी तुमची मनापासून इच्छा आहे. कारण मला तिच्याइतकी दुसरी कोणी योग्य पत्नी मिळणार नाहीं अशी तुमची कल्पना आहे."

**अण्णा**--" होय. अशी माझी कल्पनाच नव्हे पण खात्री आहे; आणि म्हणूनच तुमचा विवाह घडून यावा म्हणून ही युक्ति मी मुद्दाम योजिली होती तूं आपला विलायतेस जाण्याचा बेत रद्द केला असतास, म्हणजे मालतीचें समाधान झालें असतें, आणि असल्या क्षुल्लक गोष्टीमुळें तुटलेला संबंध पुनः आपोआप जमला असता. मी तुला खरोखरच सांगतों कीं मालतीच माझी सून व्हावी अशी माझी मनापासून इच्छा आहे."

**वसंत**—" अण्णा, मालती माझी पत्नी व्हावी अशी माझीही फार इच्छा होती. माझें तिच्यावर किती प्रेम होतें याची तुम्हाला कल्पनाही करतां येणार नाहीं. पण तिचे ते मर्मभेदी शब्द माझ्या हृदयाला शल्यासारखे झोंबले आहेत. विलायतेहून बॅरिस्टर होऊन परत आल्यावर वैभवगिरीच्या उच्च शिखरावर आरूढ होऊन, मी तिला खालीं मान घालण्याचा प्रसंग कधीं आणीन असें मला होऊन गेलें आहे. माझें आताचें म्हणणे बरोबर, हें तिला त्या वेळीं पटूं लागेल. स्वार्थापरी स्वार्थ साधून देशहितही मी उत्तम प्रकारें साधूं शकतों हें आढळून आल्यावर ती ओशाळी होईल; आणि मग त्या तशा परिस्थितींत झाल्या गोष्टीबद्दल तिनें जर दिलगिरी व्यक्त केली, तर तिच्याशीं विवाह लावण्याचा उदारपणा दाखवून तिला मी धन्य करीन. असें झाल्याशिवाय माझ्या अंतःकरणावर तिनें केलेली जखम कधींही भरून निघणार नाहीं. अर्थात् मी परत येईपर्यंत ती अविवाहित राहिली तरच माझा हेतु मला साधतां येणार आहे. पण मला बळकट आशा आहे कीं ती तोंपर्यंत अविवाहितच राहील. सध्यांच्या उसळलेल्या लाटेला प्रतिरोध करण्याला ती असमर्थ आहे. तिचें मन माझ्याइतकें खंबीर नाहीं. यावेळीं तिची कोणत्याही प्रकारें समजूत घालणें कोणालाही शक्य नाहीं. तेव्हां मी आताच तुम्हाला सांगितलेला प्रसंग प्रत्यक्ष घडून येईपर्यंत वाट पहाणें भागच आहे. अण्णा, तुम्ही ही गोष्ट आपल्या जिवाला मुळींच लावून घेऊं नका. तुमची इच्छा मी पुरी करीनच करीन. आतां जें

कारण आमच्या विवाहाच्या आड आलें आहे तें आपोआपच दूर होईल आणि मग कसलीच भानगड शिल्लक रहाणार नाहीं."

अण्णासाहेबांस माहीत होतें कीं एकदां वसंतानें एक गोष्ट डोक्यांत घेतली म्हणजे तिची पुरी तड लावल्याखेरीज त्याला चैन पडावयाचें नाहीं म्हणून त्यांनीं 'जशी तुझी मर्जी,' असे म्हणून त्याची बोळवण केली. आणखी दोनचार दिवस तेथें राहून वसंत पुनः मुंबईस आला. या वेळीं तो आपल्या एका मित्राच्या घरीं उतरला होता. आणखी दोनच दिवसांनीं तो बोटींत पाय टाकणार होता.

इकडे ती चौघें लीलाताईच्या घरीं आल्याबरोबर लीलाताईच्या वडिलांनीं कृष्णाचें व केशवाचें प्रेमादरपूर्वक स्वागत केलें, व त्यांनीं आपला जिवंतपणा आपल्या कृतीनें सिद्ध करून दाखविल्याबद्दल त्याचे मनःपूर्वक अभिनंदन केलें.

**कृ०**—"आपण आमचा वाजवीपेक्षां ज्यास्त गौरव करीत आहांत, असें मला वाटतें."

"नाहीं. असलें ढोंग करण्याची मला मुळींच संवय नाहीं. देशाच्या स्वातंत्र्यासाठीं पेटविण्यांत आलेल्या होमकुंडांत आपला पहिला बळी देण्यास तुम्ही तयार झालां असल्यामुळें तुमचा कितीही गौरव केला तरी तो कमीच होणार आहे, असें मला वाटतें. असेच बेडर व बेकदर तरुण लोक आज देशाला हवे आहेत. डिग्र्यांच्या शेपट्या लावून साहेबांचे जोडे पुसणारांची आज देशात मुळींच वाण नाहीं. पांच पन्नास रुपड्याची नोकरी पत्करून बायकामुलांच्या संसाराचा रागडगाडा चालवून त्यांतच समाधान मानणारे देशांत कितीतरी लोक असतील. त्याच्यापासून देशाचें कितीसें व काय हित साधणार आहे? आणि ज्याचा आपल्या देशाला कांहींच उपयोग नाहीं त्या मनुष्यानें जगांत जिवंत रहाण्यांत अर्थ तरी काय? संसारावर तुलसीपत्र ठेवून कोणत्याही स्वार्थाची अपेक्षा न ठेवतां, त्याग हाच भोग असा मनाचा ठाम निश्चय करून, जें जें म्हणून देशहिताचें तें तें करण्यास अहमहमिकेनें पुढें सरसावणारे तरुण हेच या अभागी देशाचे खरे आधार-स्तंभ आहेत; आतां, या चळवळीमध्यें भाग घेणाऱ्यांपैकीं कांहीं माणसें ढोंगी किंवा आपमतलबीही असतील! ते सर्वच सज्जन आहेत असें म्हणण्याचें धाडस मी करूं इच्छीत नाहीं. पण या चळवळीपासून अलिप्त रहाणारे भित्रे व स्वार्थी लोक तरी सर्वच सज्जन आहेत, असें थोडेंच आहे? ज्यांना आपल्या स्वतःच्या स्वार्था-

आड येईल असें कांहीं करावयाचें नाहीं, अशांचे हे मतलबी युक्तिवाद असतात. तुमच्याबद्दल तर असल्या प्रकारचा संशय घेण्यास जागाच नाहीं. अभ्यासाचा कंटाळा आल्यामुळें तुम्ही आपलें कॉलेज सोडलेंत असें म्हणण्याची सोयच नाहीं. कारण कॉलेजांत तुम्ही होतांत तोंपर्यंत आपल्या बुद्धीच्या चमकीनें कित्येक वेळां सर्वांना दिपवून टाकलें आहे. लीलेनें मला तें सर्व सांगितलें आहे. बरें यात तुमचा कांहीं स्वार्थ आहे असें तरी कोण म्हणूं शकणार ? उलट शिक्षण सुरूं ठेवण्यांतच तुमचा स्वार्थ साधला असता. इतके दिवस अनेक हालअपेष्टा सोसून तुम्ही आपल्या शिक्षणाची येथवर मजल मारलीत. आतां आणखी थोड्याच दिवसांनीं तुम्ही B. A. झाला असतांत; व मग तुम्हाला निदान कष्ट सोसण्याचें कारण तरी खास पडलें नसतें पण तुमचें अंतःकरण इतकें सकुचित नाहीं, हें तुम्ही आपल्या कृत्यानें जगाला सिद्ध करून दाखविलें आहे. माणसाच्या इतर कोणत्याही गोष्टीपेक्षा अंतःकरणाची किंमत करावयाची असते. आपल्या देश साठीं स्वार्थत्याग करण्यास तयार असलेल्या माणसाच्या अंतःकरणाची परीक्षा ती कसली करावयाची ? कोणतेंही कृत्य निःस्वार्थ बुद्धीनें करणाऱ्या माणसाची परीक्षा घेण्याचा कोणाला अधिकारच नाहीं. तुम्ही लीलेच्या विनंतीला मान देऊन आमच्या घरीं आलात याबद्दल मी तुमचे पुनः एकदां आभार मानतों. " लीलाताईचे वडील–काशिनाथपंत म्हणाले.

**लीला**—"मालतीचें ठरलेलें लग्न मोडण्याला ही चळवळच कारण झाली. वसंतराव कांही केल्या चळवळींत भाग घेण्यास तयार होईनात. उलट ते यांत पडणाऱ्या व पडण्यास उपदेश करणाऱ्या पुढाऱ्यांनाच मूर्ख म्हणूं लागले. मालतीला अर्थातच हें आवडलें नाही. तिचें त्यांच्यावर निरतिशय प्रेम असतांही या त्यांच्या अंगचोरपणामुळें तिनें तुमच्याशीं विवाह करण्यास साफ तयार नाहीं, असें अगदीं त्यांच्या तोंडावर सांगितलें."

**काशिनाथ०**—" याबद्दल मालतीही अभिनंदनास पात्र आहे. आपल्या देशाच्या कल्याणासाठी कायावाचामनेंकरून झटणाऱ्या थोर लोकनायकांना मूर्ख म्हणून त्यानें आपलें स्वतःचेंच मूर्खपण प्रदर्शित केलें; आणि समजा की ते पुढारी एक वेळ या वसंतरावांएवढे बुद्धिमान नसले, तरी काय झालें ? यांच्या जवळ अगदीं बृहस्पतीचें बुद्धिभांडार असलें तरी त्याचा जर त्यांच्या स्वतःच्या व आपल्या देशाला गुलामगिरीच्या कर्दमांत खितपत ठेवण्यासाठीं अहर्निश झटणाऱ्या सरकारच्या कल्याणासाठीं विनियोग व्हावयाचा असेल, तर त्या भांडाराचा देशाला उपयोग तरी

काय ? त्यापेक्षां आपल्या जवळ जें असेल नसेल तें देशाच्या व देशाच्याच चरणीं अर्पण करणारांचीच योग्यता आम्ही श्रेष्ठ मानणार. हा विवाह मोडण्याचें मनोधैर्य तेनें दाखविलें हें खरोखरच कौतुकास्पद आहे. आतां यामुळें वसंतरावांना जन्मभर अविवाहित रहावें लागणार आहे असें थोडेंच आहे ? असल्या निव्वळ स्वार्थावर दृष्टि ठेवणाऱ्या, आपल्या स्वतःच्या बुद्धिवैभवाबद्दल फाजील विश्वास बाळगणाऱ्या व तिचा यत्किंचितही उपयोग राष्ट्राकडे होऊं न देणाऱ्या ढोंगी माणसाशीं विवाह करण्याचा इन्कार करणे हेंच तिचें कर्तव्य होतें. आता त्यांच्याच विचारसरणीच्या कित्येक कुमारिका देशात असतील, त्यांच्यामध्यें कदाचित् वसंतरावांच्या गळ्यांत माळ घालण्यासाठींही कित्येक आतुर असतील. पण सिंहिणीनें, आपला प्रियकर सिंह नाहीं असें दिसून येतांच त्याच्याकडे पाठ फिरविणें हेंच योग्य. बरें, तें जाऊं दे आतां. आतां तुम्ही दोघांनींही, तुम्ही मुंबईत आहांत तोंपर्यंत आमच्या इथेंच राहिलें पाहिजे. लीला जशी माझी मुलगी आहे, तसेच तुम्हीही माझे मुलगेच आहांत, असें मी मानतों. मग काय ? एवढें माझें म्हणणें तुम्ही ऐकणार ना ? ”

**कृष्णा**—“ तुम्हाला आम्ही आजपर्यंत कधी पाहिलेलेंही नाही. असें असतांनासुद्धा आम्हाला इथें आल्याबरोबर जणुं कांही आम्ही आमच्याच घरीं आलों आहोत असें वाटूं लागलें आहे. मला तर इतक्या मायेनें बोलणारा मनुष्य आजपर्यंत हा केशवच एकटा होता. परंतु तुम्ही माझा जो गौरव केलात, त्यानें मात्र मी अगदीं ओशाळल्यासारखा झालों आहें. खरोखरच मी तुम्हाला सांगतों कीं यांत आम्ही विशेष कांहीं केलें आहे, असें आम्हाला वाटत नाही. आम्ही आमच्या कर्तव्याला जागलों एवढे मात्र खरें. मला आपल्या म्हणण्याच्या आड येतां येत नाही. या मुंबईतून प्रत्यक्ष काय करण्यासाठीं बाहेर पडेपर्यंत आपल्या इथें रहाण्यास आम्ही तयार आहोंत. झालें ना लीलाताई, आतां तुमच्या मनासारखें ? ”

लीलाताईंचा आनंदी चेहेराच उत्तर देत होता. मालतीचा चेहेरा मात्र किंचित् खिन्न दिसत होता.

**मा०**—“ मला मात्र यांच्याकरितां कांहींच करण्याची संधि मिळाली नाहीं. ”

**लीला**—“ अग, तूं आणि मी निराळ्या कां आहों ? मी काय आणि तूं काय ? तरी पण तुला कांहीं तरी करावयाचेंच असेल तर एक काम करायला सांगतें तुला मी. हे इथें रहातील तोंपर्यंत सकाळीं आणि संध्याकाळीं तुला इथें आलेंच पाहिजे, हेंच तें काम. ”

लीलाताईचें बोलणें ऐकून सर्वांना हंसूं आलें. आणखी थोडा वेळ इकडचें तिकडचें बोलणें झाल्यावर मालती घरीं जाण्यास निघाली. लीला तिला पोहोंचविण्यास जिन्यापर्यंत गेली. ती उतरूं लागल्यावर लीलेनें तिला हळूंच विचारलें, " तुला नेमलेली शिक्षा तुझ्या लक्षांत राहील ना ? पहा बरं. तिच्या अंमलबजावणीत जर चूक झाली तर हे इथें आहेत तोंपर्यंत तुलाही इथेंच रहाण्याची शिक्षा मला फर्मावावी लागेल."

" राहील बरं लक्षांत, लीलाताई, अगदीं काळजी करण्याचें कारण नाही," मालती हंसून म्हणाली. दोन पावलें खालीं उतरल्यावर लीलेला आपल्याजवळ ओढून हळूंच तिच्या कानांत म्हणाली, " पहिली शिक्षा मुद्दाम टाळून शिक्षेची मुदत वाढवून घेण्याइतकी काहीं मी उल्लू नाही, बरं का ? "

लीलेलाही हंसूं आलें. मालतीनें लीलेच्या न कळत आत कृष्णा व काशिनाथ-पंत बोलत बसले होते, तिकडे बघितलें. तो क्षण तिला अतिशयच चमत्कारिक वाटला. तिला काय झालें हें तिचें तिलाच कळेना. आजपर्यंत जें आपल्याला कधी वाटलें नाहीं किंवा भासलें नाही, त्याचा आज आपल्याला प्रत्यक्ष अनुभव घ्यावयास मिळत आहे असा तिला भास झाला. संकटात सांपडलेल्या या सच्छील व तेजस्वी तरुणाचें संकट निवारण होऊन तो सुखात पडलेला पाहूनच आपल्याला असें वाटत असलें पाहिजे, असें तिनें आपल्या मनाचें समाधान करून घेतलें. समाधान करून घेतलें खरें, पण घरीं जाऊन जेवणखाण झाल्यावर देखील तिला आपल्याला असें काय होत आहे, हें समजेना. अंथरुणावर पडून तिनें आपले डोळे मिटून घेतले तरी आपला तोच एक विचार ! तिची फार चमत्कारिक स्थिति झाली ! तिला सर्वत्र कृष्णा दिसूं लागला. त्याला पुनः केव्हां भेटेन असे तिला होऊन गेलें. ती आपल्या मनाला एकसारखा उपदेश करीत होती, " वेड्या मना, तूं इतकें थिल्लर असशील अशी आतापर्यंत मला कल्पनाही नव्हती. दोन दिवसांपूर्वीपर्यंत तुझें वसंतरावांवर प्रेम होतें ना ? आणि इतक्या थोड्या अवधींत त्यांच्यावरील प्रेमाचा लोप होऊन तूं कृष्णरावांकडे भिरक्या मारूं लागलेंस ? पण वसंतरावांवर माझें खरो-खरच प्रेम होतें काय ? का त्यांच्यावर माझें प्रेम आहे असा मला इतके दिवस नुसता भासच होत होता ? मी ज्याला प्रेम म्हणून समजत होतें, तें प्रेम नसून मला त्यांच्या कांहीं गुणांविषयीं वाटत असलेला तो आदर होता. आदरामुळें प्रेम उत्पन्न होत असतें हें खरें असलें तरी आदर म्हणजे प्रेम खात्रीनें नव्हे. कारण तसें असतें तर त्या क्षणीं-कृष्णरावांकडे माझी न कळत नजर जातांच जी एक चमत्का-

रिक भावना माझ्या अंतःकरणांत उद्भवली, तशी ती वसंतरावांबद्दल कधीच उद्भवलेली मला आठवत नाहीं. मग काय कृष्णरावांवर माझें प्रेम बसलें आहे कीं काय ? छे. आज इतक्या दिवसांत आमचें कधीं बोलणेंचालणें सुद्धां नाहीं. मग असें कसें होईल ? परमेश्वराच्या मनांत काय आहे न कळे ! देवा, तूंच सर्वांचें कल्याण करणारा आहेस." या विचारानें तिचें बावरलेलें मन शांत झालें आणि कांही वेळानें तिला झोंप लागली. अर्थातच ती अगदीं शांत लागली नाहीं. मधून मधून स्वप्नें तिचा भंग करीत होतींच. तीं निरनिराळ्या प्रकारचीं होतीं. पण त्या प्रत्येक स्वप्नांत एक तरुण मात्र तिला दिसावयाचाच ! तो तरुण कोण हें सांगण्याची कांहीं आवश्यकता वाटत नाहीं.

# प्रकरण २२ वें.

वसंत मुंबईस आल्यावर ज्या मित्राच्या घरी उतरला होता, त्या मित्रानें कृष्णा, केशव, मालती व लीला यांच्या एकंदर हालचालीची इत्थंभूत बातमी वसंताला दिली. त्या चौघांच्या एकमेकाच्या वागणुकीचा त्या सद्गृहस्थांनी आपल्या मनोवृत्ती-प्रमाणेंच अर्थ बसविला होता. मालतीचा वसंतानें अव्हेर केला—कारण त्या मित्राला वसंतानें असेंच भासविलें होतें. तेव्हां तिला आपली कांही तरी व्यवस्था करणें भागच होतें लीला तर काय बोलूनचालून बालविधवा ! तेव्हां ती गरजू असलीच पाहिजे हें सांगण्याला कांहीं एखाद्या ज्योतिषानें आपले ग्रंथ चाळावयास नकोत. वरवर शुद्धपणाचा तिनें कितीही आव आणला तरी समाजाच्या भीतीच्या दडपणाखालीं दडपून ठेवलेले मनोविकार कधींतरी उसळून प्रगट झाल्याशिवाय थोडेच रहाणार आहेत ? अनायासेंच हे दोन उल्लूभाई त्यांना मिळाले ! या दोघींना गरज आणि ते दोघेही फटिंग ! मग काय विचारतां ? दोन्ही पक्षांचें काम भागलें ! वसंत मालतीसंबंधानें या गोष्टीवर विश्वास ठेवण्यास तयार होईना. लीलाताई, कृष्णा, केशव यांच्या बाबतींत मात्र त्याचा मित्र जें जें वाईट म्हणून सांगे, तें तें त्याला अगदीं खरें वाटे ! म्हणजे माणसाची दृष्टि कशी चमत्कारिक असते पहा ! मालतीवर याचें पूर्वीपासूनच प्रेम होतें म्हणून ती मात्र जें कांहीं करील तें शुद्ध भावनेनें केलेलें असावयाचें आणि बिचाऱ्या कृष्णानें किंवा केशवानें कांहीं केलें तर तें मात्र स्वार्थ-

बुद्धीनें व पापवासनेनें केलें असें मानावयाचें ! लीला तर बिचारी काय ? ती अगदीं कायावाचामनेंकरून शुद्ध आहे असें प्रत्यक्ष ब्रह्मदेवानें खालीं उतरून सांगितलें असतें तरी त्यानें विश्वास ठेवला नसता. पण तो मित्र जेव्हां त्या गोष्टींत मालतीचें नांव एकसारखें प्रामुख्यानें गोंवूं लागला तेव्हां मात्र वसंताच्या मनाची चलबिचल सुरूं झाली. वसंताला जाण्याला आतां फक्त एकच दिवस मध्यें होता. मालतीसंबंधानें त्याला लागलेली रुखरुख कमी होईना. शेवटीं त्यानें एका मुलीबरोबर तिला पत्र पाठविण्याचें ठरविलें व त्याप्रमाणे तें लिहिलेंहीं. तो मुलगा आप्पासाहेबांच्या घरीं आला, तेव्हां मालती लीलाताईच्या घरीं आली होती. तिला कृष्णरावांशीं काय बोलूं आणि किती बोलूं असें होत असे ! पण तें फक्त आपल्या स्वतःच्या घरीं असतांनाच. पण त्याची आणि तिची प्रत्यक्ष गांठ पडली कीं तिच्या तोंडाला जें कुलुप बसावयाचें तें लीला तिला जिन्याशीं पोहोंचवायला गेल्यावर उघडावयाचें ! तोंपर्यंत त्या तिघाचें बोलणें नुसतें ऐकत बसावयाचें, मधून मधून थोडेंसें हंसावयाचें आणि कोणी आपल्याकडे पहात नाहीं अशी संधि साधून कृष्णाकडे पहात रहावयाचें ! ती आली, त्यानंतर थोड्याच वेळानें कृष्णा व केशव बाहेरून परत आले. ते येईपर्यंत मात्र तिच्या तोंडाची टकळी एकसारखी सुरूं होती. कृष्णाचें पाऊल उंबरठ्यांत पडलेलें पहातांच मात्र ती बंद पडली.

**कृ०**—" लीलाताई, आज त्यांनीं आपला पुढील कार्यक्रम आंखला बर कां ? मी आणि केशव परवांच propaganda करण्यासाठीं बाहेर पडणार. आम्हाला आमच्या इच्छेप्रमाणें प्रत्यक्ष कार्य करण्याची संधि इतक्या लवकर प्राप्त झाल्यामुळें आम्हाला किती आनंद झाला आहे म्हणून सांगूं ?"

कृष्णा परवां जाणार आहे कळल्याबरोबर मालतीचा प्रफुल्लित चेहरा एकदम उतरला. लीलाताईच्या हें लक्षांत आल्याखेरीज राहिलें नाहीं.

**लीला**—" तर मग प्रत्यक्ष कांहीं तरी कार्य करण्याची इतक्या दिवसांची तुमची महत्त्वाकांक्षा आतां सफल होणार तर ! रणभूमीवर दाखल होण्यासाठीं आतुर झालेल्या सैनिकांना रणशिंग ऐकल्याबरोबर किती आनंद होत असेल, याची तुम्हाला आतां कल्पना आली असेल ! "

**कृ०**—" होय. खरें आहे तुमचें म्हणणें. लोकमान्य सरदारगृहांत आजारी असतांना मी व केशव त्यांचें दर्शन घेण्यासाठीं गेलों होतों. त्या महात्म्याचें दर्शन

घेतल्याबरोबर स्वातंत्र्यदेवीनें आमच्या अंगांत संचार केला व काय होईल तें होवो, आपलें जीवित देशकार्यालाच अर्पण करावयाचें, अशी आम्ही त्या वेळीं प्रतिज्ञा केली. मला तर ती वेळ अगदीं चांगली आठवत आहे. केशव, तुला सुद्धां तो प्रसंग आठवत असेल, नाहीं ?"

**के०**—"आठवत असेल म्हणून काय विचारतोस ? त्या दिवसाची आठवण माझ्या मनांतून केव्हाही नाहींशी होणार नाही. खरोखरच त्या महात्म्याचे आम्हा दोघां पामरांवर महदुपकार आहेत. आतां त्यांच्यासारखें महत्कार्य आम्हा कीटकांच्या हातून कसें होणार ? तरी पण कितीही पराक्रमी सेनापति असला तरी त्याला सैनिकांची आवश्यकता असतेच कीं नाही ? आपापल्या मगदुराप्रमाणें देशाला स्वातंत्र्य मिळवून देणाऱ्याला मदत करणें हें आमचें कर्तव्य आहे; आणि तें बजावीत असतां कोणताही प्रसंग आमच्यावर ओढवला तरी आम्ही त्यापासून च्युत होणार नाहीं."

**लीला**—"आतां प्रसंगांना काय तोटा ? आतां तुम्ही गांवोगांव फिरूं लागल्यावर संकटपरंपरेलाच सुरुवात होणार आहे. पण आमची अगदीं पक्की खात्री आहे कीं तुम्ही काहीं डगमगणार नाही. तुमचे जर हें सारें ढोंग असतें तर तसा संशय कोणालाही आला असता. पण देशाच्या स्वातंत्र्यासाठीं धडपडत असता स्वार्थाची यत्किंचितही पर्वा न करणारे तुम्ही, संकटांना भिऊन माघारे परताल, अशी शंका मूर्खाशिवाय कोणाच्याही मनांत येणें शक्य नाहीं. बरें, पण आतां तुम्ही एकदां बाहेर पडल्यावर आपल्या या भगिनीची आठवण तरी ठेवाल का ?"

**कृष्णा**—"काय प्रश्न विचारलात तुम्ही हा लीलाताई ? आम्ही तुम्हाला विसरण्याइतके कृतघ्न होऊ अशी शंका तरी तुमच्या मनाला कशी शिवली, याचें मला आश्चर्य वाटतें. मला स्वतःला बहीण नसल्यामुळें भगिनीप्रेम ही काय चीज आहे, याची थोड्याच दिवसांपूर्वीपर्यंत मला कल्पनाही नव्हती. परमेश्वरकृपेनें मला तुम्ही आपला भाऊ म्हणून माझा गौरव केलात, तर तुम्हालाही, तुम्हाला सख्खा भाऊ नसल्याची जाणीव मी कधींही होऊं देणार नाही. आज चारपांच दिवसांच्या आपल्या प्रेमळ स्वभावानें मला नवजीवन प्राप्त झाल्यासारखें वाटत आहे. तुमच्यासारख्या देवतातुल्य स्त्रीला भगिनी समजण्याचा मान तुम्ही मला देत आहांत याबद्दल मी आपला फार आभारी आहें. तुमची आठवण होणार नाहीं असा यापुढील माझ्या आयुष्यांतील एकही दिवस जाणार नाहीं. उलट मलाच अशी धास्ती वाटत आहे कीं

एकदां आम्ही दृष्टिआड झाल्यावर तुम्हाला आमची कधीं तरी आठवण होईल कीं नाहीं न कळे!"

**लीला**—"स्त्रीहृदयाची तुम्हाला नीटशी कल्पना नसल्यामुळेंच तुम्हाला अशी धास्ती वाटत आहे. स्त्रियांचें शरीर दुर्बल असलें तरी हृदय दुर्बल नसतें. त्याच्या अंतःकरणाच्या चिकाटीशीं तर पुरुषाच्या चिकाटीची तुलना सुद्धां करितां येणार नाहीं. कोणत्याही भावनेनें–मात्र ती खरी भावना असली पाहिजे, तो भास असतां उपयोगी नाही–( असें म्हणून लीलेनें हलकेंच मालतीकडे पाहिलें. मालतीच्या लक्षांत लीलेच्या बोलण्याचा रोख आलाच. ) एकदा स्त्रीच्या हृदयात आपलें ठाणें दिलें म्हणजे त्या हृदयाचे तुकडे उडाले तरी ती भावना तेथेंच दृढ असते ती नाहीशी होत नाहीं. मला एखादा भाऊ नसावा याबद्दल मला अतिशय वाईट वाटत असे. देवानें कृपावंत होऊन मला एकदम दोन भाऊ दिले. तुम्हाला मी जन्मभर विसरणार नाहीं व तुमचें सदासर्वकाल कल्याण होवो, अशी परमेश्वराजवळ मी नेहमीं प्रार्थना करीत राहीन."

**कृष्णा**—"तुमच्यासारख्या सच्छील बहिणीनें शुद्ध अंतःकरणानें केलेली प्रार्थना आमचें सदैव कल्याणच करील हा मला पूर्ण भरंवसा आहे."

तो आणखी कांही बोलणार तों वसंतानें पाठविलेला मुलगा मालतीचा शोध करीत तेथें आला. मालतीनें तो कोण, कोठून आला, वगैरे चौकशी केली. तेव्हां त्यानें वसंताचें पत्र तिला दिलें व याचें ताबडतोब उत्तर मागितलें आहे असें सांगून बाहेर जाऊन उभा राहिला. मालती एका बाजूला गेली व तें पत्र फोडून वाचूं लागली. त्या तिघांचें आपसांत बोलणें सुरूच होते. त्या पत्रातील मजकूर असा होता.

" प्रिय मालतीताई यांस,

सप्रेम आशिर्वाद, विशेष—

मी आपणाकडून निघाल्यावर नाशकास जाऊन आलों. आपला विवाह मोडल्याबद्दल तुम्हांला किंवा मला जितकें वाईट वाटलें नसेल तितकें ती० अण्णांना वाटलें. आपला विवाह व्हावा, ही इच्छा त्यांच्या मनांत किती उत्कटतेनें वास करीत आहे, याची मला तोंपर्यंत कल्पनाही नव्हती. परंतु आपणां दोघांचाही इलाज नाहीं. ज्यांचा विवाह

व्हावयाचा त्या दोघांनाही त्याच्या अनिष्टतेबद्दल जर खात्री आहे, तर इतरांना तो कितीही इष्ट वाटत असला तरी उपयोग काय? तेव्हां त्या संबंधानें अतःपर विचारच करावयाचा नाही असें मी ठरविलें आहे.

हें जर खरें असेल तर तुम्हाला पत्र लिहिण्याची जरुरी काय असा प्रश्न सहाजिकच उद्भवतो; पण तेंच मी आतां सांगणार आहें.

तुम्हाला माहीतच आहे कीं माझे सर्व मित्र cultured आहेत. खरें सांगावयाचें म्हणजे माझ्या पोझिशनला शोभणार नाहींत, अशांशी मी नुसतें बोलणें चालणें सुद्धां न ठेवण्याची सावधगिरी बाळगीत असतों. सध्यां मी ज्या मित्राकडे उतरलों आहें तो तर फारच refined gentleman आहे; तेव्हां इतक्या थोर माणसाच्या तोंडून मला आपल्यासंबंधीं जें कांहीं ऐकून घ्यावें लागलें, ते खरोखरच खरें आहे कीं काय याचा एकदां पडताळा तरी पहावा म्हणून हें पत्र मुद्दाम लिहीत आहें.

तुम्हाला हें अगोदरच सांगून ठेवणें मला इष्ट वाटतें कीं त्यानें तुमच्यावर जे charges ठेवले आहेत, त्यांवर माझा यत्किंचितही विश्वास नाहीं. पण जर विश्वास नाहीं तर हें सर्व लिहिण्याचा खटाटोप तरी कां केला, असें तुम्ही म्हणाल. पण याचें उत्तर अगदींच सोपें आहे. माझ्याविषयीं तुमच्याजवळ कोणी वाईटसाईट बोललें असतें तर तुम्हीसुद्धां त्या गोष्टीवर विश्वास तर ठेवला नसतातच, पण प्रत्यक्ष माझ्याकडून त्याबद्दल पुरी शहानिशा करून घेतल्याखेरीज तुम्हालाही चैन पडलें नसतें. आपला विवाह आपण मोडला असला तरी आपणाला एकमेकांविषयीं वाटत असलेल्या प्रेमाचा लोप होणें शक्य नाहीं. तें कायमच रहाणार!

तुम्ही व लीलाताईनीं कृष्णाला व केशवरावांना सहानुभूति दाखविली हें माझ्या मित्राच्या दृष्टीनें अत्यंत गैरवाजवी झालें. त्यानें त्याचा फारच निराळा अर्थ केला. याहून अधिक फोड करून सांगण्याची आवश्यकता वाटत नाहीं. तुमचें माझ्यावरील प्रेम इतक्या लवकर अस्ताला जाईल अशी शंकाही माझ्या मनाला आजपर्यंत शिवललेली नाहीं आणि आजही तसें मला वाटत नाहीं. पण माझ्या मित्राची खात्री पटवून देण्यासाठीं मला हा खटाटोप करणें भाग पडत आहे. तरी तुम्ही त्याबद्दल स्पष्ट काय तो खुलासा कराल, अशी मला आशा आहे. कृष्णा, केशवराव व लीलाताई यांच्यासंबंधानें त्यानें जे प्रलाप काढले त्यांशीं मला कांहीं कर्तव्य नाहीं. त्यांचा व माझा संबंध काय? पण तुमच्याविषयीं कोणी कांहीं कमीजास्त बोललेलें मला केव्हांही खपणार नाहीं, व मी तें निमूटपणें बरदास्तही करणार नाहीं.

आतां शेवटली एकच विनंति करावयाची आहे. ती ही कीं मी परवांच्या दिवशींच विलायतेस जाण्यासाठीं निघणार आहें. तरी तुम्ही मला भेटण्याकरितां डेकवर येण्याची मेहेरबानी करावी. पत्र घेऊन येणारा मुलगा माझ्या मित्राचाच नोकर आहे. तेव्हां तुम्हाला जें कांहीं लिहावयाचें असेल तें अगदीं मनमोकळेपणानें लिहिण्यास हरकत नाहीं. त्याचा स्फोट होईल अशी भीति बाळगण्याचें मुळींच कारण नाहीं. कळावें.

आपला,

**वसंत "**

मालतीला हें पत्र वाचून अतिशय राग आला व तिनें लीलाताईस एकीकडे बोलावून तिला तें वाचण्यास दिलें आणि यांना आतां उत्तर काय पाठवावयाचें म्हणून विचारलें. लीलाताईनीं तें वाचून पाहिलें व 'तुझ्या मनांत जें उत्तर पाठवायचें आहे तेंच बरोबर आहे,' असें सांगून त्या पुनः त्या दोघांशीं बोलण्याकरितां निघून गेल्या. मालती एका टेबलाशीं उत्तर लिहिण्याकरितां बसली.

**कृ०**—"लीलाताई, आज तीनचार दिवस मी आपली गंमत पहातों आहें कीं तुमचा व आमचा मालतीताईपेक्षां किती तरी कमी परिचय असतांना तुम्ही आमच्याशीं इतक्या मनमोकळेपणानें वागत असतां! पण मालतीताई इथें येऊन रोज तासचे तास बसतात, पण आमच्याबरोबर दोन शब्दही बोलण्याची त्यांना कधीं इच्छा होत नाहीं, हें कसें बरें ?"

**लीला**—"तिचा स्वभावच जात्या घुमा! ती माझी इतक्या दिवसांची अगदीं जीवाभावाची मैत्रीण! मी तिच्यापासून व ती माझ्यापासून अगदीं कांहीं म्हटल्या कांहीं सुद्धां लपवून ठेवीत नाहीं. असे असून सुद्धां मी तासचे तास तिच्याशीं बडबड करीत बसल्यावर तिच्या तोंडून एखादा शब्द बाहेर पडला तर नशीब समजावयाचें! ही झाली माझ्याशीं बोलण्याची गोष्ट! मग तुमच्याशीं ती कांहीं प्रश्न विचारल्याशिवाय कुठली बोलायला? नशीबच म्हणायचें कीं माझ्या विनंतीला मान देऊन कबूल केल्याप्रमाणें ती इथें रोज येऊन बसत तरी असते! मला तर तिच्यासंबंधानें तोही विश्वास वाटत नव्हता."

**कृ०**—(हंसून) "म्हणजे काय लीलाताई, मालतीताईची आणि तुमची

इतक्या वर्षांची दाट मैत्री असतांना त्यांच्यावर तुमचा विश्वास नाहीं म्हणतां ? केशवाचा आणि माझा तर एकमेकांवर अगदीं पूर्ण विश्वास आहे. "

**लीला**—" वा ! म्हणजे मी बोलल्यें त्याचा तुम्ही अगदीं अक्षरशःच अर्थ केलात ! माझ्या म्हणण्याचा अर्थ अगदींच निराळा होता. ती इतकी घुमी आणि एकलकोंडी आहे कीं तुम्हाला हा तिचा स्वभाव माहीत असता तर तुम्हालाही माझ्यासारखेंच वाटलें असतें. "

मालती तिकडे पत्र लिहीत बसली होती, पण तिचें सर्व लक्ष यांच्या बोलण्याकडेच होतें. लीलाताईच्या मनांत कांहीं तरी निराळेंच बोलावयाचें असून ती कशी तरी वेळ मारून नेत आहे, हें तिच्या तेव्हांच लक्षांत आलें. नंतर मात्र एकदां काय तें लिहून टाकलेलें बरें असा विचार करून पत्र पुरें होईपर्यंत त्यांच्या बोलण्याकडे मुळींच लक्ष द्यावयाचें नाहीं असे तिनें ठरविलें; व कसें तरी तें एकदांचें संपवून लीलाताईला वाचण्यास दिलें.

" श्री. वसंतराव यांस—

तुम्ही मला आणि तेंही इतकें चमत्कारिक पत्र पाठवाल अशी मला कल्पना नव्हती. तुमचे सर्व मित्र cultured आहेत आणि त्यांतल्या त्यांत सध्यां तुम्ही ज्यांच्या घरीं उतरलां आहात ते तर तुमचे अगदीं खास मित्र आहेत, तेव्हां त्यांच्यासंबंधानें तर बोलावयास नको, असें तुम्ही लिहितां. पण त्यांनीं माझ्यावर, माझ्या मैत्रिणीवर आणि कृष्णराव व केशवराव यांच्यावर, तुम्हाला लिहूनही दाखवितां येत नाहींत असे आरोप केले असें तुम्ही लिहितां व त्यांबद्दल तुम्ही मला खुलासा विचारतां. त्यांतल्या-त्यांत, तुमच्या म्हणण्याप्रमाणें माझ्यावर तुमचें प्रेम असल्यामुळें, तुमच्या मित्रानें माझ्यावर केलेले आरोप तुम्हाला खरे वाटत नाहींत. परंतु कृष्णराव, केशवराव आणि लीलाताई यांच्यावरील आरोपांबद्दल तुम्हाला कांहींच वाटत नाहीं, याचें, मला तुमच्या स्वभावाची चांगली ओळख असल्यामुळें फारसें आश्चर्य वाटत नाहीं.

आम्हा चौघांवर कांहीं तरी घाणेरडे आरोप करणाऱ्या तुमच्या मित्राच्या मनाच्या संस्कृतीची तारीफ करावी तेवढी थोडीच होणार आहे. खरोखर, तुम्हाला इतक्या उच्च विचारसरणीचें मित्रमंडळ लाभलें आहे, यावरून तुम्ही खरोखरच फार भाग्यवान आहांत. दुर्दैव माझें कीं माझी वा माझ्या मैत्रिणीची विचारसरणी इतक्या उच्च

दर्ज्याची नसल्यामुळें असले आरोप आम्हांला दुसऱ्यांवर करतां येत नाहींत व ते खरे कीं खोटें हें पटवून घेण्याचा उपद्व्यापही आम्ही करीत बसत नाहीं.

मी व लीलाताईनें कृष्णराव व केशवराव यांस सहानुभूती दाखविली हें तुम्हाला व तुमच्या मित्राला आवडलें नाहीं असें तुम्ही लिहितां! पण आम्ही त्यांस सहानुभूति दाखविली ती तुम्हाला आवडावी म्हणून दाखविली नसून तें आम्हाला आमचें कर्तव्य वाटत होतें म्हणूनच दाखविली. कांहीं कांहीं लोकाना कोणी कोणाचें चांगलें करून आपलें कर्तव्य बजावलें तर तें आवडत नाहीं, त्याला काय करायाचें? मी तुम्हाला पुनः स्पष्ट सांगतें कीं या बाबतींत तुमच्या मित्राला किंवा तुम्हाला काय वाटतें याचा माझ्याकडून कधींही विचार केला जाणार नाहीं.

तुम्ही आपल्या पत्रांत माझ्यावरील तुमचें प्रेम निश्चल आहे असें लिहिलें आहे. पण तें निव्वळ ढोंग आहे. कारण माझ्यावरील आरोप तुम्हाला खरोखरच खोटे वाटत असते तर तुम्हाला हा द्राविडी प्राणायाम करण्याची जरुरीच काय होती? अर्थात ते तुम्हाला खरे वाटत असले पाहिजेत. तुमचें माझ्यावरील प्रेम निश्चल असतें तर तुमच्या त्या थोर मित्राच्या वाटेल त्या सांगण्यावर तुमचा विश्वासच बसला नसता.

तुमच्यासंबंधानें माझ्याजवळ कोणी असें वेडेंवांकडें बोललें असतें तर मीही तुमच्या प्रमाणेंच वागलें असतें असें तुम्ही म्हणता! पण ही तुमची चूक आहे. माझें तुमच्यावर खरोखरच प्रेम असतें तर मला त्याबद्दल तुमच्याजवळून खुलासा करून घेण्याची जरुरीच पडली नसती. कारण त्या परिस्थितींत माझा तुमच्यावर इतका अढळ विश्वास असता. पण आतां तर माझें तुमच्यावर प्रेमच नाहीं. तरी सुद्धां तुमच्याबद्दल मला कोणी कांहीं भलतेंसलतें सांगूं लागला तर तें मी खरें मानणार नाहीं.

माझें तुमच्यावर प्रेम होतें हाही माझा निव्वळ भास होता. तुमच्या अंगच्या कांहीं सद्गुणांमुळें मला तुमच्याबद्दल आदर वाटत असे व तो अजूनही कायम आहे हें खरें आहे. पण तें प्रेम मात्र नव्हतें.

तुम्ही परवांचे दिवशीं विलायतेस जाण्यासाठीं निघणार व म्हणून मी तुम्हाला निरोप देण्यासाठीं डेकवर यावें असें तुम्ही मला सुचवितां. तुमचें विलायतेला जाणें मला पसंत नसलें तरी तुम्हाला माझ्याविषयीं जिव्हाळा वाटतो व मला तुमच्याबद्दल

बऱ्याच सद्गुणांमुळें आदर आहे म्हणून माणुसकीला जागून मी आलेंही असतें. पण माझा अगदीं नाइलाज आहे. कारण त्याच दिवशीं non-co-operation चा propaganda करण्यासाठीं कृष्णराव व केशवराव मुंबईच्या बाहेर पडणार असल्यामुळें त्यांना निरोप देण्यासाठीं मला जाणें भाग आहे. तेव्हां अर्थातच तुम्हाला निरोप देण्यासाठीं मला येतां येणार नाहीं.

तुम्हाला सर्व बाजूंनीं अनुकूल परिस्थिति असून देशानें मुक्रर केलेल्या कार्यक्रमांत भाग घेण्याची तुम्हाला इच्छा होत नाहीं; आणि सर्व बाजूंनीं परिस्थिति 'आ' वासून उभी असतांना या दोन तेजस्वी तरुणांनीं आपल्या घरादारावर तुलसीपत्र ठेवलें आहे. किती परस्परविरोधी दृश्यें आहेत हीं ? कोणत्या देशाभिमानी माणसाला या दोघाचें कौतुक वाटणार नाहीं ? तुम्ही विलायतेला ऐषआरामानें जाणार, आरामानें परीक्षेला बसून आपला कार्यभाग साधून घेणार आणि इकडे परत येऊन आपल्या इच्छेप्रमाणें व महत्त्वाकांक्षेप्रमाणें द्रव्याच्या राशी मिळविण्याकडे त्या आपल्या ज्ञानाचा विनियोग करणार ! तर हे, आपली दैन्यावस्था संपण्याच्या अगदीं बेतांत आली असतांना निव्वळ देशाच्या आज्ञेचें पालन करण्यासाठीं, लवकरच प्राप्त होणाऱ्या चांगल्या परिस्थितीवर लाथ मारून फकीर बनण्यास तयार झाले ! त्यांचें आतांपर्यंतचें सर्व आयुष्य हालांत गेलें, सध्यां हालात हात आहे, पुढेंही तें हालांतच जाणार आहे हेंही उघड दिसत आहे, आणि तें का ? तर निव्वळ देशाच्या आज्ञेचें पालन करण्याकरितां. आपल्या देशासाठीं अशा रीतीनें आपल्या स्वार्थसर्वस्वावर लाथ मारणाऱ्या तरुणांचें कौतुक करावयाचें कीं आपलीच तुंबडी भरण्याच्या प्रयत्नांत गढून असणाऱ्या व सदैव रहाणाऱ्या स्वार्थी माणसाचें कौतुक करावयाचें ? त्याच जातीचीं स्वार्थांध माणसें असतील तींच फक्त त्या स्वार्थी माणसाचें कौतुक करतील. देशसेवेला इतर कोणत्याही गोष्टीहून अधिक महत्व देणाऱ्या माझ्यासारख्या माणसाला त्याचें केव्हांही कौतुक वाटणार नाहीं. उलट मला त्याचा केव्हांही संतापच येईल. खरें सांगावयाचें म्हणजे अगदीं नाइलाज होईपर्यंत मी त्याच्याशीं नुसता संबंध सुद्धां ठेवणार नाहीं.

आतां मी तुम्हाला पुनः एकदां आणि शेवटचें सांगतें कीं माझें तुमच्यावर पूर्वीही कधीं प्रेम नव्हतें आणि आतांही नाहीं. मी पूर्वी कधीं तसें बोलून गेल्यें असलें तर ती माझी चूक होती. तो माझा भास होता.

कृष्णराव आणि केशवराव यांच्याबरोबर तुम्ही आपली तुलना करून घेऊं नका.

कारण माझ्या दृष्टीनें ते तुमच्यापेक्षां पुष्कळ पटीनीं थोर आहेत. एवढें मात्र अगदी खरें कीं तुमच्या अंगीं जे कांहीं सद्‌गुण आहेत, त्यांबद्दलचा माझा आदर मात्र अजूनही कायमच आहे, व पुढेंही तो तसाच कायम राहील. पण मला इतर सर्व सद्‌गुण देशासाठीं स्वार्थत्याग करण्याच्या दैवी सद्‌गुणापेक्षां कमी दर्ज्याचे वाटतात.

आतां अधिक कांहीं लिहिण्याची जरुरी आहेसें वाटत नाहीं. कळावें.

आपली,

**मालती.**"

लीलाताईनें पत्र वाचून झाल्याबरोबर तें कृष्णाला वाचण्यास दिलें. त्याबरोबर मालती 'लीलाताई' म्हणून ओरडली. आपण तें वाचूं नये, अशी मालतीची इच्छा आहे हें कृष्णाच्या लक्षात आलें; व त्यानें लगेच त्यांतील एक अक्षरही न वाचता पुनः लीलाताईच्या हवालीं केलें. "त्यांनीं वाचलें म्हणून काय बिघडलें," असा लीलाताईनीं मालतीला प्रश्न केला. पण त्याचें उत्तर न देतां तिनें तें पाकिटांत घातलें व त्या भुलाच्या हवालीं केलें.

आणखी कांही वेळ बोलणें चालणें झाल्यावर मालती आपल्या घरीं निघून गेली.

# प्रकरण २३ वें.

लीलाताई व काशिनाथपंत झोंपीं गेलीं तरी कृष्णा आणि केशव यांचें बोलणें सुरूच होतें.

**कृ०**—"जग किती परस्परविरोधी मनोवृत्तींच्या माणसांनीं भरलेलें आहे पहा! आज चार पांच दिवसांच्या अल्प परिचयानें लीलाताई आणि त्यांचे वडील आपल्याला अगदीं आपल्या निकटच्या आप्तांहूनही अधिक जवळचीं वाटूं लागली आहेत. यावरून हें सिद्ध होत नाहीं का कीं उपजत नातींच माणसाला ओढ लावतात असें नाहीं तर प्रसंगोपात आपल्याशीं कोणत्याही प्रकारचा प्रत्यक्ष संबंध नसलेल्या माणसांच्या प्रेमळपणामुळेंही आपली त्यांच्याकडे ओढ लागते, आणि ती कधीं कधीं प्रत्यक्ष नात्यालाही मागें टाकते."

**के०**—"खरोखर लीलाताईनीं आपल्याला या प्रसंगीं केलेली मदत अमोल आहे; नाहीं तर आपले हाल आज कुत्रा खाता ना! देशांतील तरुणांच्या मनोवृत्ति

अद्यापि इतक्या थंडगार रहाव्या याचें आश्चर्य वाटतें. या लोकांना देशाला आज कसली आवश्यकता आहे हें कळत नाहीं कीं कळत असून मुद्दाम डोळ्यावर पांघरूण ओढून घेऊन हे स्वस्थ बसतात ?"

कृ०—"आपल्या देशाचें नष्टचर्य अजून संपलेलें नाहीं याचा हा स्पष्ट पुरावा आहे. स्वार्थापलीकडे जगांत कांहीं अधिक उच्च ध्येय गांठावयाचें असतें, ही कल्पनाच मुळीं या व्यवहारचतुर पंडितांना पटत नाहीं. तसें म्हटलें तर स्वार्थ कोणालाच सुटलेला नाहीं. पण तो जर देशसेवेच्या आड येत असेल तर त्याच्यावर लाथ मारण्यास तयार व्हायला नको का ? देशाचें ज्यांत कल्याण आहे त्यांतच आपलेंही कल्याण आहे, हें तत्त्वच या लोकांच्या गळीं उतरत नाहीं; आणि कांहीं जणांच्या गळीं उतरलेंच तर अमुक कार्यक्रम यशस्वी होईल कीं नाहीं, या चळवळींत इतके लोक सामील होतील कीं नाहीं, बलाढ्य सरकारनें ती दडपून टाकण्याचें मनांत आणल्यास आपल्यासारख्यांचा त्या दडपशाहीपुढें निभाव लागेल कीं नाहीं, हे व असल्याच प्रकारचे विचार करीत ते स्वस्थ बसतात. प्रत्येक तेजस्वी चळवळीला असल्या भेकड लोकांच्या फाजील व्यवहारचातुर्यामुळेंच अनुयायांची वाण पडते आणि त्यांच्या अभावीं ती यशस्वी होणें दुरापास्त होऊन बसतें; आणि ती अयशस्वी झाली म्हणजे टिमकी वाजविण्याला मात्र हेच शिष्ट सर्वांच्या पुढें सरसावतात व म्हणूं लागतात "आम्ही पूर्वीपासून म्हणत नव्हतों कीं पुढें पाऊल टाकूं नका—खड्ड्यांत पडाल. नीट विचार करा आणि शुद्धीवर या. भावनेनें बेहोष बनून—बुद्धीच्या शिकवणीला बाजूस सारून मूढपणानें आपल्या बिनमोल नरजन्माची अशी माती करून घेऊं नका. आतां तोंडें कां अशीं वेडींवांकडीं करतां ? त्या वेळीं मोठेपणा मिळविण्याच्या मोहाला बळी पडलां, भोगा त्याचीं फळें. आम्ही स्थितप्रज्ञ राहिल्या-मुळें आमचा होत असलेला उत्कर्ष तुम्हाला आपल्या डोळ्यानीं नुसता पहात चुळबुळत रहाणें आतां तुम्हाला भागच आहे !" काय लेकाचे गमजा करतात पहा ! म्हणे आम्ही पूर्वीपासूनच सांगत नव्हतों कीं पुढें पाऊल टाकूं नका ? हजारों मैल-अंतर कापावयाचें आहे असें तर तोंडानें बडबडत असतात ! पण पाऊल टाकण्याचें तर नांव नाहीं ! मग हे मुक्काम गांठणार तरी कसा आणि कधीं ? नीट विचार करणें याचा अर्थ जर कांहीं न करणें असा असेल दगडांइतके नीट विचार करणारे प्राणी त्रिभुवनांतही मिळणें कठीणच हें आम्हाला कबूल करणेंच भाग आहे. कारण ते बिचारे जागचे कधीं हालत सुद्धां नाहींत. पण म्हणूनच त्यांना दगड म्हणतात हें मात्र ते विसरतात ! नरजन्माची माती करून घेऊं नका म्हणे ! आपल्या जन्माची माती

झाली कीं सोनें झालें हें ठरवायचें कोणी ? श्रीशिवाजी महाराजांच्या एका शब्दासाठीं तानाजीनें आपला देह उदेभानाच्या पट्टयानें छिन्न विच्छिन्न करून घेतला, यांत त्यानें आपल्या जन्माची माती करून घेतली कीं बिनमोल मरण मिळवून त्याचें सोनें करून घेतलें ? त्या युद्धांत शेवटीं शिवाजी महाराजांच्या पक्षाचीच सरशी झाली म्हणूनच तानाजीनें आपल्या जिवाचें सोनें केलें असें आम्ही म्हणत नाहीं. तर दैववशात् एवढा असामान्य मोहोरा बळी घेऊनही युद्धदेवतेनें जरी उदेभानाच्या गळ्यांतच माळ घातली असती तरी देखील तानाजीनें आपल्या नरजन्माचें सार्थक केलें असेंच आम्ही म्हटलें असतें. देशासाठीं आत्मार्पण करणाऱ्या लोकोत्तर पुरुषाच्या जीविताचेंच सोनें झालें असें आम्ही समजतों. देशासाठीं कांहींही न करणारा मनुष्य सोन्याच्या पर्वतावर बसलेला असला तरी आम्ही त्याच्या नरजन्माची माती झाली असेंच म्हणणार ! देशाची माती करून आपला स्वार्थ साधणाऱ्या नादान माणसांनीं पाहिजे तर आपल्या जीविताचें सोनें झालें असें मानून खुशाल त्यांत समाधान मानावें ! ”

के०—“ म्हणजे ही चळवळ अयशस्वी होणार अशी तुला सुद्धां भीति वाटत आहे कीं काय ? आत्मार्पण करण्याची गोष्ट म्हणालास म्हणून विचारतों. ”

कृ०—“ होय. मला बऱ्याच अंशीं असेंच वाटतें. त्याला कारण मात्र हे व्यवहारपंडितच. कोणत्याही प्रसंगांत यांचीं अंतःकरणें हालतच नाहींत. त्याला काय करावयाचें ? पण म्हणून आपण आपलें कर्तव्य करण्यास थोडींच टाळाटाळ करणार आहोंत ? लढाईंत यश येईल कीं अपयश येईल हा शिपायांचा प्रश्न नसतो. त्यांना फक्त लढण्याचें माहीत असतें. त्यांत त्यांच्या पदरीं अपयशाचा वांटा पडला तर तो दोष त्या शिपायांचा नसून आपल्या जीवाच्या भीतीनें दारें खिडक्या बंद करून घुबडांप्रमाणें गुडघ्यांत मान घालून बसणाऱ्या साळूबाईचाच तो असतो ! आतां परवांपासून आपल्या नवीन आयुष्याला सुरुवात होणार ! मला किती आनंद होत आहे म्हणून सांगूं ? ”

के०—“ मला वाटतें आपली आणि या लोकांची घडणच ब्रह्मदेवानें वेगवेगळी केलेली आहे असें नसतें तर त्यांच्या आणि आपल्या वृत्तींत इतका फरक कसा पडला असता ? देशासाठीं आपली राखरांगोळी उडणें याला आपण भाग्य समजतों तर त्यालाच हे दुर्दशा समजतात. आपलें कर्तव्य करीत असतां आपल्याला इच्छित फलप्राप्ति होईल कीं नाहीं याचा विचारसुद्धां आपल्या मनाला शिवत नाहीं; किंबहुना याचें फळ देशाला न मिळतां आपला सर्व खटाटोप वांया जाणार अशी खात्री असतांना सुद्धां

त्यापासून भ्रष्ट होण्याची कल्पना देखील आपणाला असह्य वाटते. त्यांना मुळीं मुळांत तें आपलें कर्तव्यच वाटत नाहीं. वाटलेंच तर त्याचें योग्य तें फळ आपणाला–तें सुद्धां देशाला नव्हे–मिळेल किंवा नाहीं ही भीति त्यांच्यासमोर आ वासून उभी रहाते. त्यामुळें भेदरून जाऊन उठून उभें रहाण्याची प्रवृत्ति आंतल्या आंत गुदमरून यांचा प्राण कासावीस होऊं लागतो. निःस्वार्थ बुद्धि आणि बेडरपणा हेच दोन मुख्य गुण स्वातंत्र्यसंपादनास आवश्यक असतात, हेंच मुळीं यांना पटत नाहीं. उलट या दोन परमथोर आणि दैवी सद्गुणांची ते अवगुणांतच गणना करतात आणि ते ज्यांच्या अंगीं उत्कटतेनें वसत असलेले त्यांना आढळतात त्यांच्या कपाळावर अप्रबुद्धतेचा आणि व्यवहारशून्यतेचा शिक्का मारण्यास प्रवृत्त होतात. यांना जर हातपाय हालवावयाचे नाहींत तर स्वराज्य मिळविण्याची कल्पना तरी यांनीं आपल्या मनांत कशाला आणावी? भीक मागून किंवा गोंडा घोळून कां कुठें असले हक्क प्राप्त होत असतात? आणि मी तर याच्याही पुढें जाऊन असें म्हणतों कीं असल्या दैन्यवाणी मार्गानें असले हक्क मिळविणें यांत भूषण तरी काय आहे? लडिवाळपणें कांहीं मागावयाचें तें आपल्या आईशीं. आपल्या आईच्या नरडीला नख लावणाऱ्याच्या पाठींत बडगाच हाणला पाहिजे."

**कृ०**—"अरे, असले साधे, सरळ आणि सोपे उपाय अंमलांत आणण्याची ज्यांना बुद्धि व हिंमत होत नाहीं त्याच्या बाबतींत बडग्याची गोष्ट तरी कशाला हवी? त्याचे हें असेंच चालावयाचें. लढाईतून हातपाय तुटून थोटे बनून आलेल्या बहाद्दर शिपायांना यांनीं विचारावयाचें, "लढाईवर जाऊन काय दिवे लावलेत? हातपाय गमावून जन्माचें नुकसानच करून घेतलेंत ना? आम्ही पहा कसे शहाण्यासारखे आपले घरीं बसून आहोंत. आमचे हातपाय शाबूत राहिले आहेत कीं नाहींत? तरी आम्ही तुम्हाला पूर्वीपासून सांगत होतों कीं नका-या भानगडींत पडूं नका. त्यापासून कांहींही लाभ न होतां प्रसंगविशेषीं प्राणालाही मुकावें लागेल? आतां प्रत्यक्ष झालेलें नुकसान दृष्टीला पडत आहे हें ठीक आहे!"

**के०**—"ते शिपाई दुसरें तर कांहीं करणार नाहींत. फक्त त्यांच्या तोंडावर थुंकतील–"

**कृ०**—"त्यांना थुंकण्याचें कारणच पडणार नाहीं. कारण सर्व जगच त्यांच्या तोंडावर थुंकेल."

**के०**—"जाऊं द्या झालं. असल्या लोकांशीं आपल्याला करावयाचें आहे तरी काय? एकदां परवांच्या दिवशीं आपण इथून बाहेर पडलों म्हणजे

आपला निरनिराळ्या लोकांशीं प्रत्यक्षच प्रसंग येणार आहे. तेव्हां आतांपासूनच आपलें डोकें कशाला तापवून घ्या ? ”

बराच उशीर झाल्यामुळें आतां अधिक कांहीं बोलत बसावयाचें नाहीं असें त्यांनीं ठरविलें. लवकरच त्यांना झोंप लागली.

वसंत व त्याचा मित्र मालतीच्या उत्तराची अगदीं उत्कंठेनें वाट पहात होते.

**वसंत—**“ माझ्या म्हणण्याची सत्यता तुझ्या आतांच प्रत्ययाला येईल. स्त्रियांच्या प्रेमाची तुला नीटशी ओळख नाही, म्हणूनच मालतीविषयीं तुला असा संशय आला. ज्याच्यावर तिचें थोड्याच दिवसांपूर्वीपर्यंत इतकें गाढ प्रेम होतें, तें इतक्या थोड्या अवधींत अजिबात नष्ट होऊन त्याला फाटे फुटूं लागणें कसें शक्य आहे ? हां. तिचें माझ्यावर जर प्रेमच नसतें तर तुझें म्हणणें मी खरें म्हटलें असतें. पण ती जर माझ्याशीं लग्न सुद्धां करण्यास तयार होती, तर तिचें माझ्यावर प्रेमच नव्हतें, असें कोणाला तरी म्हणतां येईल का ? ”

**मित्र—**“ तें कसेंही असो ! पण माझ्या म्हणण्याचीच प्रचीति तुला आल्या-खेरीज रहाणार नाही. ”

इतकें त्याचें बोलणें होत आहे तोंच तो मुलगा पत्र घेऊन आला. वसंतानें तें अगदीं अतुरतेनें फोडले व घाईघाईनें वाचण्यास सुरुवात केली. पण पत्र वाचतां वाचतां त्याच्या चेहेऱ्यावर उद्विग्नता, क्रोध इत्यादि विकारांच्या छटा उमटत होत्या. त्याच्या मित्रानें त्यावरून ओळखलें कीं आपलेंच म्हणणें बरोबर याचा प्रत्यय वसंताला आला असला पाहिजे. पत्र वाचून झाल्यावर कांहीं न बोलतां वसंतानें तें टेबलावर ठेवलें.

**मित्रः—**“ काय रे बुवा ? काय म्हणणें आहे त्यांचें ? ”

**वसंतः—**“ विषवल्लीला अमृतवल्ली समजून मी तिला आजपर्यंत कवटाळीत आलों. नुसता वर्ण मोहक दिसला, पण जातीनें ती नागीण आहे याचें भान मला राहिलें नाहीं. ”

**मित्र—**“ म्हणजे काय ? असें पत्रांत त्यांनी लिहिलें आहे तरी काय ? ”

**वसंत—**“ तें वाचूनच पहा म्हणजे समजेल त्यांनीं काय अकलेचे तारे तोडले आहेत ते ! तुमच्यावरील माझें प्रेम हा माझा निव्वळ भास होता म्हणे ! भासच होता तर बरें झालें ! कटकट गेली ! माझें त्यांत काय बिघडलें ? अमृतपान सोडून हालाहल प्राशन करण्यांतच जर तिला मौज वाटत असेल, तर खुशाल वाटेना ?

तिच्या नशिबाच्या रेषाच जर उलट्या पडल्या असतील तर त्याला ती काय करणार आणि मी तरी काय करणार ? या सर्वांचें उत्तर मी तिला विलायतेहून परत आल्यावर देणारच आहें. तोंपर्यंत यापुढें या बाबतींत एक अक्षरही न काढण्याचें मी ठरविलें आहे."

त्या मित्रानें तें पत्र वाचलें व असें पत्र लिहिण्यास कृष्णानें किंवा केशवानें तिला भर घातली असली पाहिजे असें तो छातीठोकपणें प्रतिज्ञापूर्वक सांगूं लागला.

**वसंत**—"हें कदाचित् खरें असलें तरीही त्यामुळें मालतीचा अपराध कांहीं कमी होत नाहीं ! माझी अवहेलना तिनें स्वयंप्रेरणेनें केलेली असो किंवा परप्रेरणेनें केलेली असो, मला त्याबद्दल तिच्यावर सूड उगविला पाहिजे व मी तो उगवणारच ! आतां अगोदर बाहेर चल बरें. थोडेसें थंड हवेंत फिरल्याशिवाय माझ्या डोक्याला शांतता वाटणार नाहीं."

दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठल्याबरोबर मालती लीलाताईकडे आली. कृष्णा व केशव अजून निजलेलेच होते. लीलाताई रोजच लवकर उठत असे. मालती तिला बाहेर फिरण्यास जाण्याचा आग्रह करूं लागली. लीलाताईनें तर्क केलाच कीं हिला आपल्याला कांहीं तरी महत्त्वाचें पण गुप्त असें सांगावयाचें आहे. पण हें आपल्या लक्षांत आलें नाहीं असें मालतीला भासविण्याकरितां ती मुद्दामच म्हणाली, "आतां हे दोघे उठल्यावर, मी बाहेर गेल्यें आहे, असें पहातांच त्यांना काय वाटेल बरें ?"

"हो–हो–मला माहीत आहे त्यांना काय वाटेल तें. आपल्याला चार दोन तास बाहेर थोडेंच थांबावयाचें आहे ? पाऊण एक तासांत तर आपण परत येऊं," मालती म्हणाली. आतां अधिक वेळ गमावणें बरें नाहीं असा विचार करून लीलाताई तिच्याबरोबर बाहेर पडली.

**मालती**—"लीलाताई, आज चारसहा दिवस माझी फार चमत्कारिक स्थिति झाली आहे."

मालतीनें एकदम मुख्य मुद्यालाच सुरुवात केली यावरून तिच्या डोक्यांत त्या विचाराचें केवढें प्राबल्य झालें होतें याबद्दल लीलाताईची खात्री पटली. पण आपणाला यांतील कांहींच समजलें नाहीं असा तिनें आव आणला.

**लीला०**—"कां बरें ? एकाएकीं असें कां व्हावें ?"

**मालती**—"तेंच तर मी तुला विचारणार आहें. पण मी तुला आतां जें सांगणार आहे तें इतकें महत्त्वाचें व गुप्त आहे कीं तुझ्यावर माझा पुरा विश्वास असूनही

त्याचा तुझ्याकडून स्फोट होईल कीं काय अशी मला भीति वाटत आहे, व तूं मला थिल्लर तर म्हणणार नाहींस ना अशीही धास्ती वाटत आहे. ”

**लीला०**—“यावरून तूं मला जें सांगणार आहेस तें अतिशयच महत्त्वाचें व गुप्त असलें पाहिजे. मालती, मी कितीही मोकळ्या स्वभावाची असल्यें तरी जी गोष्ट गुप्त ठेवावयाची तिचा मी कधींच बभ्रा होऊं देत नसतें. सांग खुशाल–अगदीं मनमोकळे-पणानें तुला जें कांहीं सांगावयाचें असेल तें सांग. त्याची माझ्याकडून केव्हांही वाच्यता होणार नाहीं. ”

**मालती**—“ माझें वसंतरावांवर प्रेम होतें हें तुला माहीत आहे ना ?”

**लीला**—“ हो–कां बरें ?”

**मालती**—“ तर मग एका माणसावर निश्चल प्रेम असतांना तेंच दुसऱ्या कोणावर बसूं शकतें काय ?”

**लीला**—“ नाहीं. तें जर खरोखरच प्रेम असेल तर त्या प्रेमाचा विषय नाहींसा झाल्याबरोबर तें ज्याचें त्याच्याकडेच परत फिरत असतें.”

**मालती**—“ मग माझें मन असे हेलकावे कां खाऊं लागलें आहे ?”

**लीला**—“ मालती, आतां उगीच आडून आडून बोलण्याच्या भानगडींत कशाला पडतेस ? तुझें वसंतरावांवर प्रेम कधींच असूं शकणार नाहीं, हें मला पूर्वीपासू-नच माहीत होतें. त्यावेळीं मी तुला तसें स्पष्ट सांगितलें असतें तर तें तुला आवडलें नसतें व पटलेंही नसतें. त्यावेळीं मी निव्वळ तुझ्यासाठीं त्यांच्यावर तुझें प्रेम असल्याचें वरकरणी कबूल करीत होतें. निव्वळ तुझ्या वडिलांची आपल्या घरोब्याचाच आप-ल्याला जांवई मिळावा ही इच्छा व वसंतरावांची बुद्धिमत्ता व सरळ वागणूक यांमुळें वसंतरावांकडेच ओढ घेण्यास तूं आपल्या मनाला हळूं हळूं शिकवूं लागलीस ! त्याचा परिणाम असा झाला कीं तुला आपलें वसंतरावांवर प्रेम आहे असा भास होऊं लागला; व तोच भास त्यांचें तुझ्यावर प्रेम आहे असें कळतांच दृढतर झाला इतकेंच. सध्यां तुझें मन ज्याच्या भोंवतीं घिरट्या घालीत आहे, तोच पूर्वीपासून तुझा खरा प्रेमविषय होता व हें मला पूर्णपणें ठाऊक होतें. मात्र तें प्रेम त्या वेळीं अगदीं सुप्तावस्थेंत होतें. कारण त्याला प्रतिपक्षाकडून कधींच व कोणताच response मिळाला नव्हता. उलट त्याच्या ज्वलज्जहाल मानी स्वभावामुळें त्यानें जेव्हां तुम्हा साऱ्यांची कानउघाडणी केली तेव्हां वसंतरावांना त्यांच्या-बद्दल तुझ्या कानांत विष ओतण्याला आयतीच संधि मिळाली. कृष्णरावां-

बद्दलची त्यांनीं जेव्हां तुझ्या तोंडून स्तुति ऐकली तेव्हांच त्यांचा कृष्णरावांबद्दलचा मत्सर जागृत झाला. कोणताही मनोविकार उत्कट प्रयत्नानें दाबून ठेवलेला असला म्हणजे तो जेव्हां उसळतो तेव्हां तितक्याच प्रबलतेनें उसळतो व मग त्याला आंवरणें फारच प्रयासाचें होऊन बसतें. तुला असा एक तरी प्रसंग आठवतो कां कीं जेव्हां वसंतरावाविषयीं तुझ्या मनांत विचार सुरू असत तेव्हां कृष्णाची मानी मूर्ति तुझ्या डोळ्यासमोर खेळत नव्हती ? निर्भीडपणानें खरें सांग हें ! तुझ्या तर त्याच वेळीं लक्षांत यावयास पाहिजे होतें कीं आपलें मन वसंतरावांनीं आकर्षिलेलें नसून आपण आपल्या मनाला तो धडा शिकवीत आहों; पण खरें म्हणजे तें कृष्णानें आकर्षिलें आहे ! आपली व त्याची त्या दिवशीं मलबारहिलवर गांठ पडली आणि मी जेव्हां तुझ्या चेहेऱ्याकडे पाहिलें तेव्हां प्रत्यक्ष देव जरी मला सांगूं लागला असता कीं तें असें नाहीं तरी त्याच्याशीं सुद्धां मी पैज मारली असती कीं तें असेंच आहे ! त्यानंतर आज चार पांच दिवस तूं माझ्याकडे रोज तासचे तास येऊन बसतेस, ती तरी कां हें मला समजत नाहीं, असें का तुला वाटतें ? तुला कृष्णरावांशीं पुष्कळ बोलावेसें वाटतें पण तुझ्या तोंडून एक अक्षरही निघत नाहीं तें तरी का ? हें सर्व प्रीतीचे पुरावे आहेत. त्याच्याविषयीं तुला वाटत असलेलें प्रेम आतां प्रगट होऊं लागलें आहे, इतकेंच. ”

**मालती**—“ तर मग लीलाताई, यांत तूं मला दूषण तर लावीत नाहींस ना ?

**लीला**—“ अगदीं वेडी ! अग, यांत तुझा कसला दोष आहे ? हा निसर्गाचाच प्रभाव आहे. समसमांचा संयोग व्हावा, हाच निसर्गाचा कायदा आहे. त्यांत मानव आपल्या बुद्धीचा दुरुपयोग करून विषमता उत्पन्न करितात, त्यांत त्याचा काय दोष ? तुला कृष्णरावच योग्य वर आहेत. तूं अप्पासाहेबांना अगदीं सरळपणानें सांग. त्यात भिण्यासारखें किंवा लाजण्यासारखें कांहींही नाहीं. सिंहिणीला सिंहाचा मोह पडावा, यांत वावगें काय आहे ? ”

**मालती**—“ बरें. पण आज इतके दिवस त्यांनीं तुझ्या इथला पाहुणचार घेतला. आज तुम्ही सारींच आमच्याकडे चला ना ? ”

**लीला०**—“ मी काय केव्हांही येण्यास तयार आहें. कृष्णराव तयार होतील कीं नाहीं हें पाहिलें पाहिजे.”

**मालती**—“ अहाहा ! काय पण अगदीं आव आणते आहे ? मला माहीत आहे बरं कां कीं तूं नुसता एक शब्द टाकलास तर तो मोडण्याची त्यांची छाती नाहीं.”

**लीला**--( हंसून ) " बरें, पहातें बाई मी आपलें वजन खर्च करून ! "

त्या दोघी घरीं परत आल्या तेव्हांही कृष्णा आणि केशव निजलेलेच होते. तेव्हां मी त्यांना नक्की घेऊन येतें असें लीलाताईनें आश्वासन दिल्यावरून मालती आपल्या घरीं निघून गेली.

घरीं गेल्यावर तिनें आप्पासाहेबांना सांगितलें कीं मी आपली कांहीं मित्रमंडळी जेवण्यास बोलावली आहे, तेव्हां बाजारांतून आंबे घेऊन या.

**आप्पा०**—" अग वेडी कशी तूं ? तूं माझी अगदीं लाडकी असलीस तरी या दिवसांत मी आंबे कुठून पैदा करूं ? "

मालतीनें डोकें खाजवून एक शक्कल काढली व स्वयंपाकघरांत गेली.

लीलाताई, कृष्णा व केशव ठरल्यावेळीं आलीं. आप्पासाहेब दिवाणखान्यांत बसलेले होते. कृष्णानें त्यांना लवून नमस्कार केला, तेव्हां ते तर आश्चर्यचकित झाले. यांना आपल्याकडे बोलावून मालती गेली तरी कुठें असा विचार करीत ते आंत जातात, तों मालती पुऱ्या तळीत बसलेली त्यांच्या दृष्टीस पडली.

**आप्पा०**—"हें काय आज आठवलें तुला ? आपल्या मित्रांना आपल्याला स्वयंपाक किती उत्तम करतां येतो, हें तुला दाखवावयाचें आहे वाटतें ? ठीक. बरं पण हात बीत भाजून घेऊं नको हां. नाहीं तर सगळेंच भेंड फुटावयाचें. "

त्या चौघांचीं पानें मांडून मालती स्वतः त्यांस वाढूं लागली. कृष्णा आपली नजर इतर वस्तूंकडे नेण्याचा प्रयत्न करीत होता पण ती पुनः पुनः सत्याग्रह करून मालतीच्याच चेहेऱ्याचा आश्रय करीत होती; आणि तिची दृष्टीही जर त्याच्या दृष्टीशीं मिळाली मग कृष्णाची जी स्थिति होऊन जाई, तिचें वर्णन करतां येणें अशक्य आहे !

पहिला भात संपल्यावर पुऱ्या वाढण्यास आल्या. तेव्हांच कृष्णाला मागील प्रसंगाचें स्मरण झालें. नंतर सुधारस वाढावयास आला. त्यावेळीं मालतीनें त्याच्याकडे जेव्हां पाहिलें, तेव्हां त्याची मान आपोआप खालीं वळली.

जेवीत असतांना त्याची मनःस्थिति अतिशय चमत्कारिक झाली होती. आज आपली दृष्टि आपल्या ताब्यांत कां रहात नाहीं हेंच त्याला कळेना. कसा तरी तो एकदां जेवून उठला झालें !

जेवण आटोपल्यावर तो, केशव व आप्पासाहेब दिवाणखान्यांत येऊन बसले लीलाताई मालतीशीं गोष्टी बोलत आंत बसली.

**लीला०**—" मालती, आज वाढतांना तुला अगदीं धन्यता वाटत असेल, नाहीं ? "

**मालती**—" तुला मी मुळीं कांहीं सांगायलाच नको होतें. "

**लीला०**—" अगदीं खरें. कारण तें मला माहीतच होतें. पण आतां मला तें आणखी एका माणसाला पण सांगायला हरकत नाहीं. "

**मालती**—" म्हणजे ? कोणाला सांगणार तूं ? "

**लीला०**—" अहाहा ! अगदीं कुकुलें बाळच कीं नाहीं तूं ? कोणाला म्हणे ! ज्यांना तें कळावें अशी तुझी इच्छा आहे, त्यानाच बरं का वहिनीबाई ! "

**मालती**—" हें ग काय लीलाताई ? तुझी आपली सारी थट्टाच ! "

**लीला**—" मला थट्टा नीटशी करितां येत नाहीं. खरें मात्र अस्खलित बोलतां येतें. "

कांहीं वेळानें मालतीकडून संध्याकाळीं आपल्या घरीं येण्याचें कबूल करून घेऊन कृष्णा आणि केशव यांच्यासह लीलाताई आपल्या घरीं गेली.

घरी आल्यावर हळुंहळुं विषय काढतां काढतां तिनें कृष्णाला सर्व सांगून टाकळें.

मालती आली तेव्हां केशवानें कांहीं तरी निमित्त काढून बाहेरची वाट धरली. लीलाताई, मालती आली तर मी लवकरच परत येणार आहें असें तिला सांगा, असें कृष्णाला सांगून अगोदरच बाहेर गेली होती. अर्थातच मालतीला कृष्णाशींच बोलण्याचा प्रसंग आला.

अशा प्रसंगीं त्या दोघांचें काय बोलणें झालें वगैरे त्यांच्या गुप्त गोष्टी लेखक वाचकांस सांगूं इच्छीत नाहीं. मात्र शेवटीं शेवटीं त्यांचें जे बोलणें झालें तेवढेंच सांगतों.

**कृ०**—" पण एक वर्षपर्यंत तरी याचा विचार करावयाचा नाहींच नाहीं."

**मालती**—" हें मलाही कबूल आहे. एक वर्षपर्यंत आपण अविवाहितच रहावयाचें."

**कृ०**—" आणि पुढेंही तुझ्या ( आतां कृष्णा मालतीला एकेरी नांवानेंच संबोधूं लागला होता ) वडिलोपार्जित मिळकतीच्या एका छदामाचाही आपण स्वीकार करावयाचा नाहीं. मी माझ्या मनगटाच्या जोरावर व तेंही राष्ट्रकार्य करीत असतां जें कांहीं मिळवीन तेवढ्यांतच आपण आपला निर्वाह करावयाचा !"

**मालती**—" अगदीं माझेच विचार तुमच्या तोंडून निघत आहेत. तुमच्यासारख्या देशकार्यालाच आपलें तनमनधन अर्पण करणाऱ्या स्वातंत्र्यभक्ताची सहचा-

रिणी होण्याचा मान तुम्ही मला देत आहांत, यांतच मी आपल्याला धन्य समजतें. तुमच्या कार्यांत जीं कांहीं संकटें येतील त्यांतील निम्यांची मी मोठ्या आनंदानें भागीदारीण होईन! तुम्ही माझा स्वीकार केलात म्हणजे माझीं पूर्वजन्मींची सुकृतेंच फळाला आलीं असें मी समजतें."

कृ०—"मला निष्कारण इतका मोठेपणा कां बरें देतेस मालती? देशकार्य करीत असतां माझ्या बरोबरीनें हाल सोसण्यास तयार असलेली आणि आपल्या गजांत लक्ष्मीला लाथ मारण्यास तयार झालेली देवता मला जन्माची सोबतीण लाभली, म्हणजे माझींच पूर्वजन्मींचीं सुकृतें फळाला आलीं, असें मला वाटत आहे. खरोखर तुझी प्रशंसा करावी तेवढी थोडीच होणार आहे. कारण हालअपेष्टा सहन करण्यांत मला कांहींच कठीण वाटणार नाहीं. कारण जन्मल्यापासून आतांपर्यंत मी कष्टांचेच सोहाळे भोगले आहेत. तुला मात्र कष्ट सहन करतांना फार प्रयास पडतील."

मा०—"माझी तुम्ही मुळींच काळजी करूं नका. तुम्ही माझे पति आहांत हा एकच विचार माझ्या सर्व कष्टांचा परिहार करण्यास समर्थ होईल."

कृ०—"आणि मलाही तूं माझी पत्नी आहेस हा एकच विचार कोठल्याही बिकट परिस्थितीशीं टक्कर देण्यास समर्थ करील."

---

# उपसंहार.

कांहीं काळ लोटला. कृष्णा व केशव राष्ट्राची जागृति करण्यासाठीं खेड्यापाड्यांतून प्रचाराचें कार्य करीत होते. राष्ट्राला संदेश सांगत असतां आपली भाषा कायद्याच्या मर्यादेबाहेर जात आहे किंवा काय याचें भान त्यांस रहाणें शक्य नव्हतें आणि त्यांच्या विचारसरणीप्रमाणें तें ठेवण्याचें त्यांस कारणही नव्हतें. कारण सरकार-विरुद्धच जेथें बोलावयाचें तेथें त्यांनींच उत्पन्न केलेल्या कायद्यांची कसली क्षिति बाळगावयाची? पण त्याचा परिणाम व्हावयाचा तोच झाला. सरकारनें त्या दोघांसही राजद्रोहाच्या आरोपावरून पकडलें व दोन दोन वर्षांची सक्तमजुरीची शिक्षा ठोठावली.

वसंत बॅरिस्टर होऊन परत आला होता. आपल्या वैभवाचा टेंभा मिरवावा आणि मालतीला तिच्या अदूरदर्शित्वाबद्दल खालीं मान घालण्यास लावावी अशा विचारानें तो तिचें घर आपल्या पवित्र पदरजांनीं पूनित करण्यासाठीं तिच्याकडे आला.

**वसंत—**" कां मालतीताई, आतां तरी तुमचे डोळे उघडले का ? मला खात्री वाटते कीं आतां तरी तुम्हाला माझें त्या वेळचें म्हणणें पटूं लागलें असेल ! त्यावेळींच तुम्हाला हें पटलें असतें तर आज तुमची स्थिती खात्रीनें निराळी असती–तुम्ही माझ्या दृष्टीनें तरी अधिक सुखी असतांत !"

**मालती—**" या बाबतींत तुम्हाला कांहींच बोलण्याचा अधिकार नाहीं व तुम्ही बोललां नसतां तर फार बरें झालें असतें."

**वसंत—**" कां बरें ? तुम्ही अशा निराश कां होता ? अजूनही माझा पक्ष तुम्हाला बरोबर वाटूं लागला असेल तर तुम्हाला सुखी करण्याइतकें औदार्य दाखविण्यास मी तयार आहें."

**मालती—**" माझ्या बोलण्याचा अर्थ कळण्याइतकी विचारशक्ति तुमच्या अंगीं नाहीं हें पाहून मला फार वाईट वाटतें. माझे मघांचे शब्द निराशेचे नव्हते. मला तुमच्यापासून कोणत्याही सुखाची अपेक्षा नव्हती व नाहीं. सोनेरी पिंजऱ्यांत तडफडणाऱ्या पोपटाची मैना होण्यांत मला भूषण वाटत नाहीं, तर मानससरोवरांत स्वैर विहार करणाऱ्या राजहंसाची हंसी होण्यांत मला भूषण वाटतें. ज्यांना मी मनानें वरलें आहे, ते देशासाठीं तुरुंगांतील हालअपेष्टा सहन करीत पडले आहेत. ते सुटतील तेव्हां त्यांच्याच गळ्यांत मी माळ घालीन."

**वसंत—**" आणि तुमच्या अपेक्षेप्रमाणें न होतां मध्येंच दुर्दैवानें कांहीं बरें वाईट झालें तर ?"

**मालती—**" तरी सुद्धां जिवंत मुडद्याची सौभाग्यवती म्हणून जगांत निर्लज्जपणें मिरविण्यापेक्षां स्वातंत्र्यभक्ताची विधवा म्हणून मी जगांत अधिक उजळ माथ्यानें वावरेन."

वसंत खालीं मान घालून परत फिरला. त्याला मागें वळून पहाण्याचाही धीर होईना.

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥